नमः पंचजगद्गुरुभ्यः

## धर्मवीर ग्रंथरत्न-माला.

प्रथमरत्नम्

# श्री चनबसव विजयः

लेखक,

वेदमूर्ति साहित्यरत्नम् पंडित जगदीशशास्त्री नालवार.



प्रथमावृत्ती प्रती १०००





शके १८६४) किंमत २ रुपये. (सन १९४२

पुस्तक मिळण्याचे ठिकाणः—श्री बालतपस्वी बृहन्मठ
९१८, उत्तर कसबा, सोलापूर सिटी.

ॐ

नमः पंचजगद्गुरुभ्यः

श्री बालतपस्वी कृपापोषित.



धर्मवीर, दानशूर, श्रीमंत शरणप्पाअण्णा फत्तेपूर यांच्या उदार आश्रयाखाली प्रसिद्ध होणारी वी. शैव धर्मवीर ग्रंथरत्न-माला.

प्रथमरत्नम्

# श्री चनबसव विजयः

वेदमूर्ति साहित्यरत्नम् पंडित जगदीशशास्त्री नालवार

यांनीं सोलापूर येथें

'श्री बालतपस्वी' इ. प्रेसमध्यें छापून प्रसिद्ध केला.

प्रथमावृती प्रती १०००,

शके १८६४ सन १९४२

किंमत २ रुपये.

लेखक, प्रकाशकः—
वे. मू. साहित्यरत्नम् पंडित जगदीशशास्त्री
श्रीवीरशैव गुरुकुल, प्रधानाध्यापक
सोलापूर.



मराठी भाषांतरकार,
वेदमूर्ति सिद्रामय्या शिवय्या जंगम (पाकणीकर)
हेड मास्तर म्युनिसिपल मराठी शाळा, सोलापूर.



मुद्रकः—
म. आ. गंभिरे.
श्री बाळतपस्वी इलेक्ट्रिक प्रिंटिंग प्रेस,
२१७, प. मंगळवार, सोलापूर.



नमः पंचजगद्गुरुभ्यः



चारित्रनायक–महात्मा—

# प. ब्र. श्री चन्नबसव शिवाचार्य

नमः पंचजगद्गुरुभ्यः



श्री ष. ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामी बृहन्मठ होटगी.

आणि

धर्मवीर, दानशूर, श्रीमंत शरणप्पाअण्णा फत्तेपूर दुबलगुंडी.

नमः पंचजगद्गुरुभ्यः



~~लेखक~~ ग्रंथकर्ता

वेदमूर्ति साहित्यरत्नम् पंडित जगदीशशास्त्री नालवार.

श्रीमद्वीरशैव गुरुकुल प्रधानाध्यापक, सोलापूर.

|| श्रीरस्तु. ||

# प्रकाशकांचे दोन शब्द.



परमेश्वरानें आपण उत्पन्न केलेलें हें चराचर जग नेहमीं वृद्धी पावून सर्व समृद्ध व संपन्न होऊन रहावें या सत्संकल्पानें पृथ्व्यादि पंच महाभूतें निर्माण करून त्यांचेकडून जगाच्या बाह्यांत शरीरांचें पोषण करविल्याप्रमाणें जगाचा आत्मा म्हणविणाऱ्या अशा सद्धर्माच्या उन्नतीकरितां सारासार विचारानें अवश्यक म्हणविली जाणारी सन्नीति, सच्छिक्षण, सदागमादि हीं प्रकाशमान् होऊन प्रपंचाला कल्याणकारक व्हावीं या उत्कट इच्छेनें दानशूर, उदार अंतःकरणाचीं, जग हेंच कुटुंब समजणारीं अशीं नररत्नें ठिकठिकाणीं निर्माण करून त्यांचेकडून त्या त्या समाज उन्नतीचेद्वारा जगाचा आत्मा अशा धर्माची उन्नति करवीत असतो. त्या नररत्नांमध्यें दानशूरांत प्रमुख असे श्रीमान् शरणप्पाअण्णा फत्तेपूर दुबळगुंडीकर हे एक आहेत.

श्रीमंत शरणप्पाअण्णा कांहीं कारणानिमित्त सोलापुरास आल्यावेळीं श्री. ष. ब्र. चन्नवीर शिवाचार्य बालवीर तपस्वी बृ. मठ होटगी यांचे सन्निध दर्शन व आशीर्वादाकरितां येऊन साष्टांग नमस्कार करून बसल्यानंतर बोलतां बोलतां हे पुण्य पुरुषा, कांहीं शतकांपूर्वी निरनिराळ्या कारणांमुळें वरिशैव समाजांचे धर्मग्रंथ लुप्तप्राय ( लोप ) झाल्यामुळें वरिशैव समाजांत अज्ञानांधकार चोहोंकडे पसरून समाजांचीं सुखसाधनें नाहींशीं होण्याचा प्रसंग आला. अशा प्रसंगीं कीर्तिमान् व धर्माभिमानी असे श्रीमान् वै. वरिसंगप्पा म्हैसूर यांनीं सुखरूपी ज्ञानाला आरशामध्यें असणाऱ्या धर्मग्रंथाच्या अभावामुळें खरें सुख न समजल्यामुळें दुःखी झालेला समाज पाहून कळवळा उत्पन्न होऊन धर्मग्रंथ छापण्याविषयीं तत्पर होऊन कांहीं धर्मग्रंथ आंध्र [ तेलगू ] लिपींत छापून प्रसिद्ध केले. त्यांच्या योगानें अंशतः कर्नाटकांत व आंध्र देशांत धर्म

ज्ञान उदय पावून प्रकाशित झालें. समाजाच्या दुर्दैवामुळें वै. विरसंगप्पा हे अकालीं परलोकवासी झाल्यामुळें तें तेथेंच थांबलें पुढें कांहीं काळानंतर प्रातःस्मरणीय व धर्मोद्धारक अग्रे कै. रा. ब. आप्पासाहेब वारद सोलापूर हे महाराष्ट्रांतील वीरशैव समाज धर्मज्ञानाचे अभावी मोठ्या शोचनीय स्थितींत आहे, हें पाहून सामान्य जनतेलासुद्धां धर्माचीं तत्त्वें समजावींत या सद्भावनेनें संस्कृत भाषेंत- मराठी टीकेसह- ४५,५० धर्मग्रंथ अतिशय पैसा खर्चून छापून प्रसिद्ध केले. त्यायोगानें महाराष्ट्रांतील वीरशैव समाजांत धर्मजागृतीस सुरवात झाली अलीकडे हे धर्म ग्रंथ मिळेनासे झालेले पाहून ते पुन्हा छापवून तो अभाव नाहींसा करून वीरशैव समाजांत धर्मजागृति उत्पन्न करावी ही भावना माझेठिकाणीं उत्पन्न होऊन ती दिवसेंदिवस वाढत आहे.

हे वसुधैक कुटुंबिका, अशाप्रकारचें कार्य पुष्कळ खर्चाचें असल्यामुळें तें सफल होणें फार कठीण दिसतें. तें न झाल्यास त्याकरितां पुनर्जन्म घ्यावा लागणार कीं काय असें भासतें. तो प्रसंग न यावा म्हणून रात्रंदिवस याबाबतींत परमेश्वराची प्रार्थना करीत असतों. हे श्रीमंत, आपल्यासारख्या उदारबुद्धि असणाऱ्यांच्या अंतःकरणांत असलेल्या परमेश्वरानें प्रेरणा केल्यास हें कार्य खास होणार, वगैरे विषय अतिशय कळकळीनें सांगितला.

नेहमीं समाजाचे हितचिंतक व उदार अंतःकरणाचे असे शरणप्पाअण्णा हे श्रींची समाजाविषयीं असलेली कळकळ जाणून अतिशय भक्तीनें उचंबळून ‘ विचार करून कळवितों ’ असें सांगून आशीर्वाद घेऊन गेले.

त्याच सालीं श्रावण महिन्यांत दरसालप्रमाणें कल्याण (दक्षिण) जवळील डोंगराच्या खोऱ्यांत असणाऱ्या आंबिल ( अमृत ) गुंड नांवाच्या पुण्यक्षेत्रांत होटगी श्रींची स्वारी अनुष्ठानाकरितां जाऊन त्यांनीं श्रीमंत शरणप्पा अण्णा यांच्या आदरातिथ्यांत अनुष्ठानाची पूर्तता केली. त्यावेळीं श्रींनीं पुन्हा वीरशैव मतग्रंथाचा विषय पुढें मांडतांच ‘ कार्तिक मासांत या छपाईकार्यास जरूर मदत करतों ’ असें श्रीमंतांनीं वचन दिलें. नंतर त्यांच्या घरीं आश्विन

शु॥ १०स [ विजया दशमीस ] दरसालप्रमाणें उत्सव चालल्यावेळीं श्रीमंत् शरणप्पाअण्णा यांनीं ' धर्म ग्रंथांचे छपाईकरितां वीस हजार २०००० रु. देतों ' असें स्वयंस्फूर्तीनें वाक्दान केलें (बोलून दाखविलें) " उदारचरितानान्तु वसुधैव कुटुंबकं " अशी आर्योक्ति यांचे ठिकाणीं स्पष्ट दिसून येते.

कुटुंबवत्सल असा एक कुटुंबी पुरुष—आपल्या कुटुंबांत असणारे सर्व बांधव विद्या, बुद्धि, इत्यादिकांच्या योगानें भूषित होऊन जगांत कीर्तिमान् व्हावेत अशा अभिमानानें—आपण मिळविलेल्या द्रव्याचा उदार अंतःकरणानें व्यय करून आपल्या कुटुंबाचा लौकिक जसा वाढवितो त्याप्रमाणें जगत्कुटुंबी असे श्रीमंत् शरणप्पाअण्णा हे आपल्या समाजांत असणारे सर्व बांधव सद्धर्म, सदाचार, भावनांनीं परिपूर्ण होऊन कायम सुखी व्हावे या भावनेनें धर्माप्रमाणें वागणारांना मुख्य साधनें असणाऱ्या मतग्रंथांची छपाई अव्याहत चालावी या उद्देशानें दिलेल्या वीस हजार रुपयांच्या व्याजानें—दातृत्त्वांत अग्रणी म्हणून प्रसिद्ध अशा श्रीमंत दानवीर, धर्मवीर, शरणप्पाअण्णा फत्तेपूर यांच्या उदार आश्रयाखालीं निघणाऱ्या—धर्मवीर ग्रंथ मालेंत श्री. ष. ब्र. चन्नबसव विजय पुराण हा प्रथम ग्रंथ होय. अतिशय महिमाशाली अशा स्वामींच्या सच्चरित्रानेंयुक्त असा हा ग्रंथ—धर्मग्रंथ मालिकेस—शिरोमणी होऊन राहिला असे. याच्या आधारें इतर धर्मग्रंथमणी धर्माच्या जप करणारांच्या हातीं मोजण्यास येऊन ' जपतोनास्तिपातकं ' या उक्तीप्रमाणें त्यांच्या पापनिवृत्तिपूर्वक आत्मोन्नति होऊन पाठक कायम सुखास [ मोक्षास ] पात्र होतील. कथानायक असे श्रीस्वामी हे ' महामहिमाशाली होऊन गेले ' हें ग्रंथावलोकनानें कळून येणार आहे. वाचक महाशयांनीं हा ग्रंथ भक्तिपूर्वक वाचून पुनीत व्हावें अशी इच्छा प्रकट करितों.

रसभरीत व रसिकांच्या अंतःकरणास मनोहर अशा आपल्या वस्तुस्थिति लेखनानें श्री. ष. ब्र. चन्नबसव विजय पुराण नांवाच्या कृतिरूपी कन्येच्या मुखाला मोत्याच्या नथीप्रमाणें शोभा आणून सौंदर्याची वाढ करणारे,

वेद, काव्य, स्मृति, दर्शन, तीर्थ, विद्यानिधि, विद्यारत्न, इत्यादि पदवीधर, ' आंध्र विभूति ' मासिकाचे संपादक असे वेदमूर्ति पंडित **वीरभद्र शास्त्री चिदरेमठ** यांचा मी अत्यंत ऋणी आहे.

संस्कृत भाषाज्ञान नसणाऱ्या श्रोतृजनांना सहज समजण्यासारखी सुलभ व सुरस झालेली मराठी भाषेंतील टीका या पुराणाला लिहून समाजाला हित करणारे वेदमूर्ति **सिद्रामय्या शिवय्या जंगम** [पाकणीकर] हेड मास्तर म्युनिसिपल मराठी शाळा सोलापूर यांचे उपकार स्मरणारा.

प्रकाशक.



॥ ॐ ॥

# वस्तुकथा

" वदनं प्रसादसदनं
सदयं हृदयं सुधामुचो वाचः ।
करणं परोपकरणं
येषां, केषां न ते वन्द्याः ॥ १ ॥ "

श्रीपरमेश्वरकी कृपासे ही कभी कभी ऐसे महात्माओंके दर्शन हो जाते हैं। मानव तो लौकिकमहानुभावोंका भी दास बन जाता हैं, फिर अलौकिकमहात्माओंके चरणोंमें यदि उसका जीवन समर्पित हो जाय; तो आश्चर्यही क्या है ? जिनका अवतार जीवोंके देव बनानेके निमित्त ही होने लगा हो; तो बेचारे जीवको क्या अधिकार है कि वह दैवत्वसे वंचित रहे ? प्रत्युत वे तो धन्य और मान्य हैं जो महात्माओंके सत्संगको संपादन करके अपना उद्धारही नही किन्तु निकटभूमिके पापियोंको भी पवित्र कर देते हैं।

बस ! इसी मधुर प्रसंगके उपलक्ष्यमें कुछ निवेदन करनेका अवसर मुझे मिला है। मनुष्य यदि रसज्ञ या भावुक होगा तो अवश्यही अतीत कभी न कभी उनकी स्मृतिपथमें आही जायगा। भला उन माधुर्यभरे और महत्ता-मंजुल सुदिनोंकी क्या कभी विस्मृति हो सकती है ?

पवित्र भारतकी दक्षिण भूमिका नाम सुनते ही धर्मप्राण हिन्दुओंका तेजोमय हृदय नाचने लगता है। क्या शैव क्या वैष्णव क्या स्मार्त; चाहे किसी संप्रदायके महान् आचार्यको आप देखेंगे सभीने दक्षिण भारतमेंही अवतार लिया है। वीरशैव मतके प्रवर्तकोमेंसे पांच मुख्य आचार्योंका जो उन्नत स्थान है उसकी महत्ता बतानेकी कोओी आवश्यकता नहीं है।

उन पंचाचार्योंमें **श्रीजगद्गुरु पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामी** चौथे माने जाते हैं। नामहीसे आपका महत्त्व विदित होता है। पामरोंसे आराधन पाना कोई असाधारण विषय नही है; हां! पंडितोंके आराध्य देव बनना अवश्यही "टेढी खीर" है। भला पंडित कभी अपनेसे बडा किसीको मानेगा? फिर हजारों पंडित मिलकर जिनकी आराधना मुक्तकंठसे करते हों ऐसे श्रीपंडिताराध्य भगवत्पादके जगद्गुरुत्वके बारेमें कुछ लिखना मुझ जैसेका काम नहीं है। आप केवल वेद-आगम-उपनिषत्-पुराण-तर्क-व्याकरण शास्त्रोंके ही पंडित नहीं थे; किन्तु आपने शिवयोगशास्त्र और मोक्षशास्त्रकेभी परिपूर्ण ज्ञानी बनकर सारे दक्षिण भारतवर्षके जीवोंमें अपने विज्ञानमय उपदेशामृतसे पवित्र प्राणलिंगोंकी प्रतिष्ठा कर दी थी। तभीतो श्रीशैलके महोन्नत शिखरमें अपने सूर्यसिंहासनको स्थापित कर सूर्यवत् चमका दिया था; जिसके किरण-रूपी शाखामठोंको उपाचार्योंने रामेश्वरसे लेकर हिमनगेश्वरतकके विशाल भारतमें प्रवर्तित कियाथा। सैकडों वर्ष व्यतीत होनेपरभी श्रीशैल सूर्यसिंहा-सनके पंडिताराध्य गुरूदेवका नामस्मरण हरएक वीरशैवके शुभकार्यमें हो जाता है। सुप्रबोधागम वीरलैंग्योपनिषद् नारायणोपनिषत्—शैवभाष्य आदि ग्रन्थोंसे पंडिताराध्यके जगद्गुरुत्व सूत्रभाष्यकर्तृत्व आदि विषय सुप्रसिद्ध हैं ही किन्तु साधारण मनुष्य समाज इन गंभीर वार्ताओंसे अपरिचित हो बैठे हैं। तभीतो प्राचीन आचार्योंका अनुग्रह और अभिनवाचार्योंका अवतार होगा।

होटगी ग्राममें प्राचीन परंपरानुसार श्री जगद्गुरु पंडिताराध्यके प्रवर्तित वृषभ गोत्रके उपाचार्य लोग अपने बृहन्मठमें विराजमान होते आये हैं। जिनमें बहुतसे आचार्य अपनी निग्रहानुग्रह आदि महाविभूतिसे जगत्प्रसिद्धि पा चुके हैं। पाठक देखेंगे कि उन्हींमेंसे दो एक आधुनिक आचार्योंकी पवित्र जीवनी इस **चन्नबसव विजयमें** कवितारूपसे निबद्ध है।

समुद्रमें नवरत्न तो बहुत पडे हुए हैं, किन्तु उनको समर्थ व्यक्ति ही पा सकता है। उसी तरह **श्री चन्नबसव शिवयोगी** जैसे महात्माको

बालकसमूहसे ढूंढ निकालनेका सफल-श्रेय हमारें परम समर्थ गुरु **श्री चन्नवीर शिवाचार्य महाराज**को है। उस **चपलगांव** से **अचलयोगी** को परखना मामूली बात नही है। इस अलौकिक योगीको अलौकिक विधानसे प्राप्त कर स्वामी बना देनेके उपलक्ष्यमें समाज **श्री चन्नवीर शिवाचार्य**की अधमर्णताको सदा स्वीकार करता है।

काव्य कथानायक **श्री शिवयोगी चन्नबसव महाराज**की महत्वा-ओंसे यह सारा काव्य ही भरा पडा है। उन विषयोंको यहाँ दुहरानेकी कोई आवश्यकता नहीं है। फिरभी उनकी बाल्य कालमें शिवभक्ति, वेदा-गमादि विद्याग्रहणमें शीघ्रशक्ति, गुरूसे उपदेश लेनेकी दृढ आसक्ति, इन्द्रिय दमनमें अद्भुत प्रसक्ति, शिष्योद्धारमें पूर्ण अनुरक्ति, परवादि निग्रहमें प्रचंड युक्ति आदि लीलाएं आपके दिव्य महात्मा होने की साक्षी देही रहीं हैं। सूर्यसिंहासनीय पंडिताराध्यके उपाचार्योंमें यदि ऐसे शिवयोगिरत्न चमक जांय तो आश्चर्य भी नहीं है। आपके अवतारसे होटगी ग्रामही नहीं उस समयमें पूरा सोलापूर प्रांतका उद्धार होचुका है, जिसका स्मृति चित्र अभीतक वीरशैव महाजनोंके निर्मल हृदय दर्पणमें प्रतिबिंबित है। ऐसी धन्य विभूतीकी जीवनवीणाही काव्यगानके रूपमें जयदानंदको उत्पन्न करने योग्य है।

इस काव्यके कवि हैं पंडितवर्य **जगदीशशास्त्रीजी नाल्वार**। इसके सात अध्याय पूर्ण पढनेकेबाद मेरा निश्चय यही रहा कि श्रीपंडितजीके गौरवके अनुरूपही यह पुराण बन पडा है। पं. जगदीशशास्त्रीजी ३०-४० वर्षोंसे सोलापूर वीरशैव संस्कृत पाठशालाके प्रधानाध्यापक पदवीको अनवच्छिन्न रूपसे अपनानेके कारण सुप्रसिद्ध हैं। आपके कलापूर्ण और पांडित्यमंडित पाठ, प्रवचन लोकविश्रुत हैं। यह लिखना अत्युक्ति न होगी कि आपके सैंकडों कर्नाटक-महाराष्ट्र-आन्ध्र देशोंके विद्यार्थी बडे बडे शास्त्री और स्वामी बनकर आज अखिल वीरशैव समाजमें व्याप्त हुए हैं। वीरशैव पंडितोंमें और किसीकी भी इतनी शिष्यसंपत्ति अबतक देखनेमें नहीं आई।

यूं तो यह पुराण है; फिरभी ग्रन्थ कर्ताके साहित्याचार्य होनेके कारण इसमें काव्यत्व सहज रूपसे निबद्ध हुआ है। उदाहरणके लिये श्री चन्नवीर शिवाचार्य वर्णन, [ पृ. १० ] गुरूपदेश, [ पृ. ३६ ] सायव्वा वर्णन [ पृ. १३० ] चन्नबसव योगी जितेन्द्रियतानिरूपण, [ पृ. १३५ ] और पंचमाध्यायका भाग, [ पृ. १४२–४३ ] इत्यादि सुन्दर स्थलोंका निर्देश किया जा सकता है। काव्यकी प्रसादगुणता और धाराप्रवाह–निर्दुष्टशैलीसे पाठक स्वयं प्रभावित हो जावेंगे। वीरशैव सिद्धांतके अष्टावरण आदि विषयोंको पंडितजीने शिवागम और सिद्धांतशिखामणि आदि सुप्रसिद्ध ग्रन्थोंसे लेकर मूलके रूपमेंही सुन्दरतासे समाविष्ट कर दिया है। जिसकी विशुद्धताके विषयमें कहनेका अवसरही नहीं है। आधुनिक वीरशैव पंडितोंमें आपहीका यह संस्कृतकाव्य सर्वप्रथम मुद्रित होकर जनताके सम्मुख उपस्थित है, जिसके कारण ग्रन्थकर्ता पंडित जगदीशशास्त्रीजी बडेही धन्यवाद और प्रशंसाके पात्र हैं।

पुराण मित्रसम्मित होते हैं, याने मित्रकी तरह हितोपदेश करते हैं। पुराण और चरित्र ग्रन्थोंसे उतनेही आदर्श अंशको स्वीकार करना चाहिए कि जो अंश वेद-आगम आदि धर्मशास्त्रके प्रतिकूल न हो। किसी महात्माका केवल चरित्र ही धर्मशास्त्र नहीं होता है। इस रहस्यको नहीं जाननेवाले महाशय अपनी सामान्यताको भूलकर अलौकिक अंशोंसे महात्माओंकी बराबरी करने लगते हैं। उपनिषद्के प्रवक्ताओंका उपदेश है कि " हमारे चरित्रोंमेंसे उत्तम गुणोंका स्वीकार करो; अन्य नहीं "

" यान्यस्माकं सुचरितानि, तानि त्वयोपास्यानि नो इतराणि "— तैत्तिरीयो–शिक्षावल्ली

इसी तरह देवताओंके चरित्रको लेकर विचित्र अनुकरण नहीं करना चाहिये ( न देवचरितं चरेत् ) कहनेका तात्पर्य यह है कि पट्टाधिकारी या दत्तपुत्रको चुननेमें " मठस्थलसमुत्पन्नः शान्तः शैवागमार्थवित् " इत्यादि

धर्मशास्त्रप्रमाणोंके अनुसार सजातीय द्विजबालककोही लेना चाहिये और सदाचारके अनुसारही चलना होगा। किसी महात्माके चरित्रमें यदि धर्मशास्त्रके विपरीत विषय हों तो उसे महात्माओंके उपयुक्त समझकर साधारण लोग उसमें प्रवृत्त न हों।

शिवलिंगनिष्ठा, समजोद्धारपराकाष्ठा, मातृपितृगुरुभक्ति, सदाचारानुरक्ति और इन्द्रियदमनशक्ति आदि पवित्र आदर्शोंको इस चन्नबसव पुराणसे लेकर कोईभी मनुष्य अपना उद्धार और परोपकार कर सकता है। मानव समाजको इन्हीं बातोंकी आवश्यकता है। वीरशैव समाजके महनीयोंसे आशा है कि हमारे प्राचीन शिवयोगियोंके पवित्र आदर्शोंका प्रचार करनेमें अपने आलस्यको छोडकर कटिबद्ध हो जायेंगे।

होटगीबृहन्मठके उपाचार्यपीठपर आजकल **प. ब्र. श्रीचन्नवीर शिवाचार्य महास्वामी** देदीप्यमान हैं। आप अपनी कठिन तपस्याके कारण **बालतपस्वी** से **वीरतपस्वी** तक पहुंच गये हैं। यह मेरा लिखनाही नहीं; आपकी महत्ताको हमारे महाचार्योंनेभी मुक्तकंठसे मानकर आशीर्वादोंसे अनुगृहीत किया है। आपने बाल्यकालसेही वैराग्यसंपन्न होकर तनमन धनको समाजके उद्धारके लिये अर्पित किया है। आप केवल तपस्वीही नहीं हैं; किन्तु तेजस्वी, विद्वान, दयालु, धर्मज्ञ और शिवदीक्षाप्रचारक के रूपमें सदा परिश्रान्त है। इसी कारण आज समाजमें आपकी विख्याति सर्वतोमुखेन व्याप्त है। कस्तूरीकी सुगन्धकेबारेमें सौगन्द खानेकी आवश्यकता नहीं होती है; "नहि कस्तूरिकामोदः शपथेन विभाव्यते" श्रीचन्नवीर शिवाचार्य महाराजके प्रयत्न विशेषहीसे इधर कितनेही सभासम्मेलन संपन्न होकर जागृति उत्पन्न हुई है। और एक बडा महत्वपूर्ण कार्य यह हुआ है कि वीरशैवभूषण धर्मवीर **श्री. शरणप्पा अण्णा फत्तेपुरीजीके** समर्पित बीस हजार (२०,०००) रुपयोंकी महानिधीसे धर्मग्रन्थ मुद्रित होनेकी सुव्यवस्था हो गई है। इस परमधर्मकार्यके लिये श्री. फत्तेपुरीजीकी जितनीभी प्रशंसा की जाय वह

थोडीही है । इस तरह आत्मोद्धार और समाजोद्धारके कारणभूत होकर पवित्र जीवनको बितानेवाले श्री होटगी महाराज किस कोटीके महानुभाव होंगे; यह पाठकोंको सुविदितही है ।

इस ग्रन्थमालाके प्रकाशकोंने मेरे दो. शब्दोंको अवसर देकर मुझे कृतज्ञताबद्ध करही लिया है । पाठक लोगोंसे इस लिये मैं क्षमाप्रार्थी हूं कि बहुतसे अंशोंका निवेदन नहीं कर सका हूं। और यहां उन्हें विस्तार करनेका अवसरभी बहुत कम है ।

चौ० बने जगदीश पंडितकी कृति परधर्मका मूल ।
भुने अवैदिक आचारोंके भूरिबीज निर्मूल ॥
कहे होटगी आचार्योंकी कथा पवित्र विशाल ।
रहे फतहपुर शरणप्पाका राजदान चिरकाल ॥

वीरशैव गुरुकुल
सिकिन्द्राबाद द.

विद्वद्विधेय
चिदिरेमठीय वीरभद्रशास्त्री

शा. १८६४ चित्रभानु—आश्वयुज शु. ११



# विषयानुक्रमणिका.

## अध्याय १ ला.

## अध्याय २ रा.

विषय पृष्ठ



अध्याय ३ रा.

## अध्याय ४ था.

## अध्याय ५ वा.



## अध्याय ६ वा.

## अध्याय ७ वा.

## अध्याय ८ वा.

## अध्याय ९ वा.





# संस्कृत शुद्धिपत्रक.

| अशुद्ध | शुद्ध | अध्याय | श्लोक |
| --- | --- | --- | --- |
| द्ध | द्द | १ | १ |
| ल्ये | ह्ये | ,, | १० |
| त्व | त्त्व | ,, | ८१ |
| स्ट | सृ | ,, | ८८ |
| क्रं | कं | ,, | ८८ |
| म्म | म्भि | ,, | १२७ |
| ना | मना | ,, | १२७ |
| क्र | र्क | ,, | १२८ |
| भ | मर्भ | ,, | १३० |
| पृ | मपृ | ,, | १४५ |
| ज्ञ | ज्ञां | ,, | १४७ |
| सि | श्रि | ,, | १४७ |
| त्वा | त्त्वा | ,, | १५१ |
| ज्व | ज्ज्व | ,, | १६८ |
| भूरिदाक्षिणैः | दक्षिणायुतैः | ,, | १७० |
| ध्या | धा | २ | ३ |
| ज्व | ज्ज्व | ,, | ५ |
| ध्वा | द्धा | ,, | १६ |
| यें | र्थे | ,, | २३ |
| द्धे | द्दे | ,, | ४४ |
| द्ध | द्द | ,, | ४५ |
| द्धो | द्दो | ,, | ४५ |
| घ | ध | ,, | ६६ |
| त्व | त्त्व | ,, | ८७ |
| त्व | त्त्व | ,, | १०० |
| त्व | त्त्व | ,, | १०१ |
| त्वं | त्त्वं | ,, | १२५ |
| ध्वा | द्धा | ,, | १७० |

| अशुद्ध | शुद्ध | अध्याय | श्लोक |
|---|---|---|---|
| कु | कृ | २ | २०४ |
| र | रं | ,, | २१३ |
| श्रु | शृ | ३ | ११९ |
| दृ | दु | ,, | १३३ |
| द्ध | ब्द | ,, | १४२ |
| शृ | श्रु | ,, | १४२ |
| शृ | श्रु | ,, | १४९ |
| साद: | प्रसाद: | ,, | १६७ |
| द्ध | ब्द | ४ | ४१ |
| पुनीतकम् | तु पावनम् | ,, | ८६ |
| पुनीतां | पवित्रां | ,, | १३४ |
| त्वि | च्चि | ,, | १४२ |
| णः | नः | ५ | ६ |
| ज्ब | ज्ज्व | ,, | ३३ |
| ज्व | ज्ज्व | ,, | ६९ |
| पत्तने सर्ववीधिषु | सर्ववीथीषुपत्तने | ,, | ७७ |
| ध्वा | द्धा | ,, | १०६ |
| त्वं | च्चं | ,, | ११६ |
| श्रुं | शृं | ६ | ९ |
| त्वो | च्चो | ,, | १८ |
| श्रु | शृ | ,, | ५५ |
| गायनैर्गा | गानैस्तु गा | ,, | १०९ |
| क् | ग् | ,, | १६३ |
| ध्य | घ्य | ,, | १६३ |
| त्वि | च्चि | ७ | ४८ |
| किंचि | काश्चि | ,, | ६६ |
| सि | शि | ८ | २ |
| काश्यपेः | सूर्यस्य | ,, | १७ |
| पण्य | पुण्य | ,, | १३२ |

॥ श्रीरस्तु ॥

ॐ नमः पंचजगद्गुरुभ्यः

# श्री. ष. ब्र. चन्नबसवविजयपुराणम् ः



शब्दार्थाविव संसक्तौ शिवौ वंदे शिवाप्तये ॥
यद्दांपत्यं जगत् सूते चराचरमनूपमम् ॥ १ ॥

तानीडे जगदाचार्यान् पंच लिंगसमुद्भवान् ॥
वीरशैवमतं यैरास्थापितं ख्यापितं भुवि ॥ २ ॥

नरनागाकृति ज्योतिस्तज्जीयात्सुखहेतवे ॥
यद्विघ्नध्वांतमुन्मूल्य भासयत्यर्थसंचयम् ॥ ३ ॥

---

१ ज्या दांपत्याकडून हें अनुपम्य असें चराचर जग निर्माण केलें जातें. आणि शब्द व अर्थ यांचेप्रमाणें केव्हांही अलग नसणाऱ्या, अशा त्या शिवपार्वतींना मंगलप्राप्तीकरितां नमस्कार करतों.

२ ज्या आचार्यांकडून हें वीरशैव मत स्थापित करून भूलोकीं त्याचा प्रसार केला गेला अशा त्या सोमनाथादि पंचलिंगसमुद्भव जगद्गुरु पंचाचार्यांची स्तुति करितों.

३ ज्या ज्योतीकडून विघ्नरूपी अंधःकाराचा नाश करून अनंत पदार्थ भासविले जातात असें तें नरनागाकृति तेज [ गजानन ] जगकल्याणा करितां अबाधित असो.

अनादृत्य शिवं दक्षः क्रतुं कुर्वन् प्रशासितः ॥
येन तं भद्रकालीशं वीरभद्रं भजे हृदि ॥ ४ ॥

संसारसागराद्भक्तोत्तारकं तारकांतकम् ॥
षाण्मातुरं शक्तिधरं प्रपद्ये शरणं सदा ॥ ५ ॥

शिवयोगसुखास्वादाधरीकृतधरासुखः ॥
स्वर्णवल्लीपुराधीशः सिद्धरामोऽस्तु मे गतिः ॥ ६ ॥

कर्तुमकर्तुमयथाकर्तुमीशा जगत्त्रये ॥
शिवपारिषदाः संतु दुरितक्षयकारकाः ॥ ७ ॥

कुंभसंभवदूर्वासःश्वेतसानंदमुख्यकाः ॥
ऋषयो वीरशैवास्ते भवंतु ज्ञानहेतवः ॥ ८ ॥

---

४ शंकरासारख्या देवास न जुमानतां यज्ञ चालविलेल्या दक्षास ज्यानें शासन केलें अशा त्या भद्रकालीपति वीरभद्राची मी अंतःकरणांत स्तुति करतों

५ भवसागरांतून भक्तांना तारून नेणारा, तारकासुराचा संहार करणारा, सहामातांचा पुत्र म्हणविणारा, शक्त्यायुध धारण करणारा अशा त्या षण्मुण स्वामींना मी नेहमीं शरणागत आहें.

६ शिवयोग सुखानुभवाच्या योगानें भूलोकचीं सुखें तुच्छ समजून त्यांचा तिरस्कार करणाऱ्या सोलापुराधीश अशा सिद्धरामा, मला तुझाच आधार असो.

७ तिन्ही लोकांत कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् असें प्रचंड सामर्थ्य असणारा असा प्रमथगण माझ्या सर्व पापांचा नाश करणारा होवो.

८ अगस्त्य, दुर्वास, श्वेत सानंदादि वीरशैव महर्षि मला ज्ञान-दाते होवोत.

सद्गुरुमठमूर्धन्यं वीरेशं द्विजपुंगवम् ॥
पितरं पितृभक्त्यार्द्रमनसा शिरसा भजे ॥ ९ ॥
यस्या वत्सलताकल्पवल्ल्येत्यापत्यभूरुहम् ॥
पल्लवैश्च प्रसूनैश्च फलैर्निर्भरतामगात् ॥ १० ॥
तस्याश्च वीरसांबायाश्चरणौ कमलारुणौ ॥
अव्याजभक्तिपुष्पाणां संदोहैरर्चयाम्यहम् ॥ ११ ॥
दुर्गमं कवितामार्गमियासुर्हसनास्पदम् ॥
आरुरुक्षुर्महाशृंगमद्रेः पंगुरिवास्म्यहम् ॥ १२ ॥
दुस्तरं यन्मुनेश्चित्रचारित्र्यपयसां निधिम् ॥
तितीर्षोर्मेऽप्रगल्भस्य तरीभवतु तत्कृपा ॥ १३ ॥
या कथा श्रोतृवर्गाणां दोषध्वंसं करोति सा ॥
स्वसेविनीं रसज्ञां मे दोषमुक्तां विधास्यति ॥ १४ ॥

---

९ सूगूरु मठाध्यक्ष द्विजश्रेष्ठ अशा ' विरेश ' पित्यांची पितृभक्त्यार्द्र मनानें व मस्तकानें सेवा करितों.

१०-११ ज्या मातेची वात्सल्यप्रेमरूपीं वेल अपत्यरूपीं वृक्षाश्रयानें पर्ण फलपुष्पांनीं निर्भर झाली आहे अशा त्या ' वीरमांबा ' मातेच्या कलमाप्रमाणें तांबूस चरणांची निरपेक्ष भक्तिरूपीं पुष्पांनीं मी पूजा करितों

१२ दुर्गम अशा काव्यमार्गाचा मी अवलंब करीत असल्यानें तें —अति दुर्गम व उंच अशा पर्वतावर चढूं इच्छिणाऱ्या लंगड्या माणसाप्रमाणें— जनहास्यास्पद होत आहे.

१३ ज्या मुनींच्या [ चरित्र नायक ] चारित्र्यरूपीं दुस्तर अशा महासागरांतून तरून जाण्याची अपेक्षा करणाऱ्या असमर्थ अशा मला त्यांची कृपारूपीं नाव मिळो.

१४ ज्या चरित्रनायकांचें चरित्र, ऐकणाऱ्या लोकांचे दोष नाहींसे करतें, तें—त्या चरित्राची सेवा माझे जिव्हेकडून होत असल्यानें—माझ्या जिव्हेच्या दोषांचा साहजिकच नाश करील.

प्रबंधस्य प्रबंधुश्च मूलं कीर्तिप्रतिष्ठयोः ॥
महोदारधियो नेतुर्गुणानां सन्निरूपणम् ॥ १५ ॥
कवेर्मंदाऽपि धीशक्तिर्नेतुर्गुणगणाश्रयात् ॥
सद्भिराद्रियते काचमणिः कांचनतो यथा ॥ १६ ॥
शास्त्राद्यथा चतुर्वर्गफलप्राप्तिर्भविष्यति ॥
तथैव पुण्ययशसो नेतुः सच्चरितादपि ॥ १७ ॥
सुदुस्तराणि तप्त्वा यस्तपांसि प्रातिवत्सरम् ॥
ध्रुववद्बालभावेऽपि ख्यातनामाऽभवद्भुवि ॥ १८ ॥
कृत्वा दीक्षां यथाशास्त्रमुपदिश्य महामनुम् ॥
सहस्रशो जना येन कृताः सन्मार्गगामिनः ॥ १९ ॥
भाले यस्य त्रिपुंड्राणि भांति भास्वरभस्मनः ॥
स्रोतांसि त्रीणि गंगाया यथा गिरिशिलातले ॥२० ॥

---

१५ ग्रंथ व ग्रंथकर्ता यांची प्रतिष्ठा व कीर्ति यांना उदारबुद्धियुक्त नायकांचे गुणांचें स्वरूप वर्णन हेंच कारणीभूत असतें

१६ ग्रंथकर्त्याचें बुद्धिसामर्थ्य मंद असलें तरी तो—काचेचा मणीं सुवर्णाश्रयामुळें लोकादरास पात्र होतो त्याप्रमाणें—चरित्रनायकांच्या सद्गुणाश्रयानें सज्जनादरास पात्र ठरतो.

१७ वेदागमादि शास्त्रांपासून धर्म, अर्थ, काम, मोक्षरूपीं चतुर्वर्ग फलप्राप्ति होते. त्याप्रमाणें सत्कीर्तियुक्त चरित्रनायकांच्या चरित्रापासूनसुद्धां वरील चतुर्वर्ग फलप्राति होते.

१८ जे उत्तानपाद राजाच्या ध्रुवनामक पुत्राप्रमाणें बाल्यावस्थेंत दरसाल दुस्तर अशी तपश्चर्या करून जगांत कीर्ति मिळवून प्रसिद्धीस आले.

१९ ज्यांनीं शास्त्राधारास अनुसरून शिव—दीक्षा देऊन महामंत्राचा [ शिवपंचाक्षराचा ] उपदेश करून हजारों लोकांना रुन्मार्गगामी केलें.

२० हिमालयावरील मोठ्या सपाट शिळेवरून देवगंगेचे तीन प्रवाह समांतर वाहात जातांना जें सौंदर्य दृष्टोत्पत्तीस येतें तेंच सौंदर्य ज्यांच्या विशाल कपाळावरील त्रिपुंड्र भस्म धारणेनें दिसतें.

शिवमंत्रजपारावमंजुलं यन्मुनेर्मुखम् ॥
विजिगाय भ्रमद्भृंगमुखरांभोजनिश्रियम् ॥ २१ ॥
लोकलोचनरोलंबनिकुरुंबसुखास्पदम् ॥
शिवाचार्यस्य यस्य श्रीसदनं वदनांबुजम् ॥ २२ ॥
निगमागमवेदांतविचारविलसन्मतिः ॥
यः काव्यशास्त्रपाथोधेस्तलालोडनमंदरः ॥ २३ ॥
योऽसावंतेवासिनीभ्यामपि विद्योपदेशतः ॥
सुधीभागीरथीरत्नाम्बाभ्यां द्वैमातुरो मुनिः ॥ २४ ॥
कंदर्पाखर्वगर्वोच्चैःखर्वीकरणपंडितः ॥
ब्रह्मचर्यपराकाष्ठानिष्ठानिर्धूतकल्मषः ॥ २५ ॥
धूर्तोपादितदुस्स्थित्या दुरीक्ष्यं यद्गुरुस्थलम् ॥
यस्तदुद्धरणे बद्धकटिः कौटिल्यवर्जितः ॥ २६ ॥

---

२१ गुंजारव करणाऱ्या भ्रमरांचें सानिध्य असलेल्या कमळाची शोभा ज्यांच्या शिवपंचाक्षर मंत्राच्या ध्वनिसानिध्यामुळें मंजुळ अशा मुखानें जिंकली आहे.

२२ ज्या शिवाचार्यांचें मुखकमल जननेत्ररूपीं भ्रमर समूहांच्या सुखाला कारणीभूत होऊन शोभत आहे.

२३ वेद, आगम, वेदांत यांच्या विचारानें तेजस्वी बुद्धीनें युक्त होऊन जे काव्यशास्त्ररूपीं समुद्र मंथनांत मंदर पर्वताप्रमाणें झाले आहेत.

२४ पार्वती व गंगा या दोन मातांचा पुत्र गणपती याप्रमाणें मंत्र उपदेशानें भागीरथीबाई कटाप व रत्नांबा हिरेहब्बू या दोघी शिष्यिणी असल्या तरी ज्यांना माता होऊन राहिल्या आहेत.

२५ मन्मथाच्या मोठ्या गर्वाचा नाश करण्यामध्यें कुशल, आणि ब्रह्मचर्यावरील पूर्ण निष्ठासामर्थ्यानें सर्व पापांचा नाश करण्यांत कुशल,

२६ दुष्टांच्या कुटिल कारस्थानामुळें गुरुवर्गांना प्राप्त झालेल्या दुःस्थि-तीचा नायनाट करण्याकरितां कौटिल्यवर्जित अशा ज्यांनीं कंबर कसून प्रयत्न चालविला आहे.

...

प्रमादादप्यनिक्षिप्तपदोऽनाचारपद्धतौ ॥
स्वप्नेप्यस्मृतशारीरभोगो यो भास्वतां वरः ॥ २७ ॥
यन्मुनेर्मित्रमाभाति गंगाधरगुरूत्तमः ॥
बेंगल्लूरुपुराराध्यो महांतिनमठाधिपः ॥ २८ ॥
यथाऽऽदर्शान्मुखं बिंबप्रतिबिंबाभिधं तथा ॥
शरीरोपाधितश्चोभौ भिन्नाख्यौ भेदवर्जितौ ॥ २९ ॥
अनयोस्सौहृदं सम्यगविनश्वररूपकम् ॥
क्षीरमाधुर्यवद्गंधसुमवद्रामणीयकम् ॥ ३० ॥
गुरुवर्गमहाराज्यपरावनपरायणौ ॥
तद्विभागं विधायेव दक्षिणोदग्दिशोर्भृशम् ॥ ३१ ॥
गंगाधरशिवाचार्यो दक्षिणां दिशमाश्रितः ॥
सर्वेषु वीरशैवेषु वेदागमवचोमृतैः ॥ ३२ ॥

---

२७ जे अनाचार मार्गाचा चुकूनसुद्धां अवलंब करीत नाहींत, शारीरिक भोगवासना ज्यांना स्वप्नांतसुद्धां स्पर्श करूं शकत नाहीं, व जे तेजस्वी आणि श्रेष्ठ आहेत.

२८ गुरुश्रेष्ठ, बेंगळूर शहरवासियांस पूज्य, महांतिनमठाध्यक्ष असे गंगाधर शिवाचार्य हे ज्या मुनींचें मित्र आहेत.

२९ मुख एकच असलें तरी आरशामुळें तें बिंब व प्रतिबिंब या दोन स्वरूपांत दिसतें, त्याप्रमाणें गंगाधर शिवाचार्य व चन्नवीर शिवाचार्य हे शरीर उपाधीमुळें भिन्न नावांनीं भासत असले तरी ते एकच आहेत.

३० केव्हांही नाश न पावणारें या दोघांचें मित्रत्व—दुधाचे ठिकाणची गोडी व फुलांतील वास याप्रमाणें—मनोहर आहे.

३१ गुरुवर्गरूपीं साम्राज्याचें रक्षण करण्यांत गढून गेलेले हे दोघे त्या साम्राज्याचे जणूं काय दक्षिण व उत्तर असे दोन भाग करून

३२ त्यांपैकीं गंगाधर शिवाचार्य हे दक्षिण भागाचा आश्रय करून तिकडील

वर्णाश्रमोचिताचारविचारान् संप्रचारयन् ॥
तपःसंपत्तिसौभाग्यं वर्धयन् किल वर्तते ॥ ३३ ॥

तथैव चन्नवीराख्यः शिवाचार्यः शिवव्रती ॥
कौबेरीं दिशमाश्रित्य करोति मतपालनम् ॥
तस्यास्य होट्गिपट्टाधीशस्याज्ञावशंवदः ॥ ३४ ॥

वीरगोत्रसमुत्पन्नः पड्विडीसूत्रसूत्रितः ॥
श्रीमद्रेणुकपादाब्जधूलिधूसरषट्पदः ॥ ३५ ॥

जगदीशबुधो वक्ता श्रोतारो भक्तिभाग्जनाः ॥
नेता चन्नवृषाचार्यश्चतुर्वर्गः फलं किल ॥ ३६ ॥

अस्ति प्रशस्तसंपद्भिर्विबुधैश्च पुरातनम् ॥
स्वर्णवल्लीपुरं रम्यं समीकृतसुरालयम् ॥ ३७ ॥

---

३३ सर्व वीरशैवांच्या ठिकाणीं वेदागम वचनांच्या उपदेशानें वर्ण व आश्रम यांना उचित अशा आचार विचारांचा प्रसार करीत व तपःसंपत्तीची वाढ करीत आहेत.

३४ व दुसेरे शिवव्रती चन्नवीर शिवाचार्य हे उत्तर भागीं असून वरील प्रमाणेंच वीरशैव मताचें परिपालन करीत आहेत; अशा त्या होटगी पट्टाधिकाऱ्यांचा आज्ञाधारक

३५ वीर गोत्रोत्पन्न, पडविडी सूत्रधारी, श्री रेणुकाचार्यांच्या पदकमलरजांनीं मलिन झालेला भ्रमर,

३६ असा वक्ता जगदीश पंडित, भक्तिवान् श्रोते, ग्रंथनायक श्री चन्न बसव शिवाचार्य, अशा चरित्र ऐकण्यापासून धर्म, अर्थ, काम मोक्ष अशी चतुर्वर्ग फल प्राप्ति होते.

३७ महा ऐश्वर्य संपन्न, पंडितांनीं मंडित, अति प्राचीन, सुंदर व स्वर्गतुल्य असें हें सोलापूर नांवाचें शहर आहे.

तस्य दक्षिणदिग्भागमाश्रित्य हृदयंगमः ॥
होट्गिगीनामकग्रामश्चकास्ति धरणीतले ॥ ३८ ॥
तत्रास्ति पंडिताराध्यशिवाचार्यजगद्गुरोः ॥
श्रीशैलसिंहपीठाधिनायकस्य शिवाश्रियः ॥ ३९ ॥
मुक्तागुच्छमहासूत्रसूत्रितस्य सुतेजसः ॥
वृषगोत्राधिनाथस्य भवांबुधिमहातरेः ॥ ४० ॥
शाखामठः शिखाभस्मशिवलिंगधरान्वितः ॥
अंतेवासिवटुव्रातवेदाध्ययनमंजुलः ॥४१ ॥
शिवोपासनसंसक्तैः शिवलांछनधारिभिः ॥
शिवनामजपच्छिन्नकिल्बिषैः परिभूषितः ॥ ४२ ॥
धौतांबरपरीधानैर्मज्जनोज्वलकांतिभिः ॥
भस्मत्रिपुंड्रविभ्राजद्वदनैर्वर्तनोत्तमैः ॥ ४३ ॥

---

३८ अशा या सोलापूर शहराच्या दक्षिण भागीं मनोहर असें होटगी नांवाचें गांव या भूलोकावर विराजमान आहे.

३९-४० तेथें श्रीशैल सिंहासनाधिपति, मुक्तागुच्छ सूत्राधिकारी, महातेजस्वी, वृषभगोत्रनायक, भवसागरांतून तरून जाणाऱ्यांना नौकारूपी, अतिशोभायमान अशा जगद्गुरु पंडिताराध्य शिवाचार्यांच्या, शाखेचा मठ आहे. तो मठ—(ब्रह्मचारी) शिष्य शिखा, भस्म, शिवलिंग धारण करणाऱ्यांनीं युक्त.

४१ वटु—समुदायाच्या वेदाध्ययन घोषानें मंजुळ झालेला.

४२ शिवपूजेंत आसक्त असलेले, शिवलांछन धारण करणारे, शिव-नामाच्या जपानें दोषमुक्त झालेले अशा प्रकारच्या शिष्य वृंदांनीं शोभायमान असलेला,

४३ स्नानामुळें उज्वल कांतियुक्त, धुतलेलें वस्त्र ( सोंवळें ) परिधान करणारे, भस्माच्या त्रिपुंड्रानें शोभायमान मुखाचें, सद्वर्तनी,

आचार्यदर्शनायातबालस्त्रीपुंगजव्रजैः ॥
हर्षोद्रेकात्कृतस्तोत्रध्वानैर्निध्वनितांबरः ॥ ४४ ॥
प्रांगणोद्यानसंरूढबालपादपसेचने ॥
निरता यत्र वटवः स्वानुरूपघटोदकैः ॥ ४५ ॥
आलवालानि संपूर्य पक्षिपानाय दूरगाः ॥
आसंश्च महतां चेतः सानुकंपं शरीरिषु ॥ ४६ ॥
यत्र सत्कारवैशिष्ट्यादायातातिथयो जनाः ॥
विस्मृत्य गृहसौख्यानि चाभवन् गमनालसाः ॥ ४७ ॥
तस्मिन्मठे शिवाचार्यश्चन्नवीराभिधो व्रती ॥
भानुर्व्योम्नीव भाति स्म मंदार इव नंदने ॥ ४८ ॥
आजानुबाहुरुरसा तिरस्कृतकवाटकः ॥
अष्टमीचंद्रसंकाशललाटफलकः प्रभुः ॥ ४९ ॥

---

४४ आचार्यांच्या दर्शनाकरितां आलेल्या स्त्रीपुरुषादि आबालवृद्धांच्या समुदायानें अत्यानंदित होऊन त्या आनंदभरानें केलेल्या स्तोत्रांच्या घोषानें प्रतिध्वनि होणारीं अशी पोकळी असलेला,

४५–४६ ज्याचे आंगणांतील बागेंत वाढलेल्या रोपट्यांना पाणी घाल-ण्याकरितां आपापल्या शक्त्यनुसार कळशांनीं वाफ्यांतून भरपूर पाणी घालून, तो वटुसमूह पक्ष्यांना निर्भयपणें जलपान करण्याकरितां दूर जात होता. ( तात्पर्यः–उदार माणसांचीं अंतःकरणें प्राणीमात्राविषयीं दयाळू असतात. )

४७ ज्या मठांत आलेल्या अतिथींचा इतका चांगल्या प्रकारें सत्कार केला जातो, कीं त्या सत्कारानें ते मोहित होऊन आपलीं घरेंदारें व बायकामुलें वगैरेचें विस्मरण होऊन परत जाणें त्यांना सुचतच नाहीं.

४८ त्या मठांत ‘ चन्नवीर शिवाचार्य ’ म्हणून एक तपस्वी आकाशांत सूर्याप्रमाणें, अथवा नंदनवनांत मंदार वृक्षाप्रमाणें शोभत होते.

४९ ते आजानुबाहु, दरवाजाच्या झडपांप्रमाणें विशाल वक्षस्थलाचे, अष्टमीच्या चंद्राप्रमाणें विशाल व वक्र अशा कपाळाचे,

कर्णांतायतनेत्राब्जः श्रीकारानुकृतिश्रवाः ॥
दाडिमीबीजनीकाशरदनो मदनांतकः ॥ ५० ॥
शान्तावलोकनैः क्रूरानपि जंतून् शमं नयन् ॥
एनसां दहनं धाम वीक्षणक्षममावहन् ॥ ५१ ॥
शरदिंदुकराल्हादैरुज्वलैरूर्ध्वसार्पिभिः ॥
देहतेजोभिरालोभ्यैः स्थितः प्रांशुरिवानघः ॥ ५२ ॥
प्रसादगुणमंगस्य प्रकर्षेण वहन्नयम् ॥
असंस्तुतजनस्यापि सस्नेहं कलयन् मनः ॥ ५३ ॥
निसर्गसौम्यविस्रंभविशेषैर्वलितदृशा ॥
स्थितः कृतोपसंभाष इव संयमिकेसरी ॥ ५४ ॥
छिन्नाशापाशजालः श्रीभस्मच्छन्नकलेवरः ॥
रुद्राक्षमालाकलितवक्षस्स्थलमनोहरः ॥ ५५ ॥

---

५० कानापर्यंत लांब असलेल्या नेत्राचे, श्रीच्या आकाराच्या कर्णाचे, दाळिंबबीजांप्रमाणें दांत असलेले, मदनाचा अंत केलेले.

५१ ज्यांच्या शांत अवलोकनानें क्रुर प्राणीसुद्धां शांत वृत्तीचे बनत ज्यांचें तेज भयंकर पापांचा नाश करीत असलें तरी तें चंद्राप्रमाणें दर्शनीय होतें,

५२ चंद्रकिरणांप्रमाणें आल्हादकारक, उज्वल, वर उफाळणारें व सुंदर अशा शरीरकांतीमुळें ते उंच आहेत कीं काय! असे दिसत होते.

५३ ज्यांच्या शरीरकांतीच्या वैशिष्ठ्यानें अपरिचित मनुष्याचें मनांत-सुद्धां प्रेम उत्पन्न होत असे.

५४ ज्या मुनींच्या नैसर्गिक, सौम्य विश्वसनीय अशा नुसत्या पाह-ण्यानें संभाषणानें मिळणारा आनंद लोकांना प्राप्त होत असे.

५५ ज्यांचे आशापाश नाश झालेले आहेत, शरीर भस्मानें नेहमीं सुशोभित असे, रुद्राक्ष मालेनें ज्यांचे वक्षस्थळ सुंदर दिसत असे.

संसारानलदंदह्यमानं मानवमात्मनः ॥
कृपापयःप्रवाहेण लंभयन् शांतिमन्वहम् ॥ ५६ ॥

कुलक्रमागताचारः कुलीनजनगोचरः ॥
लिंगांगस्थलतत्त्वज्ञो लिंगनिष्ठापरायणः ॥ ५७ ॥

प्रतिसंवत्सरं शिष्यगृहानेत्य गुणालयः ॥
गृहिधर्मान्समादिश्य शैवधर्मानपि प्रभुः ॥ ५८ ॥

यथासंतोषमनघमन्तेवासिजनाहृतम् ॥
गृण्हात्युपायनं पौष्पं रसं मधुकरो यथा ॥ ५९ ॥

इत्थं संचारपूतानि दिनानि गमयन्नभूत् ॥
परोपकारचित्तानां दिनाचारो हि तादृशः ॥ ६० ॥

आयातः शिशिरः कालः शैत्यसौरभ्यसंपदा ॥
युक्तेन मरुतोध्दूतपौष्पपांसुभिराकुलः ॥ ६१ ॥

---

५६ जे मुनि संसाररूपीं अग्नीनें तप्त झालेल्या लोकांना आपल्या कृपा-रूपीं जलप्रवाहानें शांत करीत होते.

५७ जे मुनि कुलाचार संपन्न, कुलीन जनगोचर, लिंगांगस्थल तत्व जाणणारे व लिंगनिष्ठेंत गढून गेलेले असे होते.

५८ सद्गुण संपन्न असे ते मुनि दरवर्षी शिष्यांचे घरीं जाऊन त्यांना गृहस्थ धर्म, वीरशैव धर्म, वगैरेंचा उपदेश करीत,

५९ फुलांतील मध भुंगा ज्याप्रमाणें फुलाला कोणत्याही प्रकारचा त्रास न होता ग्रहण करतो त्याप्रमाणें ते मुनि शिष्यवर्गाकडून स्वसंतोषानें मिळेल त्या कांडकेचा ( देणगी ) स्वीकार करीत होते.

६० अशा प्रकारें संचार करण्यानें ते मुनि दिवस पवित्र करीत होते. ( तात्पर्यः—परोपकारी महापुरुषांची दिनचर्या अशीच असते. )

६१ शीत, सुगंध वगैरे संपत्तियुक्त अशा वायूच्या वाहण्यानें कंपित होणाऱ्या फुलांच्या धुळीनें व्याप्त झालेला असा शिशिरऋतूचा काल आला.

विहाय शिशिरं मासं को गुणो नः कुचोष्मणः ॥
इत्यपास्य क्रुधं कांताः कांतांस्तान् परिरेभिरे ॥ ६२ ॥

लवंगपुष्परजसा मलिना अलयस्त्विति ॥
विकसद्भिः पुरः पुष्पैरहसन् कुंदवल्लयः ॥ ६३ ॥

अभिषेणनमाधातुमाव्हयन्निव मन्मथम् ॥
लोध्रपुष्परजोराशिर्व्यानसे ( शे ) ककुभंतरम् ॥ ६४ ॥

माघे मंदकरो भानुर्नाभूच्छैत्यापहारकः ॥
बलवानप्यरौ कालवशाद्भवति दुर्बलः ॥ ६५ ॥

फलिनीः पुष्पयन् रावैरलिनीनां मदोत्कटैः ॥
भर्त्सयन् शैशिरो वायुर्वामशीलाः स्त्रियो ववौ ॥ ६६ ॥

---

६२ हा शिशिर काल फुकट घालविल्यास आमच्या कुचाचे ठिकाणीं असलेल्या उष्णतेचें महत्त्व कांहींच रहात नाहीं ह्मणून पुरुषांवर रागावून रुसून बसलेल्या स्त्रियांनीं राग सोडून पुरुषांना आलिंगिलें.

६३ शिशिर काळांत फुलांनीं प्रफुल्लित झालेल्या जाईच्या वेली जणूं काय—लवंगाच्या फुलांतील पराग कणांनीं मलिन झालेल्या ( रजस्वला स्त्रीशीं उपभोगलेल्या पापी पुरुषाप्रों ) भुंग्यांना पाहून—हासत आहेत.

६४ लोध्र पुष्पाच्या पराग कणांनीं सर्व आकाश व्यापून टाकल्यामुळें ते जणूं काय सैन्यासह परचक्रावर स्वारी करण्याकरितां मन्मथाला बोलावीत आहेत.

६५ माघ मासातील मंद किरणयुक्त सूर्य शीतता नाहींशीं करण्यास समर्थ झाला नाहीं. बरोबर आहे कारण-बलवान् सुद्धां कालवश झाल्यास शत्रु-विषयीं असमर्थ बनतो.

६६ शिशिर ऋतूंतील वायु—वेलींना प्रफुल्लित करून मदानें उत्कट झालेल्या स्त्री भ्रमरांच्या ध्वनींनीं-पुरुषांशीं प्रतिकुल झालेल्या स्त्रियांना जणूं काय धमकावीत-वहात होता.

शीतवातोच्चलितया लतयाऽऽश्लिष्टभूरुहम् ॥
न विषेहे प्रियाश्लेषविहीनस्तरुणोऽप्यपि ॥ ६७ ॥

तत्प्रभाते समुत्थाय शिवनामपुरस्सरम् ॥
अधितल्पं जना वृद्धाः शिवस्तोत्राण्यकुर्वत ॥ ६८ ॥

शौचाचमानमाधाय मज्जनोज्वलितांगकाः ॥
आर्चयन्नंगजारातिं के चित्पत्रसुमादिभिः ॥ ६९ ॥

केचिच्छैवाः शिवागारे शिवलिंगार्चकांस्तदा ॥
मोदयामासुरत्यंतं शंखघंटादिवादनैः ॥ ७० ॥

अपाठयन् वटून् वेदानाश्रमेषूषसि स्थितान् ॥
कारीषवन्हयो ये च शीतवातोग्रपीडिताः ॥ ७१ ॥

जलाशयेऽवगाह्यार्द्रवसनाः शीततार्दिताः ॥
उच्चेरुरतिसीत्कारं शिवनामानि कर्मठाः ॥ ७२ ॥

६७ शीतल वायूच्या वाहण्यानें एक वेल जवळच्या झाडाला बिलगलेली पाहून तें स्त्री विरहित तरुणाला थोडें सुद्धां सहन झालें नाहीं.

६८ या शिशिर ऋतूंत प्रातःकालीं शिव शिव ह्मणत उठून वृद्ध माणसें अंथरुणावर शिवस्तोत्र गात होते.

६९ कांहीं लोक शौचमुखमार्जनादि प्रातर्विधि आटोपून, स्नानानें देह पवित्र करून पत्र, पुष्प धूपादिकांनीं शिवपूजा करीत होते.

७० तसेच कांहीं शैव लोक देवाल्यामध्यें शिवपूजा करणाऱ्यांना शंख घंटादि वाद्यांनीं उत्साहित करीत होते.

७१ रानशेण्यांचा विस्तव थंडीनें काकडून गेलेल्या आश्रमांतील वटूंची थंडी नाहीशीं करून त्यांचेकडून वेदपठण [वेदपठणास समर्थ] करवीत असे.

७२ कांहीं कर्मठ लोक जलाशयांत स्नान करून ओलेल्यानें व थंडीग्रस्त झाल्यानें गद्गदत तोंडानें शिवनामोच्चार करीत होते.

पिंषंति सांगनावर्गा धान्यानि च गृहे गृहे ॥
घरट्टगर्गरध्वानैर्मिश्रितात्मस्वनोज्वलाः ॥ ७३ ॥
अगायन् काश्चिदीशस्य भक्त्या नामानि केवलं ॥
काश्चिदात्मजनामानि काश्चिदन्यानि मोहिताः ॥ ७४ ॥
पेषणासक्तनारीणां गायनध्वनयस्तदा ॥
सुखसुप्तिमपत्यानामकुर्वन्मृदुमंजुलाः ॥ ७५ ॥
वापीकूपतडागेषु निर्मलानि जलानि वै ॥
अगस्त्योदयमाख्यांति प्रभातप्रायतां निशः ॥ ७६ ॥
कमलेभ्यः समुद्यातभ्रमरश्रेणिराबभौ ॥
स्मरखड्गलतेवोच्चैर्वियोगिहृदयार्दिनी ॥ ७७ ॥
पक्षिणो वृक्षशाखासु धुन्वन्तः पक्षतीर्मुहुः ॥
उदगुः स्वेष्टकाष्ठाः प्रकुर्वतः स्वरमुच्चकः ॥ ७८ ॥

---

७३ स्त्रिया यावेळीं जात्याच्या घर्घर अशा निघणाऱ्या आवाजांत आ.ल्या आवाजाचें मीलन करून घरोघर धान्य दळीत होत्या.

७४ दळतांना कांहीं स्त्रिया ईशस्तुती गात होत्या, कांहीं मुलाबाळां-वरचीं गाणीं गात होत्या व कांहीं अजाण स्त्रिय या विरहित इतर भाकड गाणीं गात होत्या.

७५ दळणांत गुंग होऊन गेलेल्या स्त्रियांचीं मंजुळ गाणीं त्यांच्या मुलाबाळांना झोंपी जाण्यास मदत करीत होतीं.

७६ त्यावेळीं-आड विहिरी, तळीं यांच्या पाण्याची स्वच्छताही अगस्त्य नक्षत्राचा उदय व प्रांतःकालची वेळ दर्शवीत होती.

७७ प्रातःकालीं विकसित झालेल्या कमलांतून वर उडणारी भ्रमरपंक्ति विरही माणसांच्या हृदयाला पीडा करणाऱ्या मन्मथखड्गाप्रमाणें भासत होती.

७८ पक्षी समुदाय वृक्षांच्या डहाळीवर आपल्या पंखांना पुन्हा पुन्हा हालवीत व मंजुळ आवाज करीत मनसोक्त दिशेकडे जाते झाले.

कूजतां द्रुमशाखासु खगानां मंजुलं स्वरम् ॥
अन्वकुर्वन्नु गच्छंतः शालां पथि च बालकाः ॥ ७९ ॥

हालिका हलमुख्यानि गृहित्वा साधनानि ते ॥
गायंतो ग्राम्यपद्यानि ययुः क्षेत्राणि चात्मनाम् ॥ ८० ॥

बालातपेन तरणिः शैत्यं सत्वगणार्दनम् ॥
आविरासीदपाकुर्वंस्तदाऽऽचार्यवरो मुनिः ॥ ८१ ॥

रुद्रैकादशिनीमंत्रैर्नमकैश्चमकैः शिवम् ॥
लिंगरूपं महादेवं स्नापयित्वा शुभैर्जलैः ॥ ८२ ॥

भस्मगंधाक्षतैः शुभ्रैर्बिल्वैरच्छिद्रकोमलैः ॥
मल्लिकाकरवीरादिकुसुमैर्गंधतुंदिलैः ॥ ८३ ॥

धूपैर्दीपैश्च नैवेद्यतांबूलाद्युपचारकैः ॥
अतानीद्व्यक्तया भक्त्या परमानंदमेदुरः ॥ ८४ ॥

---

७९ शाळेंत जाणारीं मुलें-झाडांवर बसून आवाज करणाऱ्या पक्षांच्या आवाजाचें रस्त्यांत अनुकरण करतीं झालीं.

८० शेतकरी लोक नांगरादि शेतकीची सामग्री घेऊन गावढळ गाणीं गात आपापल्या शेताला जात होते.

८१ प्राण्यांना थंडी पासून होणारा त्रास आपल्या कोमल किरणांनीं नाहींसा करीत सूर्य उदय पावला. त्यावेळीं आचार्य श्रेष्ठ मुनि.

८२ गाळून स्वच्छ केलेल्या शुद्धोदकानें श्री एकादश रुद्रांच्या नमक चमकांनीं लिंगरूपी अशा महादेवाला अभिषेक करून, त्याची

८३-८४ भस्म, गंध, शुभ्र अशा अक्षता, अछिद्र व कोमल असें बिल्वदळ, जांई, कण्हेर वगैरे सुगंधित पुष्पें, धूप, दीप, कर्पूर, नैवेद्य, तांबूल इत्यादि उपकरणांनीं भक्तिपूर्वक अंतःकरणानें परमानंदानें निर्भर होऊन पूजा केली.

कृतलिंगार्चनो योगी जटामुकुटमंडितः ॥
धृतभस्मात्रिपुंड्रांकललाटललितद्युतिः ॥ ८५ ॥
काषायवाससा व्यक्तब्रम्हतेजास्तपोनिधिः ॥
रुद्राक्षमालिकालक्ष्यवक्षास्त्र्यक्ष इवापरः ॥ ८६ ॥
राजमानश्चन्नवीरः शिवाचार्यशिखामणिः ॥
शिष्यानुद्धर्तुकामः सन्नश्वमारुह्य योगिराट् ॥ ८७ ॥
निरीक्षमाणः सौंदर्यं स्टष्टेः स्वाभाविकं परम् ॥
कथमेकः शिवस्सर्वं विश्वं निर्माय लीलया ॥ ८८ ॥
प्रकाशयति तत्तस्मै नमोऽतर्क्यगुणात्मने ॥
इत्थं हृदि स्तुवन् ध्यायन् सांबं सत्यादिलक्षणम् ॥ ८९ ॥
गंभीरवृत्यवच्छिन्नमुखमुद्रो ययौ यमी ॥
सेवकश्चापि वामेन करेणाहृतपादुकः ॥ ९० ॥

८५-८६ अशा प्रकारें लिंगार्चन केलेले, तपस्वी, जटामुकुटमंडित, भस्म त्रिपुंड्रधारण केलेल्या कपाळानें अतितेजस्विता आलेले, भगव्या वस्त्र धारणेनें स्पष्ट दिसणारे ब्रह्मतेजधारी, तपोनिधी, वक्षस्थलावर रुद्राक्ष धारण करणारे, ते मुनि जणूं काय प्रति शिवच ! असे भासत होते.

८७ शिवाचार्यांत श्रेष्ठ असे चन्नवीर मुनि शिष्यांचा उद्धार करण्याचे हेतूनें घोड्यावर आरूढ होऊन

८८ नैसर्गिक व अत्युत्तम असें सृष्टिसौंदर्य पाहून एकचएक शिव अखिल चराचर जग सहज निर्माण करून

८९ कसें दृग्गोचर करतो ! कल्पनातीत असलेल्या विशिष्ट गुणांनीं युक्त अशा त्या शिवाला माझा नमस्कार असो, अशा प्रकारें अंतःकरणांत सत्यादि लक्षणयुक्त सांबशिवाचें स्तोत्र गात ध्यान करीत

९० ज्यांचे चेहऱ्यावर गंभीर वृत्ति–चिन्हें स्पष्ट होत आहेत असे मुनि चालते झाले. त्यांचा सेवकही डाव्या हातांत त्यांच्या पादुका घेऊन,

कशादंडं करेऽन्यस्मिन् कुर्वन् कौटिल्यवर्जितः ॥
चोदयन्नश्वमश्रांतः प्रययावनु तं मुनिम् ॥ ९१ ॥

तन्मार्गपार्श्वकेदारे कृषिं कुर्वाणहालिकाः ॥
दृष्ट्वा त्यक्तात्मकर्माणः पुरः प्रेत्य नयान्विताः ॥ ९२ ॥

साष्टांगप्रणिपातेन पांसुला अप्यपांसुलाः ॥
मंदस्मितमनोहारिवाक्यामृतसुतर्पिताः ॥ ९३ ॥

त एते भगवत्पादाः किमर्थं कुत्र यांति हि ॥
शिवपूजादिकं कर्म कृतं वा न कृतं त्विति ॥ ९४ ॥

संपृच्छंतोऽसकृत्तेन सेवकेन कृतोत्तराः ॥
गच्छंति स्मात्मनः क्षेत्रं धन्यंमन्याः कृषीवलाः ॥ ९५ ॥

---

९१ उजव्या हातांत चाबूक घेऊन, निष्कपटी असा तो घोड्याला मारीत, चालण्याचे श्रमाला न जुमानतां त्या मुनींच्या मागोमाग चालू लागला.

९२ मुनींच्या गमन मार्गाच्या दोहों बाजूंच्या शेतांत काम करीत असलेले शेतकरी या मुनींना पाहून आपापलीं हातांतील कामें तशींच टाकून स्वामींच्या जवळ येऊन अति नम्रतेनें,

९३ स्वामींना साष्टांग नमस्कार घातल्यानें तेथील जमिनीवरील धुळीनें मलीन (पापी) झाले असले तरी ते शेतकरी स्वामींच्या दर्शनानें पुनात झाले. नंतर स्वामींनीं स्मित हास्ययुक्त उच्चारलेल्या वाक्यरूपीं अमृतपानानें ते शेतकरी तृप्त होऊन,

९४ हे महास्वामी कोठें व कशाकरितां जात आहेत? यांची शिवपूजा वगैरे झाली आहे किंवा कसें? असें

९५ त्या सेवकाला पुन्हा पुन्हा विचारून त्यावर त्या सेवकाकडून आलेल्या उत्तराचें श्रवण करून स्वामी दर्शनानें धन्यता पावलेले ते शेतकरी आपापल्या शेताकडे जाते झाले.

गत्याऽऽलोकेन चात्यंतं पावयत्यखिलं जगत् ॥
पूषेव यो महात्मा वै न वंद्यः स कथं भुवि ॥ ९६ ॥

विख्याताऽक्कलकोटीति राजधानी विराजते ॥
अनूचानागतैर्भूपैर्धर्मेण परिपालिता ॥ ९७ ॥

तद्राजपाल्यदेशेऽस्मिन् शिष्याणां गृहभूषिते ॥
चप्पल्गावीति विख्यातः कश्चिद्ग्रामो विराजते ॥ ९८ ॥

अनेकवीरशैवानां सदाचारानुयायिनां ॥
धनधान्यादिसंपत्तिसंपृक्तगृहमेधिनाम् ॥ ९९ ॥

गृहैर्गृहीतपारम्ये तत्रासीच्छिष्यसत्तमः ॥
दुलंगीत्युपनामांकः श्रीमान् शीलवतां वरः ॥ १०० ॥

वीरशैवद्विजस्तस्य गेहमुद्दिश्य देशिकः ॥
भृत्यानुगम्यमानः सन् शिवाचार्यस्तदा ययौ ॥ १०१ ॥

---

९६ जे महात्मे सूर्याप्रमाणें-आपल्या गमनानें व कृपा दृष्टीनें [ प्रकाशानें ] अखिल जगताला पुनीत करूं शकतात असे महात्मे जगद्वंद्य कां होणार नाहात ? जरूर होतील.

९७ प्राचीन काळापासून आलेल्या राजांकडून धर्मानें चालविलेल्या राज्याची राजधानी अक्कलकोट शहर आहे.

९८-९९-१०० त्या अक्कलकोट राज्यांत शिष्यांच्या गृहांनीं भरलेले, सदाचारी, धनधान्यांनीं युक्त, गृहस्थाश्रमी अशा वीरशैवांच्या वस्तीनें परिपूर्ण असें चप्पळगांव नांवाचें एक गांव आहे, त्या गांवीं सदाचारी लोकांत श्रेष्ठ, श्रीमान् वीरशैव द्विजोत्तम असा दुलंगे आडनांवचा एक शिष्य होता.

१०१ त्या शिष्याचे एथें जाण्याच्या उद्देशानें निघालेले महामुनि आपल्या सेवकासह पुढें जाऊं लागले.

सहस्रांशुर्वियच्छैलशृंगमारूढवानिति ॥
शंके महद्दिदृक्षुस्थ वैशल्यालोकनाय वै ॥ १०२ ॥
माघाद्वैशाखमासे तु मदौष्ण्यमधिकं भवेत् ॥
सोढुमभ्यस्यतां सत्वैरित्युग्रोऽभूद्दिवारुणः ॥ १०३ ॥
छायादानेन पांथानामाहरन् श्रममंघ्रिपाः ॥
परोपकारसक्तानां शीलमेवं गुणात्मकम् ॥ १०४ ॥
कूलं जलाशयस्य द्घनच्छायमनोहरम् ॥
अधावन्नतिवेगात्ते पिपासाकुलिताः खगाः ॥ १०५ ॥
कृषिकाः कर्षणं हित्वा पाययित्वा पयो वृषान् ॥
जग्ध्वा पाथेयमुर्वीजतले विश्रांतिमाप्नुवन् ॥ १०६ ॥
यावनालादिसस्यानां कोमलानां सुकांतिभिः ॥
भूभामिनीधृतोदारहरिद्वस्त्रेव संबभौ ॥ १०७ ॥

---

१०२ सर्व जगाचा विस्तार पाहण्याकरितांच कीं काय ! सूर्य हा आकाशरूपी पर्वताच्या शिखरावर चढला आहे. [ मध्यान्ह झाला ].

१०३ माघ मासांतील उष्णतेपेक्षां वैशाख मासांतील माझी उष्णता अति तीव्र असते ती सहन करण्यास आतांपासूनच जनतेनें शिकावें, जणूं काय याच उद्देशानें सूर्य अत्युग्र झाला.

१०४ या मध्यान्ह कालीं झाडें आपल्या सावलीच्या योगानें प्रवाशांचे श्रम दूर करीत होतीं, [ बरोबर आहे कारणः-परोपकारी माणसांची अशीच वृत्ति असते ]

१०५ तहानेनें पीडित असे पक्षी झाडांच्या दाट छायेमुळें शीतल व सुंदर अशा तलावाच्या किनाऱ्याकडे अति वेगानें जाऊं लागले होते.

१०६ शेतकरी लोक शेतांतील आपापलीं कामें आटोपून बैलांना पाणी पाजून, भाकरी खाऊन, झाडांच्या सावलींत विसांवा घेत होते.

१०७ ज्वारी वगैरेंच्या कोंवळ्या रोपट्यांच्या हिरव्या रंगामुळें ही भूमाता जणूं काय हिरवा शालूच नेसली आहे असें भासत होतें.

दृष्ट्वा जलमरीचीनां मालां मृगगणा जवात् ॥
जलबुध्याऽन्वधावंस्ते तिरश्चां का विवेकिता ॥ १०८ ॥

माध्यान्हिकं लिंगपूजाकर्म कर्तुमना मुनिः ॥
स्वच्छांभसं नदीमल्पां प्रवहंतीमुपाश्रितः ॥ १०९ ॥

सेवकस्तुरगं त्यक्तपृष्ठास्तरणवल्गकम् ॥
पाययित्वा जलं सम्यग्घासग्रासैरुपाचरत् ॥ ११० ॥

स्नात्वा लिंगार्चनं कृत्वा चानुभूय शिवार्पितम् ॥
प्रच्छायशीतलं निंबतरोर्मूलं मुनिः श्रितः ॥ १११ ॥

स्वपित्वा तत्र योगीशो मनस्येवमचिंतयत् ॥
गात्रं मे जरसा ग्रस्तमिंद्रियाण्यपटूनि च ॥ ११२ ॥

---

१०८ प्रखर उष्णतेमुळें पाण्याचा भास होणाऱ्या मृगजलाकडे तृषित हरिण सारखे धाव घेत होते. [ बरोबर आहे कारण—पश्वादिकांना इतका विचार कोठून येणार ]

१०९ मध्यान्ह काल झाल्यामुळें माध्यान्ह शिवपूजा करण्याचे उद्देशानें ते शिवाचार्य निर्मल जल वाहणाऱ्या एका लहान नदीवर आले.

११० नंतर सेवकानें त्या घोड्यावरील खोगीर, लगाम वगैरे काढून त्या घोड्यास स्वच्छ धुऊन पाणी पाजून गवताचा चारा घातला

१११ ते मुनि त्या नदींत स्नान करून, शिवपूजा उरकून शिवार्पित प्रसादाचें सेवन करून गर्द छायेमुळें थंड अशा लिंबाच्या झाडाच्या बुंध्याजवळ आले.

११२ तेथें ते योगीश्वर विश्रांतीकरितां आडवे होऊन मनांत अशा प्रकारचा विचार करते झाले कीं—माझें शरीर वृद्धापकालामुळें जर्जर झालें आहे, चक्षुरादि इंद्रियें शिथिल झालीं आहेत.

मुनिलक्षणसंपन्नो वटुरद्यापि नेक्षितः ॥
शिवेच्छेति यदा तस्य चिंतादंतुरितं मनः ॥ ११३ ॥
मंदमावहता गंधवहेन समुदीरिता ॥
निद्रांगना चुचुंबास्य नेत्राब्जयुगमादरात् ॥ ११४ ॥
तन्निंबपादपस्याल्पदूरे दूर्वादिभिस्तृणैः ॥
श्यामीभूतो धराभागो महानासीन्नदीतटे ॥ ११५ ॥
चरंतिस्मात्र गोमुख्याः पशवस्तृणमेधिनः ॥
तस्यैव नातिदूरे तु प्रदेशे हृष्टमानसाः ॥ ११६ ॥
गोपालबालका नानाविधां क्रीडामकुर्वत ॥
आदातुं गोमयं याताः कन्याः काश्चित्सरिज्जले ॥ ११७ ॥

---

११३ मुनि लक्षणयुक्त वटु ( शिष्य ) मला अद्याप पावेतों मिळाला नाहीं! असो, शिवाची इच्छा-अशा प्रकारें त्या गुरुवर्यांचें मन जेव्हां काळजीयुक्त झालें.

११४ तेव्हां सुगंधयुक्त शीत वायूच्या प्रेरणेनें ( वाहण्यानें ) निद्रारूपी स्त्रीनें प्रेमानें आचार्यांच्या नेत्रकमलांचें चुंबन घेतलें ( आचार्यांना झोंप लागली )

११५ त्या लिंबाचे झाडाच्या थोड्या अंतरावर हराळी वगैरे गवतांनीं शामवर्ण झालेला एक मोठा भूप्रदेश त्या नदीचे कांठीं होता.

११६ तृणादिकांवर उपजीवन करणारीं गाई वगैरे जनावरें तेथें चरत होतीं, जवळच आनंदी मनाचीं

११७ गुराखी मुलें अनेक प्रकारचे खेळ खेळत होतीं, व शेण गोळा करण्या करितां आलेल्या कांहीं मुली, नदीच्या पाण्यांत

खेलंति स्म पदाघातजला बाल्यानुरंजिताः ॥
अमानुषौजसा दीप्तः सवयोभिः समन्वितः ॥ ११८ ॥
विशाललोचनः कोऽपि बालको भक्तिभावुकः ॥
मृण्मयाल्पघटं भूमावधोवक्त्रं विधाय च ॥ ११९ ॥
लिंगबुध्या च तं धीमानच्छैरल्पसरिज्जलैः ॥
संस्नाप्यारण्यकैर्नूत्नैः पुष्पैः पत्रैश्च पूजयन् ॥ १२० ॥
स्तुवन् ध्यायन्महामोदान्नृत्यन्नितरदारकैः ॥
शिवानंदसुधास्वादपरिनिष्णातमानसः ॥ १२१ ॥
विस्मृतेतरकृत्यः सन्नासीदर्भकभूमिपः ॥
इतः सुप्तिं गतः शांतो दांतः संयमिशेखरः ॥ १२२ ॥
स्वप्नेऽद्राक्षीच्छिवाचार्यः सुलभे भौतिकाकृतेः ॥
बालेंदुभूषणं सांबं गुरुरूपधरं शिवं ॥ १२३ ॥

---

११८ बालिशतेमुळें पाय हालविण्यचा खेळ खेळत होत्या. अमानुष तेजानें प्रकाशित झालेला, सम वयस्क मित्रांनींयुक्त,

११९ विशाल नेत्री, एक मुलगा भक्तियुक्त होऊन मातीच्या लहान मडक्याचें तोंड जमिनींत पुरून

१२० बुद्धिमान् असा तो त्या मडक्याला लिंग समजून त्याला नदीच्या स्वच्छ पाण्यानें स्नान घालून, रानांतील पत्र पुष्पांनीं पूजून,

१२१ अत्यानंदानें स्तोत्रें ह्मणत, ध्यान करीत व सर्व मुलांसह नाचत शिवपूजेनें प्राप्त होणाऱ्या आनंदरूपी अमृतांच्या सेवनांत निमग्न होऊन तो बालकश्रेष्ठ,

१२२ आपलीं इतर सर्व कृत्यें विसरून गेला होता इकडे झोंपी गेलेले, शांत, दांत असे ते शिवाचार्य

१२३ पंच भूतांनीं युक्त अशा शरीर धारण करणाऱ्या प्राण्याला सहज अशा स्वप्नांत गुरुरूप धारण करणाऱ्या, मस्तकावर चंद्र धारण करणाऱ्या अशा सांबशिवाला पाहते झाले.

तत्क्षणं प्रणिपातेन पूतांगं रोमहर्षणम् ॥
उत्थाप्याघ्राय मूर्धानमाचार्यमवदच्छिव ॥ १२४ ॥

माभूश्चितातुरो वत्स न ते व्यर्थो मनोरथः ॥
अद्यैव लप्स्यसेऽभीष्टसिद्धिं बुद्धिमतां वर ॥ १२५ ॥

उत्तिष्ठेक्षस्व बालं तं खेलंतं सखिभिः सह ॥
इत्युक्त्वांतर्दधे भक्तवत्सलः परमेश्वरः ॥ १२६ ॥

ततो जागरणं प्राप्य मंदास्मितमुखांबुजः ॥
विस्मयानंदसाम्मश्रना मुनिमतंगजः ॥ १२७ ॥

स्मृत्वा स्मरारिसंदिष्टं हित्वा शय्यां सुखास्पदाम् ॥
अगच्छत्तत्र यत्रास्ते बालो घालाकभासुरः ॥ १२८ ॥

---

१२४ पाहतांक्षणीं साष्टांग नमस्कारानें ज्याचें शरीर पवित्र व रोमांचित झालें आहे, अशा त्या आचार्यांना वर उचलून त्याचें मस्तक हुंगून, शिव त्यास ह्मणाले.

१२५ हे वत्सा, तूं काळजी करूं नकोस, तुझे मनोहर व्यर्थ होणार नाहींत, हे बुद्धिमान् लोकांत श्रेष्ठा, आजच तुझी अपेक्षा पूर्ण होईल.

१२६ ऊठ. आपल्या मित्रांसह खेळत असलेल्या त्या मुलाला पहा. असें सांगून भक्ताविषयीं प्रेमाळु असा परमेश्वर गुप्त झाला.

१२७ जागे होऊन, विस्मय व आनंद यांनीं युक्त अशा मनाचे, मंद हास्ययुक्त मुखकमलाचे ते मुनिश्रेष्ठ,

१२८ स्वप्नांत सांगितलेल्या परमेश्वराच्या गोष्टीचें स्मरण करून सुखकर असें आंथरूण सोडून-बालसूर्याप्रमाणें प्रकाशमान असा मुलगा असलेल्या ठिकाणीं गेले.

आयातं मुनिशार्दूलं चिरं नैक्षिष्ट बालकः ॥
अंतर्ध्यानानुसंधानत्यक्तबाह्येंद्रियक्रियः ॥ १२९ ॥
सम्यक् चोदयितुं चान्ये नालं बालास्तमकम् ॥
जंबुकानां कुतः शक्तिर्बलाद्बोधयितुं हरिम् ॥ १३० ॥
ततः संबुध्य संवीक्ष्य जटामुकुटमंडितम् ॥
भस्मत्रिपुंड्रसंराजद्भालं भालाक्षसन्निभम् ॥ १३१ ॥
चन्नवीरशिवाचार्यं प्रणनाम पदाब्जयोः ॥
सर्वे सवयसोऽप्याशु प्रणेमुः परिहर्षिताः ॥ १३२ ॥
प्रणतं प्रणयागारमुत्थाप्यालिंग्य मूर्धनि ॥
आघ्राय हृष्टहृत्पद्मो जगाद जगदर्चितः ॥ १३३ ॥ ॥

१२९ अंतर्ध्यानाचे अनुसंधानामुळें इंद्रियांचे बाह्य व्यापार ज्यांचे सुटले आहेत अशा स्थितींत असणाऱ्या मुलाकडून, ते मुनि येऊन बराच वेळ झाला तरी ते पाहिले गेले नाहींत.

१३० जवळ असणाऱ्या इतर मुलांनासुद्धां अशा प्रकारचे स्वामी आले आहेत ह्मणून त्या ध्यानस्थ मुलाला जागे करण्याचें सामर्थ्य झालें नाहीं. [ बरोबर आहे कारण:—झोंपलेल्या सिंहाला बळेंच जागे करण्याचें सामर्थ्य कोल्ह्याच्या ठिकाणीं कोठून येणार? येणार नाहीं. ]

१३१-१३२ नंतर जागृत होऊन जटामुकुटमंडित, त्रिपुंड्र भस्म-धारणेनें तेजस्विता प्राप्त झालेल्या ललाटाचे, भालाक्ष [ कपालनेत्र ] अशा परमेश्वराशीं समान अशा प्रकारच्या चन्नवीर शिवाचार्यांना पाहून त्यांच्या पदकमलीं नमस्कार करतां झाला. अत्यंत आनंदित व समवयस्क अशा त्याच्या सर्व मित्रांनींसुद्धां स्वामींना नमस्कार केला.

१३३ जगद्वंद्य व मन तृप्त झालेले ते आचार्य—पाहतांक्षणींच प्रेम उत्पन्न होणाऱ्या व नमस्कार केलेल्या त्या मुलाला वर उठवून, आलिंगन देऊन मस्तकाचें चुंबन घेऊन सांगते झाले.

कस्त्वं वत्स गुरो कश्चिदहं गोपालदारकः ॥
किं नाम तात मां चन्नवृषं विद्धि महामुने ॥ १३४ ॥
को ग्रामः पश्य योगींद्र योंऽघ्रिपैर्विविधैर्वृतः ॥
आस्ते चप्पलगावीति स मे ग्रामो द्विजाग्रग ॥ १३५ ॥
तत्रोपनाम ते वत्स किमाख्याहि कुलोद्वह ॥
दुलंगे इति मे स्वामिन्नुपनाम विराजते ॥ १३६ ॥
बाढं वत्स भवानद्य किमाधातुं विचेष्टते ॥
योगिन् योगिमनोमृग्यं भक्तिगम्यं सदाशिवम् ॥ १३७ ॥
लिंगरूपात्मकं रम्यं पत्रपुष्पादिभिर्नवैः ॥
संपूज्य विविधैः स्तोत्रैः स्तुवन्नासे तपोनिधे ॥ १३८ ॥

१३४ हे मुला, तूं कोण? मुलगा ह्मणाला-हे गुरो, मी एक गुराखी मुलगा आहे. मुनि ह्मणाले-अरे बाबा तुझें नांव काय? मुलगा ह्मणाला-हे आचार्य-माझें नांव चन्नबसव असें समजा

१३५ मुनि ह्मणाले-तुझा गांव कोणता? मुलगा ह्मणतो-ऐ योगीश्रेष्ठ, पहा अनेक प्रकारच्या वृक्षांनीं आच्छादित असें दिसणारें, हे ब्राह्मण श्रेष्ठा, तेंच चप्पळगी नामक माझें गांव आहे.

१३६ मुनि ह्मणाले-हे सत्कुलोत्पन्न मुला, त्या गांवांत तुम्ही कोणत्या उपनांवानें संबोधिले जातां त सांग? मुलगा ह्मणाला हे स्वामी, माझें आडनांव दुलंगे असें आहे.

१३७ मुनि ह्मणाले-बरें. हे मुला, आतां तूं काय करीत आहेस? मुलगा ह्मणाला–हे मुनि, तपस्वी जनांच्या मनाला शोधण्यास योग्य, भक्तीनें सहज प्राप्त, नेहमीं मंगल स्वरूपी,

१३८ रम्य, अशा लिंगरूपी शिवाला कोंवळ्या पत्रपुष्पांनीं पूजून, हे तपस्वी, अनेक प्रकारच्या स्तोत्रांनीं त्या शिवाची स्तुति करीत आहें.

इत्थमुक्तवति प्रेमोत्कर्षो बालेऽभवन्मुनेः ॥
गुणाः संतोषहेतुः स्यात् न कुलं न वयो भुवि ॥ १३९ ॥

अयमेवाधिकारी सन् मन्मठस्य भविष्यति ॥
इममर्थं महादेवो भगवान् भूतभावनः ॥ १४० ॥

मह्यं स्वप्ने समाचख्यावित्यामोदभरान्वितः ॥
शिवाचार्यवरः प्रत्यागत्य निंबतरोस्तलम् ॥ १४१ ॥

मुखमार्जनमाधाय समारुह्याश्वमादरात् ॥
सूर्यास्तात्पूर्वमाराध्यो ययौ तं ग्राममुत्तमम् ॥ १४२ ॥

दुलंगेत्युपनामाढ्यः श्रीमान् शिष्यवरस्तदा ॥
गुरोरागमनं श्रुत्वा प्रत्युद्गम्यानयद्गृहम् ॥ १४३ ॥

---

१३९ अशा प्रकारें सांगणाऱ्या मुलाविषयीं त्या मुनि श्रेष्ठाचा प्रेमोत्कर्ष झाला. ( बरोबर आहे कारणः—जगांत सद्गुणांनींच आनंद प्राप्त होतो, कुलानें अथवा वयानें होत नाहीं. )

१४० हाच मुलगा. माझे मठाला अधिकारी होणार, हाच विषय सर्व प्राणी मात्राच्या ठिकाणीं वास करणाऱ्या भगवान् परमेश्वरानें

१४१ स्वप्नांत मला सांगितला ? असें म्हणून ते शिवाचार्य अत्यानंदयुक्त होऊन त्या लिंबाचे झाडाखालीं परत आले.

१४२ व नदींतील पाण्यानें मुखमार्जन करून घोड्यावर बसून सूर्यास्ताचेपूर्वीं त्या चप्पळगांवांत प्रवेश करते झाले.

१४३ तेव्हां त्या गांवांतील श्रीमंत व शिष्यश्रेष्ठ दुलंगे हे गुरुवर्य आल्याचें ऐकून सामोरे जाऊन त्यांनीं गुरुवर्यांना आपल्या घरीं बोलावून आणिलें.

उच्चासनोपविष्टः श्रीचन्नवीरगुरूत्तमः ॥
साष्टांगप्रणिपातेन पूतांगान् शिष्यसत्तमान् ॥ १४४ ॥
मंदस्मितमनोहारिवचसा वाग्मिनां वरः ॥
दत्वाऽऽशिषपृच्छच्च पुत्रादिकुशलं व्रती ॥ १४५ ॥
तथैव द्रष्टुमायातान् पुरुषादीन् पुरौकसः ॥
प्रासंगिकोपदेशोक्तवचनामृततर्पणात् ॥ १४६ ॥
संतृप्तान्सर्वमर्त्यांस्तानन्वगृण्हाद्गणेश्वरः ॥
धृत्वाऽऽज्ञ सिरसा पौराः प्रययुः स्वस्वमंदिरम् ॥ १४७ ॥
ततो यमीश्वरो नित्यां सायंतनाशिवार्चनां ॥
विधाय विधिवल्लिंगप्रसादमुपभुक्तवान् ॥ १४८ ॥
भक्त्या गृहाधिनाथेन रचितं शयनं व्रती ॥
अधिशय्य सुखालापं तैः कुर्वन् सुप्तिमाययौ ॥ १४९ ॥

---

१४४–१४५ नंतर उच्चासनारूढ झालेले व उत्तम वक्ते असे ते श्री चन्नवीर शिवाचार्य थोडें स्मित–हास्य करून साष्टांग नमस्कारानें पवित्र झाले आहे शरीर ज्यांचे अशा शिष्योत्तमांना मधुर भाषणानें आशीर्वाद देऊन मुलां-बाळांचें कुशल विचारते झाले.

१४६ तसेंच, महामुनि आल्याची वार्ता ऐकून दर्शनास आलेल्या गांवांतील स्त्री-पुरुषांना प्रसंगोपात उपदेशाच्या वचनामृतानें .

१४७ संतुष्ट करून प्रमथ श्रेष्ठ अशा आचार्यांनीं त्या आलेल्या लोकांना जाण्याची आज्ञा केली. ती आचार्यांची आज्ञा शिरसामान्य करून ते स्त्रीपुरुष आपापल्या घरीं जाते झाले.

१४८ नंतर ते आचार्य सायंकाळची नित्य शिवपूजा सशास्त्र उरकून लिंग प्रसाद ग्रहण करते झाले.

१४९ घरच्या यजमानाकडून भक्तीनें केलेल्या मृदु अंथरुणावर निजून शिष्याशीं कुशल क्षेमाच्या गोष्टी बोलत बोलत झोंपी गेले.

परस्मिन् दिवसे योगी विहितेंदुधरार्चनः ॥
दत्वा पादोदकं तेभ्यः शिष्येभ्यश्चात्तभोजनः ॥ १५० ॥
कालोचितोत्तमम् भूयस्तेभ्योऽकार्षीद्धितं वचः ॥
साधवः सर्वदा सत्वानुद्धर्तुमतयः किल ॥ १५१ ॥
अथाचार्यं प्रयाणाय कृतबुद्धिं गृहाधिपः ॥
सर्वैस्समेत्य पूजार्हं साष्टांगं प्रणिपत्य च ॥ १५२ ॥
पुरो निधाय सौवर्णरजतादिप्रपूरितम् ॥
पात्रं विशालमाबध्य करांजलिपुटं पटुः ॥ १५३ ॥
गुरो स्वीकृत्य सर्वान्नः कृपयोद्धर तावकान् ॥
इति कैंकर्यसंकीर्णचित्तेनाप्रार्थयत्तदा ॥ १५४ ॥

---

१५० दुसरे दिवशीं ते गुरुवर्य स्नानादि शिवपूजा उरकून भक्तिवान् अशा त्या शिष्यांना तीर्थोदक देऊन, शिव प्रसादाचें सेवन करून,

१५१ त्या शिष्यांना समयोचित व उत्तम असा हितोपदेश गुरुवर्यांनीं केला. बरोबर आहे कारणः—सज्जन लोक नेहमीं प्राणिमात्रांचें हित करण्याविषयीं तत्पर असतात.

१५२ नंतर गुरुवर्य हे प्रयाणास तयार झालेले पाहून घर मालकानें घरांतील सर्व माणसांसह येऊन पूज्य अशा गुरुवर्यांना साष्टांग नमस्कार करून

१५३ चांदी, सोनें वगैरे पदार्थांनीं भरलेलें असें विशाल ताट पुढें ठेवून दोन्हीं हात जोडून

१५४ 'हे गुरुवर्य, याचा आपण स्वीकार करून आपले म्हणविणाऱ्या आम्हा सर्वांचा आपल्या कृपेनें उद्धार करावा' असें म्हणून अति नम्रतेनें त्यावेळीं प्राथना केली.

गुरुस्तूवाच नेदं मे रोचते त्वदुपायनम् ॥
यदि दास्यसि दानार्हं देहि यद्रोचते च तत् ॥ १५५ ॥

इत्युक्तवंतमाचार्यं पुनराह स गेहपः ॥
गृहं त्वदीयमेते ते त्वदीया वयमन्यथा ॥ १५६ ॥

न हि किंचिद्गुरो यत्ते रोचते स्वीकुरु प्रभो ॥
इत्युदारधिया शिष्यं वदन्तं वाग्मिशेखरः ॥ १५७ ॥

शिष्यावतंस ते पुत्ररत्नं चन्नवृषाव्हयम् ॥
मह्यं देहि भवेत्तुभ्यं शिवमित्यब्रवीद्वचः ॥ १५८ ॥

तृणीकृतहिरण्यस्य मणीकृतगुणस्य धीः ।
गुणवंतं सुतं हित्वा कथमादरयेद्धनम् ॥ १५९ ॥

---

१५५ तेव्हां गुरुवर्य म्हणाले—तूं अर्पण केलेली चांदी सोनें इत्यादिकांनीं युक्त अशी काणिका [नजराणा] मला पसंत नाहीं; योग्य काणिका देण्याची जर तुझी इच्छाच असेल तर माझे मनास आवडेल अशी काणिका दे.

१५६ अशा प्रकारें सांगणाऱ्या त्या गुरुवर्यांना तो यजमान पुन्हा म्हणाला—हें घर तुमचेंच आहे, आम्ही सर्वजण तुमचेच. निराळें नाहीं; तेव्हां

१५७ हे गुरुवर्य— आपल्या मनाला जें आवडेल त्याचा हे प्रभो' आपण स्वीकार करावा; अशा प्रकारें उदार अंतःकरणानें सांगणाऱ्या त्या शिष्याला उत्तम वक्ते असे गुरुवर्य—

१५८ हे शिष्य श्रेष्ठा, चन्नवसव नांवाचा तुझा मुलगा. मला दे, त्यायोगें तुझें कल्याण होईल असें म्हणाले.

१५९ ज्यांनीं सुवर्णादिकांना तुच्छ समजून सद्गुण हींच श्रेष्ठ रत्नें मानलीं आहेत अशांची बुद्धि गुणी बालकाचा त्याग करून द्रव्याचा स्वीकार कशी करूं शकेल? केव्हांही करूं शकणार नाहीं.

गुरोर्वचनपीयूषं पीत्वा संतुष्टमानसः ॥
कृतांजलिपुटः श्रीमानवोचद्वचनं मृदु ॥ १६० ॥

स्वामिन्नहं महाधन्यो मान्यो भक्तिमतां भुवि ॥
भवादृशः कृपाच्छत्रच्छायेऽस्मिन् जीवनं यतः ॥ १६१ ॥

त्वद्वचःश्रवणाच्छ्रोत्रे नेत्रे त्वन्मूर्तिदर्शनात् ॥
गात्रं पूततमं मन्ये भवतः पादपांसुभिः ॥ १६२ ॥

अद्य मे सफलः स्वामिन् मनोरथमहीरुहः ॥
अद्य मे सफलं जन्म चाद्य मे सफलं कुलम् ॥ १६३ ॥

इत्यानंदपयःपूरकृतोन्मज्जनिमज्जनः ॥
श्रीमान् तस्मै ददौ पुत्रं गुरवे भक्तिपूर्वकम् ॥ १६४ ॥

१६० गुरुंचें अमृततुल्य मधुर भाषण प्रेमानें ऐकून संतुष्ट मनाचा तो यजमान हात जोडून विनयानें म्हणाला.

१६१ हे गुरुवर्य, या पृथ्वीवरील भक्तिवान् लोकांत मीच मोठा धन्य व मान्य असा आहें, कारण– आपणासारख्या गुरुवर्यांच्या कृपा छत्राच्या छाये खालीं माझें जीवित आहे.

१६२ हे गुरुवर्य– आपल्या अमृततुल्य मधुर उपदेशानें माझे कान, आपल्या तेजस्वी व पवित्र मूर्तीच्या दर्शनानें माझे नेत्र, आपल्या पायांच्या रजःकणानें माझें शरीर हीं अत्यंत पवित्र झालीं आहेत असें मी समजतों.

१६३ हे गुरुश्रेष्ठा, आज माझे सर्व मनोरथ सफल झाले, आज माझे जन्माचें सार्थक झालें, आज माझ्या कुळाचा उद्धार झाला.

१६४ अशा प्रकारें आनंदातिशयरूपीं जल प्रवाहांत डुबक्या मारणारा तो यजमान, त्या गुरुवर्यांना मोठ्या भक्तिभावानें आपल्या मुलाला अर्पण करतां झाला.

गुर्वर्थं च शिवार्थं च प्राणानप्यात्मनः सुखम् ॥
विहातुमीशते ये ते कथं पुत्रादिकं नहि ॥ १६५ ॥
ततो भक्तावतंसस्य भक्तिमव्यभिचारिणीम् ॥
दृष्ट्वा मोदभरस्तस्य न ममावुदरे गुरोः ॥ १६६ ॥
अथांतेवासिभिस्सर्वैरनुज्ञातो महामुनिः ॥
बालं शिष्यं समादाय होट्टिगिग्राममाययौ ॥ १६७ ॥
तस्मिन् बृहन्मठे रम्ये सुमुहूर्ते शुभेऽहनि ॥
चतुर्भिरन्यै ऋत्विग्भिर्भिन्नगोत्रैर्महोज्वलैः ॥ १६८ ॥
मठस्थलसमुत्पन्नैराचार्यैरनुमोदितः ॥
संस्थाप्य पंचकलशानाहूताचार्यदैवतान् ॥ १६९ ॥
वीरमाहेश्वरीं दीक्षां त्रिविधां शास्त्रवित्तमः ॥
यथाशास्त्रं विधायासौ मिष्टान्नैर्भूरिदाक्षिणैः ॥ १७० ॥

---

१६५ जे गुरूकरितां किंवा परमेश्वराकरितां आपला प्राणसुद्धां देण्यास स्वखुशीनें तयार असतात ते पुत्रादिक देण्यास असमर्थ कसे होतील ?

१६६ नंतर भक्तश्रेष्ठ अशा त्या यजमानाची निर्दोष भक्ति पाहून उत्पन्न झालेला अत्यानंद गुरुवर्यांच्या पोटांत मावेनासा झाला.

१६७ नंतर सर्व शिष्यांचा निरोप घेऊन ते गुरुवर्य आपल्या बाल-शिष्यासह होटगी गांवाला आले.

१६८ तेथें आपल्या बृहन्मठांत उत्तम दिवशीं शुभ मुहूर्तावर, भिन्न गोत्राचे, भिन्न सूत्राचे, अति तेजोमय, ऋत्विक्, असे इतर

१६९ मठस्थल समुत्पन्न अशा आचार्यांच्या संमतीनें पच कलशांची स्थापना करून त्या पंचकलशांत रेणुकादि पंचाचार्य देवतांना आव्हान करून

१७० शास्त्रप्रवीण अशा त्या गुरुवर्यांनीं आपल्या बाल शिष्यास माहेश्वरी तीन प्रकारची ( वेधा, क्रिया, मंत्र ) सशास्त्र दीक्षा देऊन मिष्टान्नांनीं व भूरि दाक्षिणानीं,

वीरमाहेश्वरान् विप्रान् तर्पयामास देशिकः ॥
शिष्यादयः पौरमुख्या दृष्ट्वा तं दीक्षितं वटुम् ॥ १७१ ॥
अद्यास्माकं चिरात्कर्म फलितं चेष्टदैवतम् ॥
सुप्रसन्नमहो पुण्यभाजां लब्धो गुरूत्तमः ॥ १७२ ॥
क्वेदं वयः क्वचानल्पाऽमानुषी शक्तिरीदृशी ॥
दिव्यतेजःप्रकर्षस्य मनुजो भाजनं कुतः ॥ १७३ ॥
अहो धन्या जना येषामयं जातोऽक्षिगोचरः ॥
मान्योऽसद्गुरुरेवासौ यस्य शिष्यित्वमाप्तवान् ॥ १७४ ॥
भविष्यत्यस्य पादाब्जपांसुपूतो धराजनः ॥
इत्थमानंदसंपत्तेरुत्कर्षं लेभिरे तदा ॥ १७५ ॥

---

१७१ त्या गुरुवर्यांनीं वीर माहेश्वर ब्राह्मणांना संतुष्ट केलें. त्यावेळीं तेथें जमलेला आचार्यांचा शिष्य वर्ग व गांवांतील इतर प्रमुख मंडळी यांनीं त्या दीक्षित शिष्याला पाहून.

१७२ पुण्यवान् अशा आह्मांला उत्तम गुरु मिळाले, त्यामुळें आज आमचें पुष्कळ दिवसांचें कर्म सफल झालें, आणि अहो ! आमचें इष्ट दैवत प्रसन्न झालें.

१७३ वय केवढें ! याचें सामर्थ्य किती ! दैविक तेजाला मनुष्य कसा पात्र होईल ?

१७४ ज्यांना हा बाल–गुरु दृग्गोचर होतो तेच लोक धन्य होत, व जे आमचे गुरु ह्मणविणारे चन्नवीर शिवाचार्य त्यांचा हा शिष्य झाल्या- कारणानें तेच गुरु माननीय होत.

१७५ या बाल गुरूंच्या पदकमलांच्या रजःकणांनीं या पृथ्वीवरील माणसें पवित्र होतील; असें ह्मणून तेथील सर्व माणसें अतिशय आनंदित झालीं.

शिवां शिवांकहर्यक्षपीठमंडनपंडिताम् ॥
अमंदानंददां नित्यं वंदेऽहं गिरिनंदिनीम् ॥ १७६ ॥

—❀ इति प्रथमोऽध्यायः ❀—

१७६ शिवांकरूपीं सिंहासनावर बसण्यानें शिवांकसिंहासनास शोभा आणणारी, अत्यानंद देणारी, मंगलरूपी अशा पार्वतीला मी दररोज नमस्कार करतों.

प्रथम अध्याय समाप्त.



॥ श्रीरस्तु ॥

ॐनमः पंचजगद्गुरुभ्यः

# श्री. ष. ब्र. चन्नबसव विजय पुराणम्ः



## श्रीरस्तु अथ द्वितीयोऽध्यायः शिवमस्तु

शिवोऽव्याच्छक्तिमान् भक्त्या नमतोऽनन्यसंश्रयान् ॥
य ईशानो हि विद्यानां सर्वासामादिमो गुरुः ॥ १ ॥

अथ श्रीचन्नवीरोऽसौ तं चन्नबसवं वटुं ॥
कारयामास विद्यायै गुरूपसदनं मुदा ॥ २ ॥

विस्मृतः स्मारयित्रेव गुरुणा बोधिताखिलान् ॥
दुर्बोध्यानपि शब्दार्थान्वुबोधामलबुद्धिमान् ॥ ३ ॥

---

१ जो वेद वेदांतादि सर्व विद्यांचा आद्य उपदेशक आहे, असा शक्तिविशिष्ट शिव आपल्यावर पूर्ण अवलंबून असणाऱ्या नम्र भक्तांचें संरक्षण करो.

२ श्री चन्नवीर शिवाचार्यांनीं त्या वटूला [ शिष्याला ] विद्याभ्यासाकरितां गुरुगृहीं आनंदानें पाठविलें.

३ विस्मरण झालेल्या गोष्टीचें स्मरण करून देतांच जशी ती सर्व गोष्ट सहज लक्षांत येते त्यांप्रमाणें गुरु कडून शिकविली जाणारी विद्या दुर्बोध असूनही तो वटू सहज ग्रहण करूं लागला.

अधीतवेदवेदांगः शुद्धाचारातिनिर्मलः ॥
उपदिश्य सदाचारान् शिष्यरक्षाक्षमोऽभवत् ॥ ४ ॥
प्रज्ञानोज्वलिते चित्ते श्रीचन्नबसवस्य च ॥
बभुः पदार्थजालानि दीपोद्दीप्तगृहे यथा ॥ ५ ॥
धौरेयमेनमालोक्य चन्नवीरगुरुस्तदा ॥
उपदेष्टुमना आसीत्कालोचितमनुत्तमम् ॥ ६ ॥
ततः कदाचिदायातमुपविष्टं यथोचितम् ॥
विनयेनावनम्रं तं शांताकारं शिवास्पदम् ॥ ७ ॥
भस्मोल्लसितसर्वांगं रुद्राक्षाभरणान्वितम् ॥
अन्तेवासिनमेकांते जगादेत्थं गुरूत्तमः ॥ ८ ॥

---

४ वेद वेदांगादि सर्व शास्त्रांत निष्णात, शुद्धाचार संपन्न, व शिष्यांन सदाचारांचा उपदेश करून त्यांच्या संरक्षणांत दक्ष अशा प्रकारांनीं तो वटु तय्रार झाला.

५ दीप प्रकाशांच्या घरांत ज्या प्रमाणें त्यांतील सर्व वस्तु त्याच्या तेजानें प्रकाशित होतात त्याप्रमाणें ज्ञानानें प्रज्वलित झालेल्या चन्नबसवाच्या अंतःकरणांत शास्त्रिय सर्व पदार्थ ( विषय ] स्पष्ट दिसत होते.

६ गुरु कार्यभार वाहण्यास योग्य झालेल्या त्या चन्नबसवाला पाहून समयोचित असा योग्य उपदेश करण्याचें गुरु चन्नवीर शिवाचार्यांचे मनांत आलें.

७ नंतर एके दिवशीं आपण होऊनच येऊन—योग्य जागीं बसलेल्या, विनयशील, सौम्याकार, मंगलास्पद

८ सर्वांगाला भस्म लेपन केलेल्या, रुद्राक्ष माला धारण केलेल्या अशा शिष्याला पाहून—त्याला गुरुवर्यांनीं पुढील प्रमाणें सांगितलें:—

भद्रात्मन् वेदवेदांतशिवागमपरिश्रमैः ॥
पुटपाकेन हेमश्रीरिव ते भाति सन्मतिः ॥ ९ ॥
संप्रदायविशुद्धं तत् शास्त्रश्रवणमर्भक ॥
वपुर्भूषयति प्रायो नयः शास्त्रस्य भूषणम् ॥ १० ॥
नयेन कार्यसिद्धिश्चेत्यामनंति मनीषिणः ॥
एवमादिगुणाः सर्वे भांत्यंतस्तव सत्तम ॥
अतोऽतेवासिनामीश संबोध्यस्त्वं मयाऽनघ ॥ ११ ॥
अंतर्दीप्त्यादियुक्तोऽपि शाणेनोल्लिख्यते मणिः ॥
आमोदव्यक्तये पद्मं सदागतिमपेक्षते ॥ १२ ॥
वत्स तारुण्यसंजातं तमः किरणमालिना ॥
नोन्मूल्यते खरत्नेन गहनं तद्धि तादृशम् ॥ १३ ॥

---

९ हे बुद्धिमान् शिष्या, तावून सुलाखून ५२ कसी उतरलेल्या सोन्याप्रमाणें वेद, वेदांत,-शिवागमादि शास्त्रांच्या अभ्यासानें तुझी बुद्धि शोभत आहे.

१० हे वत्सा, गुरु सांप्रदायाकडून विशुद्ध असें शास्त्र श्रवण,—शरिराला भूषण असतें, शास्त्राचें भूषण नीति,

११ नीतीनें कार्यसिद्धि होते. असें ज्ञाते सांगतात, हे सर्वोत्तमा, तुझ्या अंतःकरणांत वरील सर्वगुण शोभत आहेत. करितां हे दोषरहित शिष्यश्रेष्टा, तूं माझेकडून उपदेशिला जाण्यास योग्य आहेस.

१२ खाणींतून काढलेलीं रत्नें त्यांचें तेज प्रगट होण्यास जशी सहाणेची अपेक्षा असते, अथवा कमलांतील सुंगध पसरविण्यास वायूची अपेक्षा असते त्याप्रमाणें तूं उपदेशार्ह आहेस.

१३ पृथ्वीवरील अंधाराचा सहस्र किरण सूर्य कोनाकोपऱ्यांतून सुद्धां सर्वस्वी नायनाट करीत असला, तरी तो तारुण्यामुळें प्राप्त झालेल्या अंधःकाराचा नाश करण्यास असमर्थ होतो कारण तो अंधःकारच तसा विलक्षण आहे.

मदः संपत्समुद्भूतः सा नष्टापि न नश्यति ॥
ऐश्वर्यतिमिरांधत्वमनंजनविनश्वरम् ॥ १४ ॥
शैत्योपचारसंहार्यो नोष्मा गर्वज्वरस्य च ॥
अत्युग्रस्तादृशः सोपि शिष्यचक्रशिखामणे ॥ १५ ॥
विषवद्विषयास्वादः परिणामे सुदारुण ः ॥
इति बुध्वाऽपि गृण्हंति मानवाः परिमोहिताः ॥ १६ ॥
अनुरागमलं लिप्तं क्षाल्यते नांभसा वटो ॥
अधिकारसुखास्वादनिद्रामुद्रितलोचनाः ॥ १७ ॥
रात्रिं दिनं न जानंति जनास्तल्लीनमानसाः ॥
प्रबुद्धा अप्यहो केचित् जृंभारंभं च कुर्वते ॥ १८ ॥
गर्भैश्वर्यं बलं रूपं नूतनं यौवनं वयः ॥
अनर्थाय किलैकैकं समवायः किमुच्यते ॥ १९ ॥

---

१४ गर्व संपत्तीपासून उत्पन्न झाला असला तरी संपत्ति नष्ट झाली तरीही गर्व मात्र नष्ट होत नाहीं. [ ह्मणून तो बाळगूं नये ] ऐश्वर्यरूपी रोगानें आलेलें अंधत्व अंजनानें ( औषधानें ) नाहींसें होत नाहीं.

१५ गर्वरूपी तापाची उष्णता शीतोपचारांनीं नाहींशी होत नाहीं. कारण हे शिष्यश्रेष्ठा, ती उष्णताच तितकी तीव्र असते.

१६ जगांतील नाना प्रकारचे विषय-भोग हे विषाच्या परिणामाप्रमाणें परिणामीं अति भयंकर असतात असें समजूनही, मूढलोक ते विषय भोगतात.

१७-१८ हे शिष्या, विषय प्रेमरूपी मल अंगाला लागल्यास तो पाण्यानेंसुद्धां जाऊं शकणार नाहीं, अधिकार-सुखोपभोगरूपी निद्रेनें डोळे झांकून उपभोगांत निमग्न झालेले लोक दिवस, रात्र हीं मुळींच जाणूं शकत नाहींत. जागें केलें तरी अहो ! कांहीं लोक नुसत्या जांभया देत असतात.

१९ गर्व श्रीमंती, बल, रूप, तारुण्य, यांपैकीं एकेकसुद्धां सर्वस्व नाशाला कारणीभूत होतें, मग हे सर्व एकत्र मिळाल्यास काय सांगावें !

तदेव किंचिद्विस्तार्य बोध्यते बुद्धिमद्वर ॥
तारुण्यस्योदये प्रायः शास्त्रांभःक्षालिताऽपि च ॥ २० ॥
बुद्धिर्मलिनतामेति घनकाले यथोदकम् ॥
अत्यंतधवलाप्यास्ते दृष्टी रागानुरंजिता ॥ २१ ॥
हरति प्रकृतिर्दूरं नरं वात्येव तूलकम् ॥
यूनामिंद्रियसारंगाननंगातपतापितान् ।
धावयत्युपभोगाख्या सुदूरं मृगतृष्णिका ॥ २२ ॥
मोहयित्वा बलाच्चित्तं विषयाशानिशाचरी ॥
पीत्वा प्राणासृगत्यर्थं युवानं पातयत्यधः ॥ २३ ॥
उत्पत्तिसमये क्षीरसागरात्कमलालया ॥
पारिजातच्छदाद्रागं कौटिल्यं चंद्ररेखया ॥ २४ ॥

---

२० हे श्रेष्ठ बुद्धिवान् शिष्या, तेंच थोड्याशा विस्तारानें तुला मी सांगतों. तारुण्याच्या उदयकाळीं बुद्धिप्रायः शास्त्ररूपीं पाण्यानें धुतली गेली तरी ( शास्त्राध्ययन केलें तरी )

२१ पावसाळ्यांतील पाण्याप्रमाणें ती मलीनच राहूं शकते, व दृष्टि अति शुभ्र [ शुद्ध ] असली तरी विषयप्रेमानें तांबड्या रंगानें रंगित होते.

२२ वावटळ कापसाला स्थान भ्रष्ट करून दूर घेऊन जाते, तद्वत् स्वभाव हा मनुष्याला दूर नेतो.

मन्मथरूपी उन्हाच्यायोगानें तापलेल्या तरुणांच्या चक्षुरादि इंद्रियरूपी हरिणांना उपभोग नांवाचें मृगजल अतिशय दूर पळवितें.

२३ विषयासक्ति नांवाची राक्षसी बलात्कारानें तरुणांचें मन मोहून, प्राणरूपीं रक्ताचें अतिपान करून, तरुणांना जमीन दोस्त करते.

२४ लक्ष्मी क्षीरसागरांतून उत्पन्न होते वेळीं- १ पारिजातक झाडांच्या कोंवळ्या पानांपासून राग, [ प्रेम, तांबडा ] २ चंद्राच्या कलेपासून कुटिलता, [ कपट ]

कालकूटान्मोहकत्वमिंद्राश्वाच्चापलं तथा ॥
कठिणत्वं कौस्तुभाच्च मदिराया मदं गुणम् ॥ २५ ॥
साहचर्याद्गृहीत्वेव लक्ष्मीरुदयमाययौ ॥
अनार्येयं स्वानुरक्तं पालयंतमपीश्वरम् ॥ २६ ॥
हित्वान्यं मनसाप्नोति कुलटेव कुरंगदृक् ॥
विदधीत न विश्वासमस्यां लक्ष्म्यां कदापि च ॥ २७ ॥
पट्टाभिषेकतोयेन सौजन्यांगविलेपनं ॥
क्षाल्यते नहि किंचित्तदवशिष्टं भविष्यति ॥ २८ ॥
तदा होमाग्निधूमेन चाभिषिक्तस्य मानसम् ॥
क्षीरवन्निर्मलं चापि भवत्यंजनवर्णभाक् ॥ २९ ॥
पुरोहितेन कूर्चेन कृतसंप्रोक्षणांभसा ॥
अधिकारिक्षमाधर्मो ध्वस्यते नहि शिष्यति ॥ ३० ॥

---

२५. ३ कालकूट विषापासून मोहकत्त्व (मोहितपणा), ४ उच्चैश्रवापासून चपलता, ५ कौस्तुभरत्नापासून कठिणत्व, ६ दारूपासून मादक गुण,

२६ हे सर्व त्यांच्या साहचर्यामुळें ग्रहण करूनच कीं काय? उत्पन्न झाली. ही लक्ष्मी दुष्ट आहे. कारण-आपल्या ठिकाणीं प्रेम ठेवणाऱ्या व आपलें रक्षण करणाऱ्या मालकाला-

२७ सोडून, जारिणी स्त्रीप्रमाणें पर पुरुषाकडे जात. यामुळें या लक्ष्मीचें ठिकाणीं केव्हांही विश्वास ठेवूं नये.

२८ पट्टाभिषेकाच्या उदकानें, आंगाला लावलेलें सौजन्यरूपी उटनें साफ धुतलें जातें, किंचित् सुद्धां राहूं शकत नाहीं.

२९ पट्टाभिषेकाच्या वेळीं केल्या जाणाऱ्या होमाग्नीच्या धुरानें अधिकाऱ्याचें मन दुधाप्रमाणें शुभ्र (निर्मल) असलें तरी काजळाप्रमाणें काळे होते.

३० पुरोहिताकडून दर्भाच्या कुंचल्यानें शिंपलेल्या पाण्यानें अधिकाऱ्याच्या ठिकाणच्या क्षमेचा नाश होतो. क्षमा मुळींच उरत नाहीं.

फालपट्टं सुवर्णस्य बद्धमालोक्य मस्तके ॥
जरसा पलितत्वं तु शिरसः स्मर्यते न हि ॥ ३१ ॥
धृतेन शिरसि श्वेतछत्रेण गुणिसत्तम ॥
अंतर्दधाति मर्त्यस्य परलोकोऽधिकारिणः ॥ ३२ ॥
बालव्यजनवातेन सत्यशीलं च देहिनः ॥
उन्नीयते यथा तूलं वात्यया वारिजांबक ॥ ३३ ॥
त्वादृशो जायते साधुरुपदेशक्षमो भुवि ॥
दर्पणो ननु गृण्हाति सूर्यबिंबं न मृत्तिका ॥ ३४ ॥
अत्यंतं मलिनं तात दोषजातं सुमेधसः ॥
उपदेशो हरत्यंधतमसं भास्करो यथा ॥ ३५ ॥

---

३१ पट्टाधिकाराचे वेळीं कपाळाला बांधलेला सुवर्णाचा पट्टा पाहून डोक्यावर म्हातारपणामुळें उत्पन्न होणाऱ्या पांढरे केसाची आठवण सुद्धां त्या पट्टाधिकाऱ्याला होत नसतें.

३२ हे गुणवान शिष्या, त्यावेळीं डोक्यावर धरण्यांत येणाऱ्या श्वेत छत्रामुळें त्या अधिकाऱ्याला स्वर्ग सुद्धां दिसेनासा होता.

३३ हे कमलाक्षा, त्यावेळीं त्या पट्टाधिकाऱ्यावर ढाळल्या जाणाऱ्या चवऱ्यांच्या वाऱ्यांनें त्याचे ठिकाणचा सत्यस्वभाव–वाऱ्यानें कापूस उडाल्या प्रमाणें–नाहींसा होतो.

३४ तुझ्यासारखा सज्जनच उपदेशास पात्र ठरतो. कारण सूर्याचें प्रतिबिंब आरशांतच पडतें. तसें ते माती मध्यें पडूं शकत नाहीं.

३५ हे तात, सज्जनांचा उपदेश, उपदेशास पात्र अशा मनुष्याचे ठिकाणच्या सर्व दोषांचा नाश करतो जसा सूर्य सर्व अंधःकाराचा नाश करतो.

अनास्वादितभोगैकरसे पुंसि फलत्यसौ ॥
अन्यस्मिंस्तु गलत्यंभः सच्छिद्रे कलशे यथा ॥ ३६ ॥
उपदेशो हि मर्त्यानामसुवर्णं विभूषणम् ॥
अकेशशौक्ल्यवैरूप्यं वृद्धत्वं च मनोहरम् ॥ ३७ ॥
न समाहृियते कामक्रोधादिभिरयं भवान् ॥
स्थिरोदारस्वभावत्वाद्वात्ययेव धराधरः ॥ ३८ ॥
तत्तत्स्वभावमाज्ञाय सम्यक् सर्वत्र सर्वदा ॥
अनासक्तमना भूत्वा चरंस्त्वं न हि लिप्यसे ॥ ३९ ॥
वत्साकर्णय सांबोक्तः सिद्धांताख्यः शिवागमः ॥
वर्तते वैदिकैस्सर्वैर्वेदवत्परिमानितः ॥ ४० ॥

३६ विषय सुखोपभोगाची गोडी ज्याचे ठिकाणीं किंचितही असत नाहीं त्याच पुरुषाचे ठिकाणीं [ जितेंद्रियाचे ठिकाणीं ] उपदेश फलद्रुप होऊं शकतो, इतरांच्या ( इंद्रिय निग्रह नसलेल्याच्या ) ठिकाणीं तो फलद्रुप होऊं शकत नाहीं. जसें फुटक्या घागरींत पाणी राहूं शकत नाहीं.

३७ उपदेश, हा मनुष्यांना सुवर्णापेक्षांही श्रेष्ठ असें भूषण आहे, आणि हा पांढऱ्या केसांनीं प्राप्त होणाऱ्या कुरुपत्व विरहित व सुंदर असा म्हातारपणा आणतो.

३८ हे बुद्धिमान् शिष्या, स्थिर आणि उदार असा स्वभाव तुझे ठिकाणीं असल्यामुळें, कामक्रोधादि षड्रिपु तुला चंचल करूं शकणार नाहींत. जसा—वारा पर्वताला हालवूं शकत नाहीं.

३९ हे शिष्या, त्या कामक्रोधादिकांच्या स्वभावाची पूर्ण परीक्षा करून नेहमीं त्यांचे ठिकाणीं अनासक्तवृत्तीनें रहात जा, त्यायोगानें त्यांचा लेप तुजवर बसूं शकणार नाहीं. [ त्यांचा ताबा तुझ्यावर बसणार नाहीं ]

४० हे वत्सा, ऐक—प्रत्यक्ष शिवाच्या मुखानें सांगितला गेलेला सर्व वैदिक लोकांकडून वेदाप्रमाणें मान्यता पावलेला असा सिद्धांत नांवाचा शिवागम आहे.

आम्नायेषूक्तलिंगादिधारणादिनिरूपणात् ॥
श्रुत्यमूलविरुद्धत्वाच्छ्रुतिसम्मत उच्यते ॥ ४१ ॥
सर्ववेदेषु यद्दृष्टं तत्सर्वं तु शिवागमे ॥
इति वीरागमोक्तत्वात् वेदसिद्धांतशास्त्रयोः ॥
प्रामाण्यं सदृशं ज्ञेयं वेदागमविशारदैः ॥ ४२ ॥
कामिकाद्ये वातुलांते शिवेनोक्ते शिवागमे ॥
आस्ते चोत्तरभागे श्रीवीरशैवमतं परम् ॥ ४३ ॥
विशब्देनोच्यते विद्या शिवजीवैक्यबोधिनी ॥
तस्यां रमंते ये शैवा वीरशैवाः प्रकीर्तिताः ॥ ४४ ॥
विरोधार्थो विशब्दस्स्याद्रशब्दो रहितार्थकः ॥
विरोधरहितं शैवं वीरशैवं विदुर्बुधाः ॥ ४५ ॥

---

४१ हा शिवागम—वेदांतील लिंगधारणादि विषय यांत सांगितल्यामुळें, व वेदविरोधक वाक्यांना हा विरोधी असल्यामुळें, वेद संमत आहे, असें सांगितलें जाते.

४२ सर्व वेदांमध्यें जे जे विषय पहावयास मिळतात ते ते सर्व विषय, या शिवागमांत आहेत असें वीरागमांत सांगितलें असल्यानें वेदागम विशारद अशा पंडितांनीं वेदशास्त्र व आगमशास्त्र यांना समसमान समजावें.

४३ कामिक आगमापासून तों वातुल आगमापर्यंत शिवाकडून सांगितल्या गेलेल्या २८ आगमांच्या शेवटच्या भागांत श्रेष्ठ असें वीरशैव मत सांगितलें आहे.

४४ शिव, जीव यांचे एकत्व प्रतिपादन करणाऱ्या वेदांत विद्येला 'वी' म्हणतात, त्या विद्येच्या ठिकाणीं रममाण होणाऱ्या शैवांना वीरशैव ह्मणतात.

४५ विरोधार्थक- वी- शब्द होय, व- र- शब्द रहित अशा अर्थी; विरोध रहित अशा शैवांना ज्ञाते लोक वीरशैव म्हणतात.

पिंडादिज्ञानशून्यांतैरेकोत्तरशतस्थलैः ॥
संयुक्तं वीरशैवानां शास्त्रं स्थलविभेदतः ॥ ४६ ॥
स्थलोक्ताचारभेदेन चाधिकारिभिदाबलात् ॥
षड्विधं प्रोच्यते वत्स वेदागमविशारदैः ॥ ४७ ॥
शिवोक्तं वीरशैवाख्यं मतमेतच्छिवाज्ञया ॥
रेणुकाद्या महाचार्याः पंचसिंहासनाधिपाः ॥ ४८ ॥
दिव्येषु सोमनाथादिलिंगेषु प्रकटांगकाः ॥
संस्थाप्य ख्यापयामासुः सर्वोर्व्यां शिष्यसंततौ ॥ ४९ ॥
स्वामिन् पंचमहाचार्यवर्याणां जननादिकम् ॥
संबोध्योद्धर मामंतेवासिनं तावकं विभो ॥ ५० ॥
इत्युक्तवंतं शिष्यं तं चन्नवीरगुरूत्तमः ॥
सानुकंपं सादरं च बोधयामास बुद्धिमान् ॥ ५१ ॥

---

४६ पिंडापासून तों ज्ञानशून्यापर्यंत असलेल्या १०१ स्थलांनी युक्त असें वीरशैव शास्त्र होय.

४७ वेदागमांत निष्णात अशा ज्ञानी जनांकडून भक्तादि स्थलभेदामुळें, त्या भक्तादि स्थलांमध्यें सांगितलेल्या आचार भेदामुळें व अधिकारी भेदामुळें हे शिष्या, याचे [ स्थलाचे ] सहा प्रकार आहेत असें सांगितलें जातें.

४८-४९ शिवाकडून सांगितले गेलेल्या या वीरशैव मताची शिवाच्या आज्ञेनें पंच सिंहासनांचे अधिकारी असे रेणुकादि महाचार्यांनीं सोमनाथादि दिव्य शिवलिंगांतून उद्भवून सर्व पृथ्वीतलावर स्थापना करून शिष्य समुदायांत त्याचा प्रसार केला.

५० शिष्य म्हणाला, हे स्वामी,–श्रेष्ठ असे पंच महाचार्यांचे जननादिक वगैरे सांगून हे प्रभो, तुमचा शिष्य झालेल्या अशा माझा उद्धार करा.

५१ अशा प्रकारें विचारणाऱ्या त्या शिष्याला, बुद्धिमान् असें चन्नवीराचार्य प्रेमानें व कृपेनें सांगते झाले.

कोल्लिपाकिपुरे रम्ये सोमेशशिवलिंगतः ॥
श्रीमद्रेवणसिद्धस्य दिव्यदेहस्य चोद्भवः ॥ ५२ ॥

रंभापुरे मठस्तत्र वीरसिंहासनं वरम् ॥
पड्विडीति महासूत्रं प्रवरस्तस्य योगिनः ॥ ५३ ॥

एकाक्षर इति ख्यातो दंडश्चाश्वत्थ ईरितः ॥
नकारो बीजमंत्रश्च हरिद्वर्णः कमंडलुः ॥ ५४ ॥

स्यात्कंथा च हरिद्वर्णा शाखा रेणुक ईरिता ॥
सद्योजातं मुखं तस्य वीरगोत्रमनुत्तमम् ॥ ५५ ॥

पुण्योत्तरे वटक्षेत्रे सिद्धेशशिवलिंगतः ॥
श्रीमन्मरुलसिद्धस्य जननं वसतिस्तथा ॥ ५६ ॥

नगर्यामुज्जयिन्यां च महासूत्रं तु वृष्टिकम् ॥
प्रवरो त्र्यक्षरश्चेति दंडः पालाशसंज्ञकः ॥ ५७ ॥

---

५२ दिव्य देह धारी अशा श्री मद्रेणुक शिवाचार्यांचा उद्भवकोल्लिपाकी नामक गांवांतील सोमनाथ नांवाच्या शिवलिंगापासून झाला.

५३-५४ त्यांचा मठ रंभापुरींत [ बाळेहळ्ळींत ] आहे, त्या मठांत वीर सिंहासन आहे, त्या शिवयोगींचें सूत्र पडविडी आहे, त्यांचा प्रवर एकाक्षर आहे, त्यांचा दंड पिंपळाचा आहे, ' न ' कार बीज मंत्र आहे, कमंडलु हिरव्या रंगाचा आहे.

५५ कफनीचा रंग हिरवा आहे, ' शाखा ' रेणुक आहे, मुख सद्योजात आहे, त्या शिवाचार्यांचें गोत्र ' वीर ' आहे.

५६-५७ अतिशय पवित्र अशा वटक्षेत्रांत श्रीसिद्धेश शिवलिंगापासून दिव्यधारी अशा श्री ' मरुळसिद्ध ' शिवाचार्यांचा उद्भव आहे. त्यांचा निवास उज्जयिनी नगरांत मुख्य सूत्र– वृष्टि, प्रवर– त्र्यक्षर, दंड- पळसाचा आहे.

सद्धर्माख्यं सिंहपीठं ताम्रवर्णः कमंडलुः ॥
मकारो बीजमंत्रः स्याच्छाखा दारुक उच्यते ॥ ५८ ॥

कलशस्ताम्रवर्णश्च कंथा मांजिष्टलक्षणा ॥
नंदिगोत्रं सुविज्ञेयं वामदेवमुखं तथा ॥ ५९ ॥

आचार्यप्रवरस्यास्य चैकोरामगुरोः पुनः ॥
द्राक्षारामाख्यसुक्षेत्रे भीमनाथाख्यलिंगतः ॥ ६० ॥

आविर्भावः सुकथितस्तस्यावासो हिमालये ॥
लंवनाख्यं मुख्यसूत्रं भृंगिगोत्रं समीरितम् ॥ ६१ ॥

दंडस्तु वैणवः प्रोक्तस्त्र्यक्षरः प्रवरस्तथा ॥
शिकारो बीजमंत्रः स्याल्लोहस्य च कमंडलुः ॥ ६२ ॥

शाखाऽस्य घंटाकर्णाख्या कलशो लोहनिर्मितः ॥
कंथा च नीलवर्णा स्यादघोरमुखमीरितम् ॥ ६३ ॥

---

५८ सिंहासन ‘सद्धर्म’ नांवाचें, कमंडलूचा रंग तांबडा आहे, ‘म’ कार बीजमंत्र आहे, शाखा- दारुक आहे.

५९ कलशाचा रंग--तांबडा, कंथा (कफनी) तांबड्या रंगाची, गोत्र--नंदी, मुख--वामदेव.

६०--६१ दिव्य देहधारी आचार्य अशा एकोरामाराध्यांचा उद्भव-द्राक्षारामक्षेत्रांतील श्री भीमनाथ नांवाच्या लिंगापासून आहे, निवासस्थान- हिमालय, मुल्यसूत्र- लंबन, गोत्र- भृंगी,

६२ दंड- वेळु (बांबू), प्रवर- त्र्यक्षर. ‘शि’ कार- बीजमंत्र कमंडलू-- लोखंडी,

६३ शाखा- घंटाकर्ण, कलश- लोखंडी, कंथा- नीलवर्ण, मुख- घोर, सिंहासन-वैराग्य.

सुधाकुंडमहाक्षेत्रे मल्लिकार्जुनलिंगतः ॥
आविर्भावः समाख्यातः पंडिताराध्यसद्गुरोः ॥ ६४ ॥
आवासः श्रीगिरौ मुक्तागुच्छसूत्रं समीरितम् ॥
प्रवरस्तस्य देवस्य चतुरक्षर ईरितः ॥ ६५ ॥
दंडोऽखंडश्रियस्तस्य न्यग्रोधश्च कमंडलुः ॥
कांस्यरूपो हि वाकारो बीजाक्षर इतीरितः ॥ ६६ ॥
धेनुकर्णाख्यशाखा स्यात्कलशः कांस्यनिर्मितः ॥
मुखं तत्पुरुषं वत्स कंथा श्वेतगुणा तथा ॥ ६७ ॥
वृषगोत्रं तस्य गोत्रं श्रीगिरौ सिंहविष्टरः ॥
अथातः संप्रवक्ष्यामि शृणु शिष्यशिरोमणे ॥ ६८ ॥
वाराणस्यां च विश्वेशशिवलिंगात्समुद्भवः ॥
विश्वाराध्यस्य चावासः काशीक्षेत्रे समीरितः ॥ ६९ ॥

---

६४ सुधाकुंड महाक्षेत्रांतील मल्लिकार्जुन शिवलिंगापासून दिव्य देहधारी अशा पंडिताराध्य शिवाचार्यांचा उद्भव आहे,

६४ निवासस्थान-श्रीशैल, सिंहासन-सूर्य, मुख्यसूत्र-मुक्तागुच्छ-प्रवर-चतुरक्षर,

६६ दंड-वडाचे झाडाचा, कमंडलू-कांशाचें, बीजमंत्र- 'वा' कार,

६७-६८ शाखा-धेनुकर्ण, कलश-कांशाचें, मुख-तत्पुरुष, कंथा-पांढऱ्या रंगाची, गोत्र-वृषभ,त्याप्रमाणेंच हे शिष्या, या पुढील हकिकत सांगतों, ती ऐक.

६९ काशी क्षेत्रांतील विश्वनाथ शिवलिंगापासून दिव्य देहधारी अशा विश्वाराध्य शिवाचार्यांचा उद्भव आहे. निवास स्थान-काशीक्षेत्र, सिंहासन ज्ञान

पंचवर्णं महासूत्रं वर्णः स्यादतिवर्णकः ॥
पंचाक्षरः समाख्यातः प्रवरश्चेति सद्गुरोः ॥ ७० ॥
दंडो बैल्व इति प्रोक्तः कानकस्तु कमंडलुः ॥
विश्वकर्णाख्यशाखा स्याद्यकारो बीजमंत्रकः ॥ ७१ ॥
सौवर्णः कलशस्तस्य मुखमीशानमीरितम् ॥
स्कंदगोत्रं तु तद्गोत्रं कंथा कनकनिर्मिता ॥ ७२ ॥
त एतेऽप्युपसूत्राणां गुरवः परिकीर्तिताः ॥
चरपट्टाधिकारादिष्वखिलेषु च कर्मसु ॥ ७३ ॥
निग्रहेऽनुग्रहे वापि चाव्हाने च विसर्जने ॥
सांबवक्त्राब्जजातत्वात्स्वतंत्रा गुरवः स्मृताः ॥ ७४ ॥
ब्रम्हचर्याद्याश्रमाणां चतुर्णां च नियामकाः ॥
चतुर्णां ब्राम्हणादीनां वर्णानां गुरवः स्रुताः ॥ ७५ ॥

---

७० मुख्य सूत्र-पंचवण, अतिवर्ण-वर्ण, प्रवर-पचाक्षर,

७१ दंड-बिल्व वृक्षाचा, कमंडलु-सोन्याचा, शाखा-विश्वकर्ण. बीजमंत्र 'य' कार,

७२ कलश-सोन्याचा, मुख-ईशान गोत्र-स्कंध, कंथा सोन्याची.

७३–७४ ते हे पंचाचार्य उपसूत्रांना मुख्य गुरु आहेत. आणि सर्व चरपट्टाधिकाऱ्यांचेविषयीं, सर्व कर्मांच्याविषयीं निग्रहानुग्रहाचेविषयींसुद्धां, आव्हान विसर्जनाचेविषयींही हे आचार्य प्रत्यक्ष शिवाच्या पंच मुखांपासून उत्पन्न झाल्यामुळें मुख्य गुरु ह्मणविले जातात.

७५ हे महाचार्य ब्रह्मचर्यादि चतुराश्रमाचे नियामक आहेत, तसेंच ब्राह्मणादि चतुर्वर्णांचे गुरु आहेत,

नियामकत्वमेतेषु महाचार्येषु सुव्रत ॥
गुरुत्वं चापि तच्चंद्रे चंद्रत्वमिव वर्तते ॥ ७६ ॥
एतैश्च जगदाचार्यैं रेणुकाद्यैर्महात्मभिः ॥
स्थापिते ख्यापिते वीरशैवाख्ये च महामते ॥ ७७ ॥
अष्टावरणसंपन्नः पंचाचारपरायणः ॥
वीरशैव इति प्रांचैः प्रोच्यते शास्त्रपारगैः ॥ ७८ ॥
तदेव वच्मि संक्षिप्य सावधानमनाः शृणु ॥
गुरुर्लिंगं जंगमश्च प्रसादश्चरणोदकम् ॥ ७९ ॥
विभूतिः पंचवर्णाख्यमंत्रो रुद्राक्षमेव च ॥
वत्साष्टावरणान्याहुस्तानीमानि मनीषिणः ॥ ८० ॥
जिज्ञास्यत्वात्स्वरूपेण प्राप्यत्वाच्छिष्यशेखर ॥
एतेष्वष्टसु तल्लिंगं प्रधानमिति गण्यते ॥ ८१ ॥

---

७६ हे सुव्रता शिष्या,-या महापंचाचार्यांचे ठिकाणीं नियामकत्व व गुरुत्व हीं चंद्राच्या ठिकाणाच्या चंद्रत्वा (आल्हादत्व) प्रमाणें नैसर्गिक सिद्ध आहेत.

७७ महात्मे ह्मणविणाऱ्या रेणुकादि या जगदाचार्यांकडून स्थापन झालेल्या व प्रसिद्धीस आणलेल्या वीरशैव महामतांत,

७८ अष्टावर्ण संपन्न, पंचाचार परायण झालेला तोच वीरशैव होय असें अति प्राचीन शास्त्रज्ञांकडून सांगितलें जातें.

७९–८० हे शिष्य श्रेष्ठा, तेंच थोड्या संक्षेप रूपानें सांगतों सावधान चित्तानें ऐक. गुरु, लिंग, जंगम, प्रसाद, पादोदक, विभूति, मंत्र, रुद्राक्ष हे वत्स, यांनाच अष्टावरण ह्मणतात असें ज्ञानी लोकांकडून सांगण्यांत येतें.

८१ हे शिष्यशेखरा, जिज्ञास्यत्वामुळें ( समजण्यास योग्य असें असल्यामुळें ) व मुमुक्षु लोकांना स्वरूपानें मिळण्यास योग्य असें असल्यामुळें तें लिंगच या अष्टावरणांमध्यें प्रधान असें गणिलें जाते

तत्स्वरूपावभासाय गुरुर्मृग्यो मनीषिभिः ॥
ये विहाय गुरुं लोके मुक्तिमिच्छंति मानवाः ॥ ८२ ॥
अकर्णधारया नावा तर्तुमिच्छंति तेंऽम्बुधिम् ॥
हित्वा गुरुं कुतो मुक्तिर्विना मुक्तिं कुतः सुखम् ॥ ८३ ॥
दयामयः शिवः साक्षाल्लोकमुद्धर्तुमिच्छया ॥
गुरुरूपधरो भूत्वा चरतीत्याह वेदवाक् ॥ ८४ ॥
मठस्थलसमुत्पन्नो महामहिमाविश्रुतः ॥
सर्वसंसारदोषांधतमसध्वंसभास्करः ॥ ८५ ॥
शिवागमार्थविश्रांतमानसो मानवत्तमः ॥
वेदवेदांगवित्प्राज्ञो वैदिकाचारभासकः ॥ ८६ ॥

---

८२-८३ ज्ञानी लोक लिंग स्वरूप जाणण्याकरितां गुरूंचा शोध करीत असतात, जीं माणसें गुरुशिवाय मोक्ष प्राप्तीची इच्छा करतात त्यांचें तें इच्छिणें-नावाडी नसलेल्या नावेंतून समुद्र ओलांडू इच्छिणाऱ्या सारखें आहे. गुरूशिवाय मोक्ष कसा मिळणार? व मोक्षाशिवाय कायमसुख कसें प्राप्त होईल? [ होत नाहीं ]

८४ दयामय असा प्रत्यक्ष शिवच लोकोद्धाराचा हेतु मनांत धरून गुरुरूप धारण करून पृथ्वीतलावर संचार करीत असतो असें वेदवाणी सांगत आहे.

८५ मठस्थल समुत्पन्न, मोठा महिमाशाली ह्मणून प्रसिद्ध असलेला संसारांतील सर्व दोषरूपी अंधःकाराचा नाश करण्यास सूर्यरूप झालेला,

८६ शिवागमांच्या अर्थांत ज्याचें मन विश्रांति पावलें आहे असा, सन्मान्य श्रेष्ठ असलेला वेदवेदांगे जाणणारा. बुद्धिवान्, वैदिक आचारांचा प्रचारक,

अनूचानः प्रसन्नात्मा शिवतत्वप्रचारकः ॥
विधूतविषयभ्रांतिर्धृत्युत्साहसमन्वितः ॥ ८७ ॥
शिवलिंगार्चनासक्तः शिवलिंगधरः शिवः ॥
शिवपंचाक्षराभ्यासः शिवजीवैक्यबोधकः ॥ ८८ ॥
भस्मत्रिपुंड्रविन्यासविराजत्फालपट्टकः ॥
भस्मोध्दूलितसर्वांगो रुद्राक्षाभरणान्वितः ॥ ८९ ॥
एवमादिगुणोपेतो गुरुर्भवति मुक्तिदः ॥
नचान्यो गुणहीनस्त्वित्यामनंति मनीषिणः ॥ ९० ॥
गुरुवेषधरा मर्त्या व्याघ्राकाराः खरा इव ॥
मनोऽरण्ये चरिष्णूंस्तान्मृगान् घ्नंति न जातु चित् ॥९१॥
कथमज्ञो गुरुः शिष्यान्मग्नांस्तान्भवसागरे ॥
तारयेद्भिन्ननौकेव मग्नो भवति तैः सह ॥ ९२ ॥

८७ गुरुपरंपरेनें आलेला, प्रसन्नात्मा, शिवतत्व प्रसारक, विषय मोह नसलेला, उत्साह, धैय इत्यादिकांनीं युक्त,

८८ शिवलिंग पूजेंत निमग्न असणारा, शिवलिंगधारी, मंगलस्वरूपी, शिवपंचाक्षर मंत्राचा अभ्यास करणारा, शिवजीवांच्या एकत्वाचा उपदेशक,

८९ भस्मानें सर्वांग उध्दूलित केलेला, भस्म त्रिपुंड्र धारणेनें शोभायमान् अशा कपाळाचा, रुद्राक्षांचीं आभरणें धारण केलेला,

९० इत्यादि गुणांनीं युक्त असा गुरु, मुक्ति देऊं शकतो. गुणहीन असा गुरु देऊं शकत नाहीं, असें ज्ञानिलोक सांगतात.

९१ गुरूंचा वेष धारण करणारे लोक वाघांचें सोंग घेणाऱ्या गाढवाप्रमाणें, मनरूपीं अरण्यांत संचार करीत असलेल्या दुर्गुण रूपी हरिणांचा केंव्हाही नाश करूं शकत नाहींत.

९२ भवसागरांत बुडालेल्या शिष्यांना मूर्ख गुरु, फुटक्या नावेप्रमाणें तारू शकेल ? उलट त्यांच्यासह आपणही बुडून जातो.

अतो विवेकी शुद्धात्मा विषयोद्विग्नमानसः ॥
उद्दिधीर्षुः किलात्मानमुपेयात्तादृशं गुरुम् ॥ ९३ ॥

षण्मासान् वर्षमेकं वा द्वे वा तं गुरुपुंगवम् ॥
सेवेत परया भक्त्या यावदेति प्रसन्नताम् ॥ ९४ ॥

ततः प्रसन्नमाचार्यं मायाबंधविमोचकम् ॥
प्रणम्य प्रांजलिर्भूत्वा भक्त्या संप्रार्थयेत्पुरः ॥ ९५ ॥

भो महाभाग कल्याणसंपदाकर सद्गुरो ॥
संसारसर्पसंदष्टं विषयानलपीडितम् ॥ ९६ ॥

विमुग्धं पाहि संप्राप्तं मां शिवाचार्यशेखर ॥
इति विज्ञापयंतं सद्भक्तिभूषितचेतसम् ॥ ९७ ॥

---

९३ ह्मणून विचारशील, शुद्धात्मा, विषयभोगानें ज्याचें मन उद्विग्न झालें आहे अशा माणसानें, आपला उद्धार करून घेण्याकरितां अशा ज्ञानी गुरूंकडे जावें.

९४ सहा महिने, वर्ष, दोन वर्षेपर्यंत अशा गुरूश्रेष्ठांची मोठ्या भक्तिभावनेनें सेवा करावी. फारकाय? तो गुरु, प्रसन्न होईपर्यंत करावी.

९५ नंतर मायाबंधन सूत्रांतून मुक्त करणाऱ्या व प्रसन्न झालेल्या अशा गुरुश्रेष्ठांना नमस्कार करून, भक्तीनें हात जोडून पुढें उभे राहून प्रार्थना करावी.

९६ हे महाभाग, कल्याण संपत्ति यांचें उगमस्थान अशा सद्गुरो, संसार रूपी सर्पानें दंशित, विषयरूपी अग्नीनें त्रस्त, ह्मणून

९७ विमुग्ध ( मूर्च्छित ) होऊन तुमच आश्रयास आलेल्या माझें हे शिवाचार्य शेखरा, रक्षण करा. या प्रमाणें विनंति करणाऱ्या व सद्भक्तियुक्त मनाच्या,

अनन्यगतिकं शिष्यं प्रणमंतं दयाघनः ॥
शक्तिपातं समालोक्य दीक्षया योजयेद्गुरुः ॥ ९८ ॥
दीयते लिंगसंबंधः क्षीयते च मलत्रयम् ॥
यया यस्मादतः प्राज्ञैः सा दीक्षेति निगद्यते ॥ ९९ ॥
सा प्रोक्ता त्रिविधा दीक्षा शिवसिद्धांततत्वगैः ॥
वेधा क्रिया मंत्ररूपा चेति चन्नवृषाभिध ॥ १०० ॥
गुरोः कृपावलोकेन हस्तमस्तकयोगतः ॥
शिष्ये तत्वसमावेशो यः सा वेधेति भण्यते ॥ १०१ ॥
सा प्रोक्ता मंत्रदीक्षेति मंत्रमात्रावबोधिनी ॥
सकुंडमंडला या सा क्रियादीक्षा क्रियोत्तरा ॥ १०२ ॥

---

९८ नमस्कार करणाऱ्या व आपणांखेरीज इतर गतीच नसलेल्या अशा शिष्याला, दयाघन गुरूंनीं त्याचे ठिकाणीं शक्तिपात झालेला पाहून दीक्षा द्यावी.

९९ जिच्या योगानें लिंगाचा संबंध शिष्याला दिला जातो, व तीन प्रकारच्या मलाचा (१ आणवमल, २ मायामल, ३ कार्मिकमल) नाश केला जातो तीच दीक्षा होय असें ज्ञाते लोकांकडून सांगितलें जात.

१०० हे शिष्या चन्नबसवा, शिवसिद्धांत तत्त्व जाणणाऱ्या लोकांकडून ती दीक्षा– १ वेधा, २ क्रिया, ३ मंत्र अशा तीन प्रकारची आहे, असें सांगितलें जातें.

१०१ गुरूंच्या कृपादृष्टीनें, हस्तमस्तक संयोगानें [गुरूंनीं आपला उजवा हात शिष्याच्या मस्तकावर ठेवण्यानें] शिष्याचे ठिकाणीं तत्त्व समाविष्ट करण्याचे कृतीला **वेधादीक्षा** म्हणतात.

१०२ फक्त मंत्राचाच उपदेश गुप्तपणें कानांत केला जातो त्यास मंत्रदीक्षा म्हणतात. होम कुंड, मंडल इत्यादि क्रिया प्रधान असणाऱ्या दीक्षेस क्रियादीक्षा म्हणतात.

एवं त्रिविधया दीक्षाक्रियया देशिकोत्तमः ॥
संस्कृत्य विदधात्यंतेवासिनं मुक्तिभाजनम् ॥ १०३ ॥
उपकारी गुरुर्नॄणां जरामरणबंधनात् ॥
मोचकत्वादयं वंद्यः सर्वाश्रमनिषेविभिः ॥ १०४ ॥
यथा शिवे परा भक्तिर्यादृशी तादृशी गुरौ ॥
कर्तव्या हितमिच्छद्भिर्यथा देवस्तथा गुरुः ॥ १०५ ॥
गुरुं गुणगणागारं सेवेत परया मुदा ॥
मानसी वाचिकी सेवा कायिकी चेति सा त्रिधा ॥ १०६ ॥
हृदब्जे सततं सम्यग्गुरोराकारचिंतनम् ॥
उक्ता सा मानसी सेवेत्यंतेवासिशिखामणे ॥ १०७ ॥

---

१०३ गुरुत्तम असा शिवाचार्य या प्रमाणें तीन प्रकारच्या दीक्षांचा संस्कार करून, शिष्याला मुक्तीस पात्र करतो.

१०४ गुरु हे, मनुष्याला अत्यंत उपकारी होऊन राहिले आहेत. व जरा, मरण, यांच्या बंधनापासून हे मुक्त करीत असल्यामुळें ब्रह्मचारी वगैरे सर्व आश्रम्यांकडून ते वंद्य आहेत.

१०५ स्वतांच्या हिताची अपेक्षा करणारे पुरुष शिवाच्याठिकाणीं श्रेष्ठ अशी ज्या प्रकारची भक्ति करतात, त्याच प्रकारची भक्ति गुरूंच्या ठिकाणींसुद्धां करावी. कारण— जसे शिव तसे गुरु.

१०६ सर्व गुणांचे आगर [ खाण ] अशा गुरूंची शिष्यानें माठ्या आदरानें सेवा करावी. ती सेवा तीन प्रकारची आहे. मानसिक, कायिक व वाचिक.

१०७ हे शिष्य शिखामणि चन्नबसव,— अंतःकरणांत सतत योग्य व चांगल्या प्रकारें गुरुमूर्तीचें ध्यान करणें यास मानसिक सेवा म्हणतात.

सद्गुरो मद्गुरो कर्म किं कर्तव्यं प्रियं नु ते ॥
तथास्त्वित्युत्तरं चैवमादिः सेवा तु वाचिकी ॥ १०८ ॥
गुरोर्गृहागतस्याशु दत्त्वा पीठं मनोरमम् ॥
विधाय स्वागतं वाक्यं स्नानायोत्थापनं तथा ॥ १०९ ॥
तैलाभ्यंगक्रिया सम्यक्केशसंमार्जनं नखैः ॥
कवोष्णेन जलेनाथ स्नानकर्म शुभावहम् ॥ ११० ॥
शिवार्चागारसल्लेपं गोमयेन सवारिणा ॥
पूजार्थं पत्रपुष्पाणि जलसंशोधनं तथा ॥ १११ ॥
एवमादीनि कर्माणि यानि कान्यपराणि च ॥
यत्तेषां करणं सेवा सा प्रोक्ता दैहिकी वटो ॥ ११२ ॥

---

१०८ हे माझ्या गुरो, हे सद्गुरो, आपलें काम कोणतें आहे! व त्यांत हितकारक असें काम कोणतें! गुरूंनीं अमुक काम कर म्हणतांच होय. म्हणून तें करणें इत्यादिकांस वाचिक सेवा असें म्हणतात.

१०९ गुरु घरीं आल्यावेळीं सत्वर उठून सुंदर आसन घालून तोंडानें स्वागत करून गुरूंना स्नानाला उठवावें.

११० तेलानें आंग सगळें चांगलें माखून, डोक्यावरील जटांना तेल लावून त्या जटा नखें व फणी यांनीं विंचरून नंतर कोमठ, स्वच्छ व सुखकारक अशा पाण्यानें स्नान करवावें.

१११ शिवपूजागृह ( देवघर ) शुद्ध ( किडे, दुर्गंधिरहित ) व ताजें शेणानें ( गाईच्या ) सारवावें पूजेकरितां पत्री, फुलें वगैरे आणवावीं पाणी वस्त्रगाळ करून शुद्ध करून ठेवावें.

११२ इत्यादि इतर कर्में करावीत. हे शिष्या, या कृत्याला कायिक सेवा असें ह्मणतात.

गुरोः प्रियाणि वस्तूनि यानि कानिचिदर्भक ॥
उचितान्येव देयानि वित्तशाठ्यं तु वर्जयेत् ॥ ११३ ॥
दरिद्रो यद्यशक्तश्चेद्भवेत्सेवापरायणः ॥
सद्गुरुर्भक्तिमात्रेण प्रसीदति न चान्यथा ॥ ११४ ॥
आचार्यं संदिदृक्षुः सन् शिष्यः सर्वत्र सर्वदा ॥
रिक्तहस्तो न गच्छेद्धि यथा राजा तथा गुरुः ॥ ११५ ॥
संसारी वा विरक्तो वा राजा वा पंडितोऽपि वा ॥
धनाढ्यो वा दरिद्रो वा यो वा को वा भवत्वपि ॥
साष्टांगं प्रणमेद्भक्त्या निर्लज्जो गुरुसन्निधौ ॥ ११६ ॥
सर्वेषु चोपचारेषु द्वावेवातिप्रियंकरौ ॥
प्रियवाणी प्रणामश्च तौ विनाऽन्ये निरर्थकाः ॥ ११७ ॥

---

११३ गुरूंच्या अत्यंत आवडीचे जे जे पदार्थ असतील ते ते पदार्थ त्यांना विनामोल [ गुरूंपासून दाम न घेतां ] आणून द्यावेत. गुरू समोर द्रव्य-मद ( पैशाचा गर्व ) दाखवूं नये.

११४ शिष्य दरिद्री व दुर्बल [असमर्थ] असल्यास त्यानें केवल कायिकादी सेवाधारी बनावें. कारण उत्तम गुरु, केवल भक्तीच्यायोगानेंच प्रसन्न होतो, इतर कशानेंही प्रसन्न होत नाहीं.

११५ गुरुदर्शनाची अपेक्षा करणाऱ्या शिष्यांनीं केव्हांही व कोठेंही रिक्त ( मोकळ्या ) हातानें गुरु दर्शनास जाऊं नये. कारण—जसा राजा ( पूज्य ) तसा गुरूही ( पूज्य ) आहे.

११६ संसारी अथवा विरक्त, राजा अथवा पंडित, धनाढ्य अथवा दरिद्री, कोणीही असो त्यानें गुरूसमोर न लाजतां भक्तिपूर्वक साष्टांग नमस्कार घालावा.

११७ सर्व उपचारांमध्यें फक्त दोनच उपचार प्रियकर आहेत. ते ह्मणजे १ गोड ( हितकारक ) भाषण व २ नमस्कार. हे दोन उपचार जर नसतील तर बाकी सर्व उपचार निरर्थक होत.

प्रमादादपि शिष्योऽसौ न निंदेद्गुरुमर्भक ॥
गुरोः शिवस्य निंदां च श्रृणुयान्न कदा चन ॥ ११८ ॥
कलत्रपुत्रजामातृमातृपित्रादिबंधुषु ॥
द्रुह्यंति गुरवे ये तान् संत्यजेच्छत्रुवत्सदा ॥ ११९ ॥
निंदां करोति यः शिष्यो धनं हरति सद्गुरोः ॥
स्निह्यत्यरिषु मूढात्मा स चांडालो न संशयः ॥ १२० ॥
गुरोः सकाशतो मानं मनसाऽपि य इच्छति ॥
स मूढः स च चंडालश्चांधे तमसि मज्जति ॥ १२१ ॥
आचार्यमीक्षते यस्तु सामान्यमिव पूरुषम् ॥
उदासीनतया यश्च पच्यते नरके चिरं ॥ १२२ ॥
सर्वदेवाश्रयं सर्वमंत्राणामाकरं गुरुम् ॥
सर्वतीर्थसमावासं पूजयेन्मानयेत्सदा ॥ १२३ ॥

---

११८ हे अर्भका, चुकूनसुद्धां शिष्यांनीं गुरुनिंदा करूं नये, तसेंच केव्हांही गुरुनिंदा व शिवनिंदा कानानें ऐकूं नये.

११९ बायकामुलें, जांवई, आई, बाप इत्यादि नातलगांपैकीं जे गुरुद्रोह करतात ते शत्रूसमान मानून त्यांचा त्याग करावा.

१२० जो गुरुनिंदा करतो, गुरूंचे द्रव्याचा अपहार करतो, गुरूंच्या शत्रूशीं प्रेम करतो असा तो मुर्ख बुद्धीचा शिष्य चांडाळ होय. यांत कांहीं संशय नाहीं.

१२१ जो गुरूपुढें मान (आपल्या योग्यतेनुसार स्थान वगैरे मिळण्याविषयीं) मिळण्याविषयीं नुसत्या मनानें सुद्धां इच्छितो तो मूर्ख, चांडाळ अंधतम नांवाच्या नरकांत बुडतो.

१२२ जो गुरूंना सामान्य [ इतर लोकांप्रमाणें ] समजतो, व जो गुरूंविषयीं उदासीन वृत्तीनें राहतो तो पुष्कळ कालपर्यंत नरकांत पचत असतो.

१२३ गुरु सर्व देवतांचें आश्रयस्थान, सर्व मंत्राचें आगर तसेंच सर्व तीर्थांचें निवासस्थान असल्यामुळें त्यांची पूजा करावी व मानावें.

सद्भक्त्या श्रद्धयाऽऽचार्यं भुक्तिमुक्तिप्रदायकम् ॥
ध्यात्वा संपूज्य सततं बहवो मुक्तिमन्वयुः ॥ १२४ ॥

अथ संश्रूयतां वत्स लिंगतत्वं मयोच्यते ॥
यस्य संश्रवणान्मर्त्यः पूतांतःकरणो भवेत् ॥ १२५ ॥

लीयते गम्यते वत्स यत्र विश्वं चराचरम् ॥
तल्लिंगं हि परं ब्रम्ह सच्चिदानंदलक्षणम् ॥ १२६ ॥

तस्मात्तल्लिंगमित्याहुर्बृहत्वाद्बृंहणत्वतः ॥
परब्रम्हाभिधं चेति शिवागमविशारदाः ॥ १२७ ॥

ऋगादौ निगमे शास्त्रसंघे शैवागमेषु च ॥
पुराणेषु प्रकर्षेण लिंगधारणमीर्यते ॥ १२८ ॥

---

१२४ सद्भक्ति व श्रद्धा यांच्या योगानें भुक्ति, मुक्ति, देणाऱ्या गुरूंना उत्तमप्रकारें नेहमीं पूजून, त्यांचें ध्यान करून पुष्कळ लोकांनीं मोक्षप्राप्ती करून घेतली आहे.

लिंगतत्त्व निरूपणः—

१२५ हे शिष्या, यापुढें मजकडून लिंगतत्त्वासंबंधीं माहिती सांगितली जाणार आहे, ती तूं ऐक. ज्या लिंगतत्त्वाच्या श्रवणानें मनुष्यप्राणी पवित्र अंतःकरणाचा होतो,

१२६ हे शिष्या, या अखिल चराचर जगाचा जेथें लय होतो, आणि त्याची उत्पत्ति होते तेंच लिंग सच्चिदानंद लक्षणयुक्त परब्रह्म होय.

१२७ ह्मणून तें लिंग बृहत्त्व व बृंहणत्त्व या धर्मामुळें परब्रह्म ह्मणून आगम विशारद सांगतात.

१२८ ऋक् इत्यादि वेदांत, शास्त्रसमूहांत, कामिकादिवातुलांत शिवागमांत, लिंग, स्कंद वगैरे, पुराणांत, विशेषेकरून लिंगधारणा सांगितली जाते.

पवित्रमिति मंत्रेण ऋगुक्तेन महामते ॥
पवित्रं ब्रम्ह तल्लिंगं धार्यं शैवमितीर्यते ॥ १२९ ॥
अतप्ततनुमंत्रेण गद्यतेऽसंस्कृतः पुमान् ॥
न लिंगं धारयेज्ञातु धृतवान् यदि पापभाक् ॥ १३० ॥
या ते रुद्र शिवा चेति यजुषा गीयते यतः ॥
तस्मात्तल्लिंगसंयोगाद्देही पूततमः स्मृतः ॥ १३१ ॥
यच्छंदसां च मंत्रेण तैत्तरीयश्रुतावपि ॥
लिंगधारणमाख्यातमंतेवासिपुरोगम ॥ १३२ ॥
अयं मे हस्तो भगवानिति मंत्रेण सर्वदा ॥
पाणिलिंगधृतिर्वेदपुरुषस्य समीरिता ॥ १३३ ॥
त्रियंबकं विरूपाक्षं लिंगं ब्रम्ह सनातनम् ॥
यजामहे धारयामः सुगंधिं पुष्टिवर्धनम् ॥ १३४ ॥

---

१२९ हे बुद्धिमान् शिष्या, ऋग्वेदांत सांगितलेल्या ‘ पवित्रं ’ या मंत्रानें पवित्र ( ब्रह्म–लिंग ) असें सांगितलें जातें आणि तें शिवलिंग धारण करावें असें सांगण्यांत येतें.

१३० त्या अतप्त तनु मंत्रांत दीक्षासंस्कार–रहित अशा पुरुषानें तें शिवलिंग धारण करूं नये केल्यास तो महापापी होतो असें सांगितलें आहे.

१३१ ‘ याते रुद्र शिवा ’ इत्यादि यजुर्वेदांतील मंत्राकडून सांगितलें जातें कीं– दीक्षापूर्वक लिंग धारणेच्या योगानें मनुष्य अत्यंत पवित्र होतो.

१३२ हे शिष्योत्तम अशा चन्नबसवा, तैतरीय श्रुतींतील ‘ यच्छंदसां ’ या मंत्रानें लिंगधारणा सांगितली आहे.

१३३ ‘ अयं मे हस्तो भगवान् ’ या मंत्रानें वेदपुरुषाचे हातांत नेहमीं लिंगधारणा आहे ह्मणून सांगितलें जातें.

१३४ त्र्यंबकं याचा विरुपाक्ष, लिंग, सनातन ब्रह्म असा अर्थ होतो, व यजामहे– पुष्टिवर्धन असें तें लिंग आह्मी धारण करतों.

उर्वारुकं यथा बंधान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् ॥
प्रथमाष्टे यजुर्वेदे वेदपुंसा महात्मना ॥ १३५ ॥

लिंगधारणमाख्यातं शैवानां शिष्यसत्तम ॥
इत्यादिवाक्यसद्भावाल्लिंगं धार्यमनामयम् ॥ १३६ ॥

पंकजासनपद्माक्षसहस्राक्षादयः सुराः ॥
गौतमादिमुनिश्रेष्ठा नारदाद्याः सुरर्षयः ॥ १३७ ॥

ब्राम्ह्याद्या मातरः सर्वा लक्ष्म्याद्याश्च सुरांगनाः ॥
धारयंत्युत्तमांगे श्रीशिवलिंगमहर्निशम् ॥ १३८ ॥

मर्त्यलोके महाक्षेत्रे तत्र तत्र महात्मभिः ॥
स्थापितानां हृषीकेशमूर्तीनां मस्तके तथा ॥
लक्ष्म्यादिप्रतिमानां तत् शिरस्युरसि चेक्ष्यते ॥ १३९ ॥

---

१३५ 'वाळूक परिपक्व होतांच देंठापासून आपोआप सुटतें त्याप्रमाणें माझी मृत्यु देवतेपासून सुटका कर,' असें यजुर्वेदाच्या पहिल्या अष्टकांत महात्मा अशा वेद पुरुषांकडून

१३६ शैवांना लिंगधारणा सांगितली आहे. हे सच्छिष्या, इत्यादि वाक्यें प्रमाणरुत असल्यानें अनामय असें शिवलिंग धारण करावें असें सांगितलें आहे.

१३७-१३८ ब्रह्मा, विष्णू, इंद्र, इत्यादि देवता, गौतमादि मुनि-श्रेष्ठ, नारदादि देवर्षि, ब्राह्मी वगैरे मातृदेवता, लक्ष्मी वगैरे सर्व देवांगना हीं सर्व, शिवलिंग उत्तमांगाचे ठिकाणीं धारण करतात.

१३९ या मृत्युलोकांत त्या त्या महाक्षेत्रांत मोठमोठ्या महात्म्यांकडून स्थापित केलेल्या विष्णू देवतांच्या मस्तकावर तसेंच लक्ष्म्यादि शिलामूर्तींच्या डोक्यांवर अथवा छातीवर शिवलिंग धारण केलेलें दिसून येतें.

संस्कृत्य विधिना सम्यग्गुरुणा करुणालुना ॥
दत्तं लिंगं शरीरे तद्धारयेच्छ्रद्धया सुधीः ॥ १४० ॥

विश्वं चराचरं सर्वं लिंगमध्ये विराजते ॥
न किंचिल्लिंगबाह्यं यत्तस्माल्लिंगं प्रपूजयेत् । १४१ ॥

त्रियंबकं लिंगरूपं सुगंधिं पुष्टिवर्धनम् ॥
यजन्नित्यं भक्तियुक्तो मृत्योर्मृत्युर्भविष्यति ॥ १४२ ॥

लिंगस्य धारणं पुण्यकारणं कर्मनाशनम् ॥
समादृतं समाधिस्थैर्मुनिभिर्मोक्षकांक्षिभिः ॥ १४३ ॥

शैवसिद्धांततंत्रज्ञैर्द्विविधं लिंगधारणम् ॥
बाह्यमाभ्यंतरं चेति प्रोच्यते पुत्रशेखर ॥ १४४ ॥

---

१४० बुद्धिमान् पुरुषानें सुहृदय अशा गुरूंकडून सशास्त्र संस्कार करून दिलेलें लिंग शरिरावर धारण करावें.

१४१ ज्याअर्थीं या चराचर जगाचा भास लिंगामध्येंच आहे, लिंग सोडून इतर ठिकाणीं किंचित्सुद्धां असूं शकत नाहीं त्याअर्थीं लिंगाची पूजा करावी.

१४२ त्रिनेत्रधारी, सुगंधी, पुष्टिवर्धक अशा शिवलिंगाची निजवाद-भक्तियुक्त अंतःकरणानें— पूजा करणारा पुरुष यमाचाही यम होऊं शकतो [ त्यास मरणाचीही भीति नाहीं ]

१४३ पुण्यकारक व सर्व कर्मांचा नाश करणारें अशा लिंगधारणेचा तपस्वी व मोक्षाची अपेक्षा करणाऱ्या अशा मुनीजनांकडूनही-स्वीकार करण्यांत आला आहे.

१४४ हे पुत्र श्रेष्ठा, शैवसिद्धांत शास्त्र जाणणारें सत्पुरुष ‘ बाह्य व अभ्यंतर ’ असे लिंग धारणेचे दोन प्रकार आहेत असें सांगतात.

शांकरं सच्चिदानंदरूपं कारणकारणम् ॥
लिंगं यत्तस्य हृत्पद्मे ध्यानमांतरधारणम् ॥ १४५ ॥
तल्लिंगं प्राणिनामंतःस्थानत्रितयगोचरम् ॥
मूलाधारे चतुष्पत्रे द्वादशारे हृदंबुजे ॥ १४६ ॥
पत्रद्वयाढ्ये भ्रूमध्ये ज्योतिर्लिंगं विराजते ॥
त्रिषु स्थानेषु चैकस्मिन् स्थाने योगविदुत्तमः ॥ १४७ ॥
ज्योतिर्लिंगानुसंधानं कुरुते यज्जितेंद्रियः ॥
महर्षयस्तदेवाहुरांतरं लिंगधारणम् ॥ १४८ ॥
अशेषेण प्रयत्नेन ज्योतिर्लिंगं शिवात्मकम् ॥
ध्यायेद्बंधविमोक्षायाभ्यंतरे बुद्धिमान्पुमान् ॥ १४९ ॥

१४५ शिवस्वरूपी, सच्चिदानंदरूपी, [ सत्– त्रिकालाबाधित, चित्– ज्ञान, आनंद- सुख, यारूपी ] महदादिकांना कारणीभूत असलेलें, अशा लिंगाचें सदोदित हृदय कमलांत ध्यान करणें यास अंतर्लिंग धारणा असें ह्मणतात.

१४६–१४७ तें अंतर्लिंग मनुष्यप्राण्याच्या शरिराचे आंत तीन ठिकाणीं असतें, चार दळें असणाऱ्या मूळाधार कमलामध्यें, बारा दळे असलेल्या हृदय कमलांत. दोन दळें असणाऱ्या भिवयांच्या - मध्य कमलांत, या ठिकाणीं तें ज्योतिर्लिंग विराजमान असतें. या तीन स्थलांपैकीं कोणत्याही एका ठिकाणीं,

१४८ जितेंद्रिय असा योगी ज्योतिर्लिंगाचें अनुसंधान ( ध्यान ) करतो. त्या अंतर्ज्योतिर्लिंगाचे अनुसंधानालाच महर्षि लोक अंतर्लिंग धारणा असें ह्मणतात.

१४९ बुद्धिमान् पुरुषांनीं अखिल प्रयत्नांनीं संसार बंधनापासून मुक्त होण्याकरितां अंतःकरणांत शिवस्वरूपी अशा ज्योतिर्लिंगाचें ध्यान करावें.

अंतर्लिंगानुसंधानादशेषक्लेशसंक्षयः ॥
यदि स्यात्तध्दतिर्बाह्ये किमर्थमिति नो वदेत् ॥ १५०॥

अंतर्लिंगधृतौ शक्तो ह्यशक्तो वापि मानवः ॥
यावज्जीवं धरेल्लिंगं बाह्यमित्याह वै श्रुतिः ॥ १५१ ॥

तल्लिंगं त्रिविधं प्रोक्तं स्थूलं सूक्ष्मं च कारणम् ॥
इष्टलिंगमिदं स्थूलं ध्रियते यत्तनौ बहिः ॥ १५२ ॥

भावातीतं मनोऽतीतं परब्रम्ह शिवात्मकम् ॥
साक्षादनिष्टहरणादिष्टलिंगमिति स्मृतम् ॥ १५३ ॥

मस्तके कंधरे कक्षे कुक्षौ वक्षसि वा करे ॥
धारयेदैश्वरं लिंगं सावधानमनाः सुधीः ॥ १५४ ॥

---

१५० अंतरंगांतील ज्योतिर्लिंगाच्या ध्यान करण्यानें जर सर्व पापांचा नाश होत असेल तर बाह्य लिंगधारणेची काय आवश्यकता आहे, असें ह्मणूं नये.

१५१ अंतर्लिंगधारणत समर्थासमर्थ मनुष्यानें बाह्यांगावर शिवलिंग धारण केलेंच पाहिजे, असें श्रुति सांगत आहे-

१५२ तें लिंग—स्थूल, सूक्ष्म, कारण—अशा तीन प्रकारचें आहे. शरिराच्या बाह्यस्थळीं जें इष्ट लिंग धारण केलें जातें त्यास स्थूल लिंग असें ह्मणतात.

१५३ ज्याचें स्वरूप सांगण्यास अशक्य, मनाला समजण्यास अशक्य असें परब्रह्मरूपी शिवलिंग, धारण करणारांच्या संकटांचें निवारण करून इच्छित फल देतें ह्मणून त्यास इष्टलिंग असें ह्मणतात.

१५४ डोकें, कंठ, काख-बगडी, पोट, छाती आणि कर- ( मणगट ) यांपैकीं कोणत्याही एका ठिकाणीं बुद्धिमान् पुरुषानें शिवलिंग सावधान मनानें धारण करावें.

नाभेरधस्ताल्लिंगस्य धारणं पापकारणम् ॥
जटाग्रे पृष्ठदेशे च मलस्थाने न धारयेत् ॥ १५५ ॥
लिंगधारणसंयुक्तः शुद्धः सद्भावभूषितः ॥
लिंगं संपूजयेद्गंधबिल्वपुष्पाक्षतादिभिः ॥ १५६ ॥
बाह्यपीठार्चनाद्धस्तपीठे लिंगार्चनं वरम् ॥
मुमुक्षूणां सदा वीरशैवानां शिवकांक्षिणाम् ॥ १५७ ॥
वेदागमपुराणेषु शिवलिंगस्य धारणम् ॥
समाख्यातं हि यत्तस्माद्वैदिकं लिंगधारणम् ॥ १५८ ॥
अंतर्हृदयमध्ये वा बहिर्हृदयमध्यतः ॥
दीक्षात्रयेण यो धत्ते शिवलिंगं स पुण्यभाक् ॥ १५९ ॥
स एव धन्यः पूतात्मा सफलं तस्य जीवितम् ॥
पितृमातृकलत्रादिबांधवाः पुण्यजीविनः ॥ १६० ॥

---

१५५ बेंबीच्या खालच्या भागावर लिंग धारण करणें हें मोठें पाप आहे. तसेंच जटाग्री, पाठीवर, मलस्थानी (वाख्यावर) लिंग धारण करूं नये.

१५६ व स्नानादिकांनीं पवित्र, व सद्भावनांनींयुक्त अशा लिंगधारीनें गंध, बिल्व, पुष्प, अक्षता इत्यादि साहित्यांनीं शिवलिंगाची पूजा करावी.

१५७ सर्वदा कल्याणाची अपेक्षा करणारे व मुमुक्षु अशा वीरशैवांनीं बाह्य पीठावर शिवलिंगाची पूजा करण्यापेक्षा करपीठावर (हातावर) शिवलिंगाची पूजा करणें योग्य आहे.

१५८ ज्या अर्थी वेद, आगम, पुराण यांमध्यें शिवलिंगाच धारणेसंबंधीं चांगल्या प्रकारें विवरण करून सांगितलें आहे, त्या अर्थी लिंगधारणा वेदोक्त आहे.

१५९ जो वेधादि दीक्षात्रयानें शिवलिंग आंतील हृदयाच्या मध्यभागीं अथवा शरिराच्या बाह्यांगावर धारण करतो तोच पुण्यवान् होय.

१६० तोच धन्य, तोच पवित्र मनाचा, त्याचेंच जीवित सफल होय, त्याचे आईबाप, बायकामुलें इत्यादि आप्तेष्ट हे पुण्यवान् होत.

अत्रैकमितिहासं ते संक्षिप्य कथयाम्यहम् ॥
आसीदजामिलो नाम कश्चित् कांचनतस्करः ॥ १६१ ॥

इतश्चेतश्च पापिष्ठश्चरन् सन् कुक्षिपूर्तये ॥
रूपलावण्यसंपन्नां नृत्यविद्याविशारदाम् ॥ १६२ ॥

वेश्यामेत्याखिलं देशं चचारासौ तया सह ॥
तत्र तत्रार्जितानेकवित्तजातानि कामिनी ॥ १६३ ॥

आदाय देशमात्मीयं गंतुमुद्युक्तमानसा ॥
देशं तं मित्रगुप्तस्य प्राप्ता शैवस्य कस्य चित् ॥ १६४ ॥

तस्याऽऽसीन्नियमः कश्चिद्द्विकालं लिंगधारिणं ॥
पूजयामि महाभक्त्या प्रदक्षिणपुरस्सरम् ॥ १६५ ॥

कृतानि सर्वपापानि भस्मसात्करवाण्यहम् ॥
इति निश्चित्य पांथानां हरन्नासीद्धनादिकम् ॥ १६६ ॥

---

१६१–१६२ याविषयासंबंधीं मी एक गोष्ट थोडक्यांत सांगतों. हे शिष्या चन्नबसवा, ऐक. प्राचीनकाळीं अजामिळ नांवाचा एक चोर होता, तो दुष्ट पापी मनुष्य, पोट भरण्याकरितां भटकत भटकत एका सुस्वरूपी, व नृत्यकलेंत प्रवीण,

१६३ अशा वेश्येच्या घरीं जाऊन तिच्यासह देश संचार करूं लागला. व ती वेश्या प्रत्येक ठिकाणीं मिळविलेले पुष्कळ द्रव्य,

१६४ घेऊन आपल्या पूर्वस्थलास [देशास] जाण्यास तयार होऊन 'मित्रगुप्त' नांवाच्या एका शैव राजाच्या देशाला आली.

१६५–१६६ त्या मित्रगुप्त राजाचें एक व्रत होतें तें हेंकीं-'आपल्या घरीं आलेल्या लिंगधारी जंगमाची दोनवेळां मोठ्या भक्तीनें प्रदक्षिणापूर्वक पूजा करून, त्याची अन्नानें तृप्ति करतों, व या योगानें केलेल्या सर्व पापांचा मी नाश करतों' अशा निश्चयानें वाटसरूंचें सर्वस्व हरण करीत असे.

मित्रगुप्तचरांश्चाथ काननाध्वनि कामिनी ॥
दूराद्दृष्ट्वाऽऽह भृत्यं स्वं पश्याऽऽयांति हि दस्यवः ॥१६७॥

संचितं सकलं द्रव्यमशक्तस्त्वं हि रक्षितुम् ॥
अबलाऽहमतो वच्मि शृणूपायं सुखावहम् ॥ १६८ ॥

अस्त्यस्य नियमः कश्चित्प्रातः सायं समागतम् ॥
जंगमं पूजयामीति सविताऽद्यास्तमेष्यति ॥ १६९ ॥

अतो मदर्जितं द्रव्यं लिंगाकारेण बुद्धिमन् ॥
कंठे बध्वा पुरो गच्छ काषायवसनांचितः ॥ १७० ॥

विरक्त इति ते भृत्यास्त्वां नेष्यंति धरापतिम् ॥
सायं तेनार्चितः सम्यक् भुक्त्वान्नं मौनमुद्रितः ॥ १७१ ॥

---

१६७ ती वेश्या, वाटेनें येणाऱ्या मित्रगुप्ताच्या सेवकांना लांबून पाहून आपल्या अजामिल सेवकाला ह्मणते, ' अरे पहा. चोर येत आहेत.

१६८ मी मिळवून आणलेल्या सर्व द्रव्याचें रक्षण करण्यास तूं असमर्थ आहेस, मी तर अबला आहे, करितां सुखकर असा एक उपाय सांगतें, तो ऐक.

१६९ या देशाचा राजा मित्रगुप्त याचें—आपल्या घरीं आलेल्या जंगमाची सकाळीं व संध्याकाळीं पूजा करावी—असें एक व्रत आहे. आतां सूर्यास्ताची वेळ आहे

१७० ह्मणून मी मिळविलेलें सर्व द्रव्य हे बुद्धिमान् पुरुषा, लिंगाकाररूपानें गळ्यांत बांधून, भगवी वस्त्रें धारण करून पुढें जा.

१७१ ते राजसेवक तुला विरक्त [ जंगम ] असें समजून राजाकडे घेऊन जातील, संध्याकाळीं त्या राजाकडून उत्तम रीतीनें पूजिला गेलेला तूं मौन धारण करून, जेवण करून,

ततो निर्गत्य चायाहि शून्यदेवालयं प्रति ॥
आगमिष्यामि तत्रैव निशीथे हृतभूषणा ॥ १७२ ॥
मिलित्वा मामकं देशमावां गच्छाव सत्वरम् ॥
इत्युक्त्वा प्रेषयामास पुरस्तं कूटवेषिणम् ॥ १७३ ॥
आयान्तीं पृष्ठतो वारनारीं प्राप्य शठा भटाः ॥
हृतालंकारसर्वस्वां त्यक्त्वा कौपीनधारिणम् ॥ १७४ ॥
अजामिलं गृहीत्वैनमनयन् राजसान्निधिम् ॥
विरक्तं सायमायातं नीत्वांतर्गृहमर्भक ॥ १७५ ॥
मिष्टान्नभोजनेनैनं मित्रगुप्तो ह्यपूपुजत् ॥
भूपेनाराधितो मौनी प्राणवत्कंठवर्तिनि ॥ १७६ ॥
धनग्रंथौ दत्तदृष्टिर्विस्मृतेतरकर्मकः ॥
लिंगवत्तिष्ठतीत्येवं लिंगं मनसि संस्मरन् ॥ १७७ ॥

---

१७२ त्या राजवाड्यांतून निघून त्या गांवांतील पडीक देवळांत ये, त्या सेवकांनीं सर्व दागिने हिरावून घेतलेली अशी मीही रात्रीं त्या देवळांत येतें.

१७३ नंतर तेथून आपण दोघे मिळून माझ्या देशाला लौकर जाऊं' असें सांगून त्या कपट वेषधारी जंगमास पुढें पाठविलें.

१७४ जंगमाच्या मागें येणाऱ्या त्या वेश्येच्या जवळ येऊन त्या दुष्ट राजसेवकांनीं तिचे सर्व अलंकार हिरावून घेऊन तिला सोडून दिलें, आणि भगवी वस्त्रें धारण करणाऱ्या,

१७५ अजामिळास बरोबर घेऊन हे शिष्योत्तमा, राजासमीप नेलें. सायंकाळीं आलेल्या विरक्त अजामिळास वाड्यांत बोलावून नेऊन,

१७६–१७७ राजा मित्रगुप्तानें मिष्टान्न भोजनानें त्याला संतुष्ट केलें. त्या राजाकडून पूजिला गेलेला, मौनरूपी तो अजामिळ गळ्यांत बांधलेल्या प्राणप्रिय धनसंचयावर दृष्टि असणारा व इतर कर्में विसरून गेलेला हा धन संचय गळ्यांत लिंगाप्रमाणें आहे ह्मणून लिंगाचेंच मनांत स्मरण करीत.

वेश्याप्रतारणायान्यमार्गमाश्रित्य निर्ययौ ॥
लोभासक्तो नरो लोके किं न गच्छत्यसत्पथम् ॥ १७८ ॥
गता शून्यालयं वेश्या कालोऽतीतो न चागतः ॥
स्वकीयः सेवकः किं वा धनलोभादसाधुभिः ॥ १७९ ॥
मारितश्चाथ वाऽऽदाय सर्वं द्रव्यं पलायितः ॥
इति चिंतातुरा भूत्वा बहिर्गत्वाऽवलोक्य तं ॥ १८० ॥
मार्गांतरेण गच्छंतं जग्राह समुपेत्य सा ॥
दृष्ट्वा रुदन्नसौ भृत्यो ररासान्याय्यमित्यलं ॥ १८१ ॥
किमेतदित्यध्वनीनैः पृच्छ्यमानो ह्यजामिलः ॥
विरक्तं मामसद्वेश्या करे गृण्हाति पश्यत ॥ १८२ ॥
अहो मत्सेवको भूत्वा प्रतारयति मामयम् ॥
इति प्रववृते वादस्तयोर्वेश्याभुजंगयोः ॥ १८३ ॥

---

१७८ त्या वेश्येला फसविण्याचे बुद्धीनें त्या पडीक देवळाकडे न जातां दुसऱ्या मार्गानें चालता झाला. बरोबर आहे. कारणः—जगांत लोभासक्त माणसांकडून आडमार्गाचा अवलंब कां होणार नाहीं! (अवश्य होतो.)

१७९–१८० त्या रात्रीं ती वेश्या त्या पडीक देवालयांत गेली. बराच वेळ झाला, आपला नौकर आला नाहीं, धनलोभी अशा दुष्ट लोकांनीं त्याला वाटेंत मारलें तर नसेल! किंवा सर्व द्रव्य घेऊन तो पळून तर गेला नसेल? अशा प्रकारें अनेक तर्क करीत ती वेश्या देवालयाबाहेर थोडेंसे लांब जाऊन,

१८१ दुसऱ्या मार्गानें जाणाऱ्या एका माणसाला पाहून, त्याच्या जवळ जाऊन पाहते तों तो अजामिळच असल्यामुळें त्याला पकडलें. तो सेवक तिला पाहून, अह्राहा! हा अन्याय आहे! असें ह्मणून ओरडला.

१८२ हें काय? असे वाटसरूंकडून विचारला गेलेला तो अजामिळ सांगतोः—'ही दुष्ट वेश्या विरक्त अशा माझा हात धरते, पहा'

१८३ वेश्या तें ऐकून ह्मणते–'अहो हा माझा सेवक असून मला फसवूं पहात आहे' असें ह्मणून वेश्या व तो जार या दोघांचा वाद सुरू झाला.

वादकोलाहलं श्रुत्वा चायाता राजपूरुषाः ॥
विचार्यापाहरंस्तस्य कंठबद्धाखिलं धनम् ॥ १८४ ॥
भृत्यैर्निवेदितो राजा कुपित्वा कूटजंगमम् ॥
छेदयामास खड्गेन मस्तकेऽशस्तवर्तिनम् ॥ १८५ ॥
व्योमयानमथारोप्य शिवदूतैः शठं विटम् ॥
उपानीतं शिवो दृष्ट्वा प्राह नंदीश्वरं वचः ॥ १८६ ॥
पश्य नंदीश तस्यास्य शिवदीक्षा विधीयताम् ॥
कृतदीक्षः पूर्वदिशि कैलासावरणाधिपः ॥ १८७ ॥
नाम्ना डुंढीति विख्यातो मत्सारूप्यं प्रयात्वयम् ॥
बाढमित्यथ तं नंदी दीक्षयित्वा यथाविधि ॥ १८८ ॥
अध्याप्य वेदवेदांगान्यागमांश्च महायशाः ॥
चक्रेऽधिकारिणं पूर्वदिशि कैलासभूभृतः ॥ १८९ ॥

---

१८४ या भांडणाचा आवाज ऐकून पोलीस तेथें आले, व त्यांनीं चौकशी करून त्या अजामिळाच्या गळ्यांत बांधलेलें द्रव्याचें गांठोडें हिसकावून घेतलें,

१८५ आपल्या पोलीसांकडून सांगण्यांत आलेली सर्व हकिकत ऐकून रागावून त्या राजानें त्या जंगम वेशधारी, नीच वर्तनी, कपटी सेवकाचा शिरच्छेद केला.

१८६ नंतर शिव दूतांनीं विमानांत बसवून आपणांकडे आणलेल्या नीच, कपटी अशा त्या सेवकाला पाहून. शिव नंदीला सांगतात.

१८७ हे नंदीश्वरा, पहा याला शिवदीक्षा दे. शिवदीक्षा संस्कारयुक्त अशा याला कैलास दरवाजाचे पूर्व दिशेला अधिपति होऊं दे.

१८८ हा 'डुंढी' नावानें प्रसिद्ध होऊन ममस्वरूपी होवो! नंतर नंदीश्वरानें 'बरें आहे' असें ह्मणून त्या अजामिळास सशास्त्र शिवदीक्षा देऊन

१८९ वेद, वेदांगें व आगम यांचा अभ्यास करवून सत्कीर्ति नंदीश्वरानें कैलासपर्वताच्या पूर्व दिशेचा अधिकार त्याला दिला.

सुयशा संदिहानाऽथ पप्रच्छ प्राणनायकम् ॥
नाथ मे संशयः प्राप्तः कोऽयं ते सन्निधिस्थितः ॥ १९० ॥
अनेन किं तपश्चीर्णमस्य भक्तिश्च कीदृशी ॥
किमात्मकः कृतो यज्ञो यतः प्राप्तेदृशी गतिः ॥ १९१ ॥
इति पृष्टो नंदिकेशः प्राह गंभीरया गिरा ॥
अजामिलस्य वृत्तांतं सुयशायै यथा तथा ॥ १९२ ॥
पुनरप्याह तन्वंगी संदिग्धहृदयांबुजा ॥
दुष्कर्मासक्तचित्तस्य खलस्य परमेश्वरः ॥ १९३ ॥
प्रादात्कथं नु सारूप्यं गम्यं विज्ञानिभिः प्रिय ॥
इति संदेहसंविष्टामब्रवीन्नंदिकेश्वरः ॥ १९४ ॥

---

१९० नंतर सुयशा नांवाची नंदीश्वराची पत्नि साशंक होऊन आपल्या पतीला विचारती झाली कीं—हे प्राणनाथ, मला शंका येत आहे. आपल्या जवळ असणारा हा कोण!

१९१ यानें कोणती तपश्चर्या केली आहे, याची भक्ति कोणत्या प्रकारची, अथवा यानें कोणता यज्ञ केला आहे, कारण हा अशा उच्च पदावर स्थापित झाला आहे.'

१९२ असें विचारला गेलेला नंदीश्वर गंभीर भाषणांनीं अजामिळाची हकिकत यथायोग्य [असेल तशी] प्रकारें सुयशा नामक आपल्या पत्नीला सांगतां झाला.

१९३ ती साशंक मनाची सुयशा आणखी ह्मणाली—'दुष्ट कृत्यांच्या ठिकाणीं गढून गेलेल्या या नीचाला परमेश्वरानें

१९४ उत्तम, ज्ञानी लोकांना मिळण्यास योग्य अशा प्रकारची सारुप्य पदवी हे प्रिया, याला कशी दिली?' अशा प्रकारें शंकित अशा आपल्या पत्नीला नंदिकेश्वर पुन्हां सांगता झाला.

आकर्णय सरोजाक्षि भगवान् भूतभावनः ॥
प्रसीदति नृणां भक्तिमात्रेण न धनादिभिः ॥ १९५ ॥
अयं प्राणावसाने श्रीभूतिभूषितविग्रहः ॥
रुद्राक्षमालिकाभूषो लिंगबुद्धिर्धनेऽप्यभूत् ॥ १९६ ॥
तल्लिंगं संस्मरन्सम्यग्विजहौ स्वकलेवरम् ॥
तेनेदृशी गतिः प्राप्ता योगिसाध्या वरानने ॥ १९७ ॥
संक्षेपेणात्रवं तुभ्यं लिंगतत्त्वं बटूत्तम ॥
इदानीं जंगमस्यापि तत्त्वं वक्ष्यामि संशृणु ॥ १९८ ॥
गुरुणा संस्कृतो दीक्षात्रयेणाचार्यसन्निधौ ॥
अधीतवेदवेदान्तशिवागमसमुच्चयः ॥ १९९ ॥

---

१९५ हे कमलाक्षी–'सर्व प्राण्यांना आत्मवत् मानणारा भगवान् शंकर भक्तीनें प्रसन्न होतो, द्रव्यानें प्रसन्न होत नाहीं.

१९६ हा अजामीळ मरणसमयीं भस्मानें बिभूशित अशा शरिराचा, रुद्राक्ष माला धारण करणारा, द्रव्याचें ठिकाणीं लिंग भावना ठेवतां झाला.

१९७ त्या लिंगाच्या ध्यान करण्यांतच त्यानें आपला देह सोडला. (मृत्यू पावला) हे सुमुखी, त्या कारणानें तपस्वीजनांना प्राप्त होणारी ही मुक्ति त्याला मिळाली.

१९८ हे शिष्यश्रेष्ठा, लिंगतत्त्व मी तुला संक्षेपरूपानें सांगितलें. यापुढें जंगम तत्त्व सांगतों, तें ऐक.

१९९ गुरूकडून तीन्हीं प्रकारच्या दीक्षेचा संस्कार झालेला आणि आचार्याच्या संनिध (गुरूजवळ) वेद, वेदांत, शिवागम यांचा अभ्यास केलेला,

प्राचीनवासनोत्कर्षाद्विषयेष्वखिलेष्वपि ॥
वांतान्नकाकलिष्ठादिष्विव बीभत्सबुद्धिमान् ॥ २०० ॥
माहेश्वरो विरागित्वं भुंक्ते लिंगात्तमानसः ॥
ततो वैराग्यसंपत्तौ सुस्थिरायां विवेकवान् ॥ २०१ ॥
सर्वसंगं परित्यज्य सन्यासाश्रममर्जति ॥
गुरूपदिष्टमार्गेण तत्त्वमस्यादिवाक्यजम् ॥ २०२ ॥
लिंगांगसामरस्यस्वरूपज्ञानं भजत्यसौ ॥
नित्याभ्यासभराद्ज्ञाने दृढीभूते निराकुलः ॥ २०३ ॥
अपरोक्षीकृतब्रह्मा ब्रह्मभूयाय कल्पते ॥
अभ्यासनिर्भरेणासौ सर्वं ब्रह्म समीक्षते ॥ २०४ ॥
नातिरिक्तं समीक्षेत निजानंदमयो मुनिः ॥
निर्धूतविषयास्वादो नित्यमंगलविग्रहः ॥ २०५ ॥

---

२००–२०१ आपण खाऊन ओकलेल्या अन्नाचे ठिकाणीं जशी तुच्छता असते, अगर काकादि–( कावळा वगैरे ) कांच्या मलाचे ठिकाणीं जशी तुच्छता असते, तशी सर्व विषयांचेठिकाणीं पूर्व जन्मांतील संस्कार विशेषामुंळ तुच्छ बुद्धीचा माहेश्वर, लिंगाचेठिकाणीं आसक्त मनाचा होऊन वैराग्य पावतो. नंतर वैराग्य-संपत्ति स्थिर होत असतां, विवेकशाली माहेश्वर,

२०२ सर्व संग परित्याग करून, संन्याशाश्रम प्राप्त करून घेतो. गुरूनें दाखविलेल्या मार्गानें ' तत्त्वमस्यादि ' वाक्यापासून उत्पन्न झालेल्या

२०३ लिंगांग सामरस्य रूपाचें ज्ञान हा संन्यासी मिळवूं शकतो. तें ज्ञान सतत अभ्यासातिशयामुळें बळकट होत असतां, व्याकुळ रहित होऊन

२०४ ब्रह्मसाक्षात्कारी होऊन तो ब्रह्मच होतो. अभ्यासातिशयामुळें हा जंगम सर्व जगाला ब्रह्मरूप मानून वागत असतो.

२०५ निजानंदयुक्त असा हा मुनि जगाला ब्रह्मातिरिक्त [ ब्रह्मापेक्षां निराळें ] असें समजत नाहीं. विषयोपभोगाचा तिरस्कार केलेला नेहमीं मंगल शरीरी,

निजानंदमयो भूत्वा चरतीति चरः स्मृतः ॥
निर्ममो निरहंकारो नित्यबुद्धो निरामयः ॥ २०६ ॥

निर्मायो निरपायोऽसौ निराभारीति गीयते ॥
न संतुष्टाति मानेऽसावपमाने न कुप्यति ॥ २०७ ॥

जरामृत्युभयातीतो जितकामो जितेंद्रियः ॥
संचरन् सर्वदेशेषु सद्बोधामृतमुत्तमम् ॥ २०८ ॥

भक्तान्संपाययन्योगी कुर्यान्नैकत्र संस्थितिम् ॥
प्रमादादपि नैकस्मिन् गृहिगेहे वसेद्यतिः ॥ २०९ ॥

व्यामोहयति संसारिसंसर्गो विषवन्नरम् ॥
तांबूलं कोमलां शय्यां चंदनाद्यंगलेपनम् ॥ २१० ॥

---

२०६ असा जंगम निजानंदमय होऊन भटकत असतो म्हणून हा जंगम 'चर' म्हणविला जातो. अहंकार व ममकाररहित नित्यबुद्ध, व निरामय

२०७ मायारहित, अपायरहित, असून हा 'चर' निराभारी असें म्हणविला जातो. हा निराभारी जंगम मानानें संतुष्ट होत नाहीं अथवा अपमानानें रुष्ट होत नाहीं ( नेहमीं आनंद मूर्ति )

२०८ म्हातारपण व मृत्यु यांचें भय नसलेला, जितकाम, जितेंद्रिय, होऊन जगभर संचार करीत, उत्तम असें बोधामृत

२०९ भक्तांना पाजविणारा अशा योग्यानें एकाच ठिकाणीं राहूं नये. जर सदर जंगम चुकून एकाच गृहस्थाश्रमियाचें एथें राहिला असल्यास.

२१० संसारी लोकांचा संसर्ग त्या संन्याशाला विषाप्रमाणें मोहित करतो तांबूल, कोमल शय्या, चंदनादि अंगलेपन द्रव्य,

अभ्यंगं केशसंस्कारं त्यजेदंत्याश्रमी सदा ॥
दर्शनं स्पर्शनं गुह्यभाषणं परिहासनम् ॥ २११ ॥

एकशय्यासनं योगी वर्जयेद्वानिताजनैः ॥
चापासिचक्रतूणीरगदाद्यायुधधारणम् ॥ २१२ ॥

जंगमेन न कर्तव्यं कर्तव्यं शिवपूजनम् ॥
कारागार युद्धभूमिं श्मशानं न विशेद्यतिः ॥ २१३ ॥

विशेच्छैवालयं भिक्षाचारं कर्तुमनिंद्यधीः ॥
नारोहेदश्वमातंगांदोलिकादि च वाहनम् ॥ २१४ ॥

आरोहेद्विष्टरं शंभोः पूजार्थं विजितेंद्रियः ॥
वाणिज्यं कृषिकर्मादिव्यवहारं विवर्जयेत् ॥ २१५ ॥

२११–२१२ अभ्यंगस्नान, केश संस्कार (तेल लावून विंचरणें, वेणी घालणें वगैरे) हे संन्याशाश्रमी जंगमानें नेहमीं वर्ज्य करावेत. त्या शिवयोग्यानें—स्त्रियांचें दर्शन, स्पर्श, स्त्रियांशीं एकांतांत भाषण करणें, त्यांच्याशीं हास्य करणें, त्यांच्यासह एकाच अंथरुणावर बसणें, हीं सर्व सोडावीत. तसेंच धनुष्य, तरवार, चक्र, भाते, गदा, वगैरे आयुधें धारण करणें,

२१३ हें जंगमाचें कर्तव्य नसून शिवपूजा करणें हेंच जंगमाचें कर्तव्य होय. जंगमानें कारागृह [ तुरंग ] युद्धभूमि, स्मशान या ठिकाणीं मुळींच प्रवेश करूं नये,

२१४ अनिंद्य बुद्धीच्या (स्तुत्य बुद्धीचा) जंगमानें भिक्षेकरितां शैवांचे घरीं प्रवेश करावा, आणि घोडा, हत्ती, पालखी इत्यादि वाहनांत बसूं नये, तर

२१५ जितेंद्रिय अशा जंगमानें शिवपूजेकरितां फक्त पूजासनावर बसावें, व्यापार, शेतकी, वगैरे धंदे संन्याशानें वर्ज्य करावेत.

रसं रसायनं भूतवेतालोच्चाटनं तथा ॥
जारणं मारणं कर्म मंत्रवादं त्यजेद्यतिः ॥ २१६ ॥

जटाधार्यथ वा मुंडी काषायांबरभूषितः ॥
भालोल्लसितभस्माच्छत्रिपुंड्रः पंडितोत्तमः ॥ २१७ ॥

भूशय्यः पाणिपात्रश्च नित्यमेकांतसंरतिः ॥
आत्मारामो महात्मासावात्मन्यात्मावलोकनः ॥ २१८ ॥

एतल्लक्षणसंपन्नः शिवयोगी धराशिवः ॥
यत्र तिष्ठति तत् क्षेत्रं तीर्थं तत् यत्र मज्जति ॥ २१९ ॥

तादृशस्य विरक्तस्य कटाक्षाः करुणान्विताः ॥
वाक्यानि पादपाथोजपांसवो मुक्तिदायकाः ॥ २२० ॥

---

२१६ रस, रसायन, भूत पिशाचांचे मंत्रादिकांनीं उच्चाटन करणें, चेटकें वैगेरे करणें, ठार मारणें, इत्यादि वाईट कामें सोडावींत,

२१७ संन्याशानें जटाधारी अथवा मुंडी ( समूळ मुंडण केलेला ) असावें भगवीं वस्त्रें परिधान करावींत, कपाळीं भस्म त्रिपुंड्र धारण करावें, सर्व शास्त्रांत निष्णात असावें,

२१८ आणि जमिनीवर निजावें, ( बाज, पलंग, मृदु आंथरुण वैगेरे रहित ) हात हेच जेवणाचें पात्र [ ताट ] असावें, नेहमीं एकांत वासप्रिय असावें, स्वतांच्या ठिकाणींच रममाण असावें, उदार अंतःकरणी असावें, आपल्या ठिकाणीं आपलें स्वरूप पहावें,

२१९ अशा लक्षणांनीं युक्त असा शिवयोगी ( संन्यासी ) हा भूतलावरील प्रत्यक्ष शिवच होय. हा शिवयोगी जेथें रहातो तें क्षेत्र ह्मणविलें जातें ज्या पाण्यांत स्नान करतो तें तीर्थ ह्मणविलें जातें,

२२० अशा प्रकारच्या विरक्ताचे कृपायुक्त कटाक्ष ( पाहाणें ), वचन, पाद कमलांचे रजःकण, हीं सर्व लोकांना मुक्ति देणारीं अशीं होतात.

एकमूर्तेस्त्रयो भागा गुरुर्लिंगं च जंगमः ॥
शिवरूपं शिवांशं च जंगमं प्रणमेत्पुमान् ॥ २२१ ॥
बहवो भक्तिसंपन्ना जंगमं शिवरूपिणम् ॥
स्मृत्वा ध्यात्वा च संपूज्य भेजिरे परमं पदम् ॥ २२२ ॥
सुरांगनाशिरोरत्नरंजितांघ्रिसरोरुहा ॥
पातु मां भवरोगार्तिहारिणी गिरिजा सदा ॥ २२३ ॥

—❁ इति द्वितीयोऽध्यायः समाप्तः ❁—

---

२२१ एकच शिव—गुरु, लिंग, जंगम— अशा तीन स्वरुपांत आहे. त्यामुळें शिवांश अथवा शिवरूपी जंगमास भक्तांनीं नेहमीं नमस्कार करावा.

२२२ भक्तिवान् असे पुष्कळ लोक शिवस्वरूपी जंगमाचें, स्मरण करून, ध्यान करून, पूजाकरून, पुनरावृत्ति रहित असें स्थान ( मोक्ष ) मिळविते झाले.

२२३ नमस्कार करण्याचे वेळीं सुरांगनांच्या शिरोभागावरील रत्नाभरणाच्या तेजानें जिचे पदकमल प्रकाशमान् झालेले आहेत आणि भवरोगाचें निवारण करणारी अशी पार्वतीदेवी माझें रक्षण करो.

अध्याय २ रा समाप्त.



॥ श्रीरस्तु ॥

ॐनमः पंचजगद्गुरुभ्यः

## श्री. ष. ब्र. चन्नबसव विजय पुराणम्ः



# श्रीरस्तु अथ तृतीयोऽध्यायः शिवमस्तु

शिवाय शांताय नमो नमस्ते श्रुतिश्रुतानंतगुणाकराय ॥
शुभाय शर्वाय नमो नमस्ते शिवंकरायारिभयंकराय ॥ १ ॥
अथ पंचाक्षरीविद्यामाहात्म्यं कथयामि ते ॥
यच्छ्रुत्वा मानवा भक्त्या भविष्यंति भवापहाः ॥ २ ॥
तितीर्षोर्विषयग्राहभीमं संसारसागरम् ॥
शैवी पंचाक्षरी विद्या यंत्रनौरिव वर्तते ॥ ३ ॥

---

१ मंगलस्वरूपी, शांत, वेदांत वर्णन केल्याप्रमाणें अनेक गुणांचा सांठा, शुभकारक, प्रळय काळाचे वेळीं प्राण्यांचा संहार करणारा, शत्रूंना भीतिदायक, अशा शिवाला माझा पुन्हा पुन्हा नमस्कार असो.

२ हे शिष्यश्रेष्ठा, आतां अशा पंचाक्षरी मंत्राचें महत्त्व मी तुला सांगतों, कीं ज्या पंचाक्षरी मंत्राचें महात्म्य भक्तिपूर्वक ऐकून भक्तजन भवरोगाचें निवारण करूं शकतात.

३ अनेक विषयरूपी भयंकर नक्रांनीं युक्त असा हा भवसमुद्र तरून जाण्याचें इच्छिणाऱ्यास हा शिवपंचाक्षरी मंत्र नावेप्रमाणें उपयोगी आहे.

वेदेष्वागमसंघेषु शैवमंत्रः षडक्षरः ॥
प्रख्यातो वर्तते चायं लोके पंचाक्षरः स्मृतः ॥ ४ ॥
सर्वमंत्रोत्तरश्चायमोंकारादिः षडक्षरः ॥
भक्त्यवच्छिन्नचित्तानां नृणां सर्वफलप्रदः ॥ ५ ॥
स्वल्पाक्षरो विशालार्थो वटबीजमिवार्भक ॥
असंदिग्धार्थसंयुक्तो वेदसारः शिवात्मकः ॥ ६ ॥
मंत्रः सुखसुखोच्चार्यः सकलार्थप्रसिद्धये ॥
सदों नमः शिवायेति सिद्धिकामेन सूरिणा ॥ ७ ॥
देवो गुणत्रयातीतः सांबः सत्यादिलक्षणः
ओमित्येकाक्षरे मंत्रे स्थितोऽनुग्राहकः शिवः ॥ ८ ॥

---

४ वेदांमध्यें आगमांच्या समूहांत, हा शैवमंत्र 'षडक्षर' ह्मणून प्रसिद्ध आहे. हाच मंत्र या लोकांत पंचाक्षरी ह्मणून प्रसिद्ध आहे.

५ सर्व मंत्रांत श्रेष्ठ असलेला व ज्याचे आरंभी ॐ कार आहे असा षडक्षरी मंत्र भक्तिवान् मनुष्यास सर्व फल देणारा असा होतो.

६–७ अक्षरांनीं थोडा असला तरी अनेक अर्थांनीं परिपूर्ण असा हा वटबीजप्रमाणें, ( वडाचें बीं अगदीं लहान असलें तरी त्यांतून उत्पन्न होऊन अनेक शाखा दिकांनीं वाढलेलें वडाचें झाड केवढें मोठें असतें त्याप्रमाणें ) असंदिग्ध ( संशय नसलेला ), अर्थ संपन्न, वेदांचा सारभूत, शिवात्मक, हे शिष्या, असा "ॐ नमः शिवाय" हा शिव पंचाक्षरी मंत्र सर्व सिद्धी इच्छिणाऱ्या बुद्धिमान् पुरुषाकडून इच्छितकार्य सिद्धि करण्याकारितां सुखमुखानें ( अतिस्पष्टतेनें ) उच्चारिला जावा.

८ रज, तम, सत्व या त्रिगुणातींत, प्रकाशमान, अंबिकेसहित [शक्ति विशिष्ट] सत्यादि लक्षणात्मक, सर्वांना अनुग्रह करणारा असा शिव 'ॐ' या एकाक्षर मंत्रांत आहे.

ईशानादीनि सर्वाणि पंचब्रम्हाणि तानि वै ॥
मंत्रे नमः शिवायेति संस्थितानि यथाक्रमम् ॥ ९ ॥
मंत्रे षडक्षरे सूक्ष्मपंचब्रम्हतनुः शिवः ॥
वाच्यवाचकरूपेण संस्थितः परमेश्वरः ॥ १० ॥
प्रमेयत्वाच्छिवो वाच्यो मंत्रस्तद्वाचकः स्मृतः ॥
वाच्यवाचकता चेयमनादिः संस्थिता तयोः ॥ ११ ॥
ऋतं सत्यं परं ब्रह्मेत्याहाऽपौरुषवाक् शिवम् ॥
अतो हि ब्रम्हवाच्यत्वं मुख्यवृत्त्या शिवे स्थितम् ॥१२ ॥
तदन्येषु च शब्देषु गौणवृत्त्या विधीयते ॥
तस्माच्चंद्रार्धभूषस्य चिदानंदस्वरूपिणः ॥ १३ ॥

---

९ आणि 'नमः शिवाय' या पंचाक्षरी मंत्रांत ईशानादि सर्व पंच ब्रह्म अनुक्रमें असतात.

१० या षडक्षर मंत्रांत सूक्ष्म पांच ब्रह्म हेच ज्याचें शरीर आहे असा परमेश्वर जो शिव तो वाच्य [ अर्थ ] वाचक [ शद्ब ] या रूपानें असतो.

११ प्रमेय असल्यामुळें शिव वाच्य होतो. ( मंत्राचा अर्थ होतो ) मंत्र अर्थाचा वाचक आहे. ही वाच्यवाचकता शिव व मंत्र या दोहोंच्या ठिकाणीं अनादि कालापासून आहे.

१२ 'ऋतम्, सत्यम्, परम्, ब्रह्म' असे वेद शिवाला ह्मणतात. यामुळें शिवाचे ठिकाणीं ब्रह्मवाच्यत्व [ ब्रह्म शद्बाचा अर्थ ] मुख्य वृत्तीनें [ अभिदा वृत्तीनें ] असतें. लक्षणादि वृत्तीनें असत नाहीं.

१३ इतर शद्बाचे ठिकाणीं, गुणवृत्तीनें शिवाचा अर्थ असतो. ह्मणून अर्धचंद्रधारी, शिवानंद स्वरूपी अशा परमेश्वराचें

शिवेति नाम वेदेषु शास्त्रेषु प्रथितं परम् ॥
तदाश्रयान्महामंत्रः पंचाक्षर इति स्मृतः ॥ १४ ॥
तितीर्षुभिरतो जप्यः संसारशरधिं सदा ॥
पुनरावृत्तिरहितं प्राप्यते परमं पदम् ॥ १५ ॥
पृथिव्यादीनि भूतानि पंच तन्मात्रकाणि च ॥
ज्ञानेंद्रियाणि पंचापि तथा कर्मेंद्रियाणि च ॥ १६ ॥
सद्यादिपंचब्रम्हाणि कृत्यानि सह कारणैः ॥
यथाक्रमं पंचवर्णैर्ज्ञेयान्यस्य महामनोः ॥ १७ ॥
यथाऽनादिः प्रवृत्तोऽसौ घोरः संसारसागरः ॥
तथाऽनादिः शिवो नृणां संसारान्मोचकः स्मृतः ॥ १८ ॥

---

१४ 'शिव' ह्मणून नांव वेदांमध्यें व शास्त्रांमध्यें अतिशय प्रसिद्ध आहे, त्या शिव शद्बाचा आश्रय करण्यानें हा महामंत्र 'शिवपंचाक्षर' ह्मणून सांगण्यांत आला.

१५ यामुळें भवसागर तरून जाण्याची इच्छा करणाऱ्या लोकांनीं या शिव पंचाक्षर मंत्राचा नेहमीं जप करावा. या जपाचेयोगानें पुनरावृत्तिरहित असें 'मोक्षपद' प्राप्त होतें.

१६ पृथ्व्यादि पंचमहाभूतें, शद्बतन्मात्रादि पंचतन्मात्रें, चक्षुरादि पंच ज्ञानेंद्रियें, वागादि पंच कर्मेंद्रियें,

१७ सद्योजातादि पंचब्रह्म, कारणांनींयुक्त सृष्ट्यादि पंच कृत्यें हीं सर्व या शिव पंचाक्षरी मंत्रांत अनुक्रमानें असतात.

१८ हा भयंकर संसाररूपी समुद्र जसा अनादिकालापासून चालत आलेला आहे त्याप्रमाणें शिवही अनादि असून मनुष्यांचा संसारमोचक असा म्हणविला जातो.

सर्वेषां व्याधिजातानां प्रतिपक्षं यथौषधम् ॥
सर्वसंसारदोषाणां प्रतिपक्षः शिवस्तथा ॥ १९ ॥
सर्वेषां मंत्रयूथानां प्रधानोऽयं षडक्षरः ॥
सेव्यः सर्वैर्नरैश्चंद्रो नक्षत्राणामिवार्भक ॥ २० ॥
मंत्रे षडक्षरेऽमुष्मिन् सांगवेदाश्च संस्थिताः ॥
न तेन सदृशो मंत्रश्चापरो विद्यते क्वचित् ॥ २१ ॥
शैवः षडक्षरो मंत्रो हृदि यस्य विराजते ॥
किं तस्यानेकमंत्रैर्वा शास्त्रैर्वा बहुविस्तृतैः ॥ २२ ॥
तेनाधीताऽखिला विद्या तेनार्थाः साधिताः शुभाः ॥
येनों नमः शिवायेति मंत्रोऽभ्यासस्थिरीकृतः ॥ २३ ॥

---

१९ सर्व प्रकारच्या रोगांचा-- औषध हें-- प्रतिकार करणारें आहे त्या प्रमाणें या संसारांतील सर्व दोषांचा नाश करणारा शिव आहे.

२० सर्व तारागणांमध्यें चंद्र श्रेष्ठ आहे त्याप्रमाणें सर्व मंत्रांत हा शिवषडक्षर मंत्र श्रेष्ठ आहे. हे पुत्रा, अशा प्रकारचा हा शिवषडक्षर मंत्र सर्वांनीं नेहमीं जपावा.

२१ या षडक्षर मंत्रांत व्याकरणादि षडंगांसहित वेद आहेत, या मंत्राच्या बरोबरीचा दुसरा मंत्र कोठें नाहीं.

२२ हा शैव षडक्षर मंत्र ज्याच्या अंतःकरणांत नेहमीं असतो त्याला इतर मंत्राची किंवा अति मोठ्या शास्त्रांची काय जरुरी आहे.

२३ ज्याचेकडून ' ॐनमःशिवाय ' हा मंत्र नित्याभ्यासानें अंतःकरणांत दृढ झालेला आहे, त्याचेकडून सर्व शास्त्रांचें अध्ययन झालें आहे, त्यानें सर्व प्रकारचे अर्थ साधलेले आहेत असें समजावें.

नमः पूर्वं शिवायेति वर्णत्रयमनुत्तमम् ॥
जिव्हाग्रे वर्तते यस्य सफलं तस्य जीवितम् ॥ २४ ॥
द्विजातिर्वांऽत्यजातिर्वा मूर्खो वा पंडितोऽपि वा ॥
कृतपंचाक्षराभ्यासो मुच्यते भवबंधनात् ॥ २५ ॥
कृत्वा स्नानं शुचौ देशे बध्वाऽसनमुदारधीः ॥
विहितप्राणयामः सन् ध्यात्वा हृदि सदाशिवम् ॥ २६ ॥
प्राङ्मुखो वाथवा चोदङ्मुखश्चैकाग्रमानसः ॥
बीजं शक्तिं तथा वाच्यमृषिं छंदोऽधिदैवतम् ॥ २७ ॥
स्मृत्वा पंचाक्षरं मंत्रं जपेदालस्य वर्जितः ॥
त्रिप्रकारो जपः प्रोक्तो वाचिकोपांशुमानसाः ॥ २८ ॥
यदुच्चनीचस्वरितैः पदैः स्पष्टाक्षरैस्तथा ॥
मंत्रमुच्चारयेद्वाचा स वाचिकजपः स्मृतः ॥ २९ ॥

---

२४ ज्याच्या जिभेच्या शेंड्यावर ' नमः ' हीं दोन अक्षरें आरंभी व ' शिवाय ' हीं तीन अक्षरें शेवटीं असलेला मंत्र ( नमः शिवाय ) असतो त्याचें जगणें सफल होय.

२५ ब्राह्मण असो अथवा चांडाळ असो, मूर्ख असो वा पंडित असो, जो कोणी पंचाक्षरी मंत्राचा नेहमीं जप करतो, तोच संसार बंधनांतून मुक्त होतो.

२६–२७ स्नान करून, पवित्रस्थळीं पूर्व अथवा उत्तर मुखी, आसनावर बसून, उदार अंतःकरणाच्या पुरुषानें प्राणायाम करून अंतःकरणांत सदाशिवाचें ध्यान करून, एकाग्रचित्तानें, बीज, शक्ति, अर्थ, ऋषि, छंद, अधिदेवता,

२८ यांचें स्मरण करून निरालसपणें पंचाक्षर मंत्राचा जप करावा. या मंत्राचा जप--वाचिक, उपांशु, नामस--अशा तीन प्रकारचा आहे.

२९ उदात्त, अनुदात्त स्वरित या स्वरयुक्त स्पष्ट अक्षरें असलेल्या अशा शद्वांनीं, दुसऱ्यास ऐकूं जाईल अशा रीतीनें स्पष्टपणें उच्चार करणें याला ' वाचिक ' जप ह्मणतात.

किंचित्स्पंदितदंतौष्ठमीषदुच्चारिताक्षरः ॥
अश्रुतोऽन्यजनैः स्वेन श्रुतः सोऽयमुपांशुकः ॥ ३० ॥
मनसा मंत्रवर्णानां प्रत्येकाक्षरमुच्चरन् ॥
जपेदर्थानुसंधानपूर्वं मानस उच्यते ॥ ३१ ॥
वाचिकस्त्वेकगुणकश्चोपांशुश्च शताधिकः ॥
जपो मानसिकश्चाथ सहस्रगुण ईर्यते ॥ ३२ ॥
उक्तेष्वेतेषु विध्युक्तं यथाकामं यथाक्रमम् ॥
जपेत्पंचाक्षरं मंत्रं भवबंधविमुक्तये ॥ ३३ ॥
उष्णीषी कंचुकी नग्नो मुक्तकेशः पिबन्जपः ॥
अशुद्धोऽशुद्धहस्तश्च विलपन् न जपेदमुम् ॥ ३४ ॥

---

३० दांत व ओठ यांच्या किंचित हालण्यानें व इतर जनाला न ऐकूं जातां स्वतांला स्पष्ट ऐकूं येणारें हळू उच्चारलेले अक्षरयुक्त अशा प्रकारच्या मंत्रोच्चारास ' उपांशु ' जप ह्मणतात.

३१ प्रत्येक मंत्राक्षराचा उच्चार मनांत करीत, अर्थानुसंधानपूर्वक ( अर्थ समजून घेत ) केलें जाणाऱ्या जपास ' मानस ' जप ह्मणतात.

३२ वाचिक जपास एकपट फलप्राप्त होत असल्यास त्याच्या शतपट फल ' उपांशु ' जपानें व हजारपट फल मानस जपानें प्राप्त होतें.

३३ वर सांगितलेल्या जपांपैकीं कोणत्याही एका प्रकारें भव बंधनांतून मुक्त होण्याकरितां नेहमीं यथाक्रम शिवपंचाक्षर मंत्राचा यथाशास्त्र जप करावा.

३४ डोक्यास ( टोपी रुमाल ) कांहीं घालून, आंगांत कपडे घालून नग्न स्थितींत डोकीचे केस मोकळे सोडून, पाणी पीत, अशुद्ध स्थितींत, अशुद्ध हस्त असल्यावेळीं, गोष्टी बोलत, जप करूं नये.

अश्नन् गच्छन् शयानश्च हसन्नुत्थानवानपि ॥
अपवित्रस्थले मार्गे न जपेद्धितकामुकः ॥ ३५ ॥

प्रसार्य न जपेत्पादौ कुक्कुटासन एव वा ॥
यानशय्याधिरूढो वा न जपेच्चिंतयाकुलः ॥ ३६ ॥

शक्तश्चेदुक्तमेवैतदशक्तः शक्तितो जपेत् ॥
अनुज्झित्वा सदाचारं जपन् भद्रं समश्नुते ॥ ३७ ॥

अनेन शैवमंत्रेण शिवलिंगं प्रपूजयेत् ॥
भक्त्यनवच्छिन्नहृदयो व्यक्तभावः शिवे गुरौ ॥ ३८ ॥

अनन्यभक्तिसंपन्नः पुमान् पंचाक्षरेण तम् ॥
पूजयेच्चेत्सकृत् सांबं सोऽप्येष्यत्यभवं पदम् ॥ ३९ ॥

---

३५ त्याचप्रमाणें-खात असतां, जात असतां, निजत, हसत, उभे असतां, अपवित्र ठिकाणीं, वाटेंत इत्यादि स्थितींत कल्याणाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें जप करूं नये.

३६ तसेंच-पाय पसरून, चवड्यावर बसून, वाहनावर बसून, आंथरुणावर बसून, चिंतेनें व्याकूळ होऊन जप करूं नये.

३७ सामर्थ्य असणारांनीं शास्त्रांत सांगितला आहे तेवढा असमर्थ असल्यास आपल्या शक्त्यनुसार जप करावा. सदाचार न सोडतां मंत्राचा जप करणारा पुरुष कल्याण प्राप्त करून घेतो. ( सदाचाऱ्यांनाच हा मंत्र फलद्रूप होतो )

३८ शिव व गुरु यांचे ठिकाणीं पूर्ण भक्ति असणाऱ्या भक्तानें, या शिवमंत्रानें शिवपूजा करावी.

३९ अनन्यभक्ति परिपूर्ण अशा पुरुषानें एकवेळ परमात्म्याची या शिवपंचाक्षरी मंत्रानें पूजा केल्यास तोसुद्धां शिवपद मिळवूं शकतो.

तस्मात्तपांस्यनेकानि यज्ञा नानाविधाश्च ये ॥
बहुधाश्च व्रता एते नो समाः शैवविद्यया ॥ ४० ॥

विशुद्धो वाऽप्यशुद्धो वा यो वा को वा भवत्वपि ॥
सकृत्पंचाक्षरेणेशं पूजयेत्सोऽपि मुच्यते ॥ ४१ ॥

सकृदुच्चारमात्रेण पंचाक्षरमहामनोः ॥
सर्वेषामपि जंतूनां सर्वपापक्षयो भवेत् ॥ ४२ ॥

इत्यागमप्रमाणस्य सद्भावान्नात्र संशयः ॥
मुक्तो भवति मंत्रेण भक्तिरत्र विशिष्यते ॥ ४३ ॥

सानंदो नाम योगींद्रः पंचाक्षरमनुं पुरा ॥
उच्चार्योद्धारयामास नरान्निरयगामिनः ॥ ४४ ॥

---

४० ह्मणून-अनेक प्रकारच्या खडतर तपश्चर्या, अश्वमेधादि अनेक प्रकारचे यज्ञ, कृच्छ्र चांद्रायणादि अनेकविध व्रतें हीं शिव पंचाक्षरी मंत्राची बरोबरी करूं शकत नाहींत.

४१ शुचिर्भूत असो वा नसो यापैकीं कसल्याही पुरुषानें अव्यभिचारी ( निर्दोष ) भक्तीनें शिवपंचाक्षरी मंत्रानें एकवेळ शिवपूजा केल्यास तोही बंधमुक्त होतो.

४२ या शिव पंचाक्षरी महामंत्राचा एकच वेळ उच्चार केल्यानें सर्व प्राण्यांच्या सर्व पापांचा नाश होतो.

४३ अशा प्रकारें आगमाधार या मंत्राला असल्यामुळें, या मंत्राचा जप करणारा मनुष्य मुक्त होतो. यांत मुळींच संदेह नाहीं. मात्र तशा प्रकारची भक्ति असली पाहिजे.

४४ प्राचीन काळीं सानंद नांवाच्या मुनिश्रेष्ठानें पंचाक्षरी महामंत्राचा उच्चार करून, नरकांत खितपत पडलेल्यांचा-- त्या नरकापासून उद्धार केला.

पंचाक्षरप्रभावेन शतानंदो मुनिः पुरा ॥
नरकं नाकमकरोत्संगिरस्यापि पापिनः ॥ ४५ ॥
उपमन्युः पुरा शैवशतमन्युर्मनोस्तदा ॥
सामर्थ्यादाप्तवान् शैवशास्त्राचार्यत्वमीश्वरात् ॥ ४६ ॥
वामदेवभरद्वाजवसिष्ठमुखतापसाः ॥
मंत्रेणानेन संसिद्धिं प्राप्तास्ते मुक्तकिल्बिषाः ॥ ४७ ॥

—०: अथ विभूतिमाहात्म्यम् :०—

अथ श्रीचन्नवीरोऽसौ शिवाचार्यशिरोमणिः ॥
शिष्याय प्राह माहात्म्यं भस्मनः श्रुतिचोदितम् ॥ ४८ ॥
भूत्यै न प्रमदितव्यमित्युक्तं तैत्तरीयके ॥
श्रुतावतः सुखाकांक्षी भस्मधारणमाचरेत् ॥ ४९ ॥

---

४५ पूर्वी शतानंद नांवाच्या मोठ्या तपस्व्यानें या पंचाक्षरी मंत्राच्या सामर्थ्यानें अतिशय पापिष्ट अशा अंगिरस नांवाच्या आपल्या शिष्याच्या उद्धाराकरितां नरकाचाच स्वर्ग केला.

४६ तसेंच उपमन्यु नांवाच्या शैव श्रेष्ठानें, या पंचाक्षर मंत्राच्या सामर्थ्यानें परमेश्वराकडून शैवशास्त्राचें आचार्यत्त्व मिळविलें.

४७ वामदेव, भरद्वाज, वशिष्ठ वगैरे महातपस्व्यांनीं या मंत्रानेंच पापमुक्त होऊन सिद्धि मिळविली.

—:०: भस्म महात्म्य :०:—

४८ नंतर शिवाचार्य शिरोमणी अशा चन्नवीर गुरुश्रेष्ठानें, आपल्या चन्नत्रसत्र शिष्यास वेदोक्त असें ‘ भस्म महात्म्य ’ सांगितलें.

४९ तैत्तरीयक नांवाच्या श्रुतिमध्यें ‘ भूत्यै न प्रमदितव्यं ’ असें सांगितल्यानें सुख इच्छिणाऱ्या मनुष्यानें भस्म धारण करावें.

भस्मधारणसंपन्नो दश पूर्वान् दशापरान् ॥
पुंसः पुनाति चात्मानं पंक्तिं चाप्येकविंशतिम् ॥ ५० ॥
पुनाति ब्राह्मणश्चाथ सायुज्यं च सलोकताम् ॥
प्राप्नोतीत्याह भगवान् बोधायनमहामुनिः ॥ ५१ ॥
कालाग्निरुद्रजाबालाद्यनेकोपनिषत्सु च ॥
भस्मधारणवैशिष्ट्यं कथितं मुनिपुंगवैः ॥ ५२ ॥
वेदेषु शास्त्रसंघेषु न कुर्याद्भस्मधारणे ॥
प्रमादमिति वाक्यानि शतशः सन्ति सुव्रत ॥ ५३ ॥
उध्दूलनं त्रिपुंड्रं च सर्वाश्रमनिषेविणाम् ॥
वर्णानामखिलानां च प्रशस्तमिति कथ्यते ॥ ५४ ॥
उध्दूलनं त्रिपुंड्रं च ज्ञानांगत्वेन साधनम् ॥
आमनंति मुनिश्रेष्ठा अथर्वशिरसि स्थिताः ॥ ५५ ॥

---

५०-५१ भस्म धारण केलेला पुरुष त्यांच्यापूर्वी झालेल्या व पुढें होणाऱ्या प्रत्येकी दहा दहा पिढ्यांचा उद्धार करतो, आणि तो ब्राह्मण स्वतांला व एकवीस पंक्तींना पवित्र करतो, आणि सायुज्य व सलोकता या मुक्ति मिळवितो, असें भगवान् बोधायन नांवाच्या महा मुनीनें सांगितलें आहे.

५२ कालाग्निरुद्र, जाबाल इत्यादि उपनिषदांमध्यें मुनिश्रेष्ठांनीं भस्म धारणेचें वैशिष्ट्य वर्णन केलेलें आहे.

५३ वेदांत, शास्त्र समुद्रांत, भस्म धारणेंविषयीं चूक करूं नये, ह्मणून हे सुव्रत, शेंकडों वचनें आहेत.

५४ ब्राह्मणादि सर्व वर्णांना, ब्रह्मचर्यादि सर्व आश्रम्यांना, भस्माचें उध्दूलन ( सर्वांगाला फासणें ) व भस्म त्रिपुंड्र हें प्रशस्त ( योग्य ) आहे असें सांगितलें आहे.

५५ अथर्वशिर नांवाच्या उपनिषदांत असणारे मुनिश्रेष्ठ हें भस्मोध्दूलन, भस्मत्रिपुंड्र धारण ज्ञानांगाच्या दृष्टीनें मुक्तीचें साधन आहे असें ह्मणतात.

वेदसिद्धमतः सर्वैरनिषिद्धं च भस्मनः ॥
तिर्यक्त्रिपुंड्रकं धार्यं शिवभक्तैर्यतव्रतैः ॥ ५६ ॥
रक्षार्थं पापनाशाय ज्ञानाय श्रेयसे तथा ॥
मोक्षायोध्दूलनं तद्वदूचे तिर्यक्त्रिपुंड्रकम् ॥ ५७ ॥
जानताऽजानता वापि ध्रियते यत् त्रिपुंड्रकम् ॥
धारणेनाऽस्य पापानि दह्यंते हि यथाऽग्निना ॥ ५८ ॥
वृथा ज्ञानं वृथा पूजा वृथाऽऽस्तिक्यमतिस्तथा ॥
वृथा मुमुक्षुता तस्य यो न धत्ते त्रिपुंड्रकम् ॥ ५९ ॥
विभूतिर्भसितं भस्म क्षारं रक्षेति भस्मनः ॥
एतानि पंच नामानि वर्तन्ते कारणैः सह ॥ ६० ॥
विभूतिर्भूतिदा सम्यक् भसितं तत्त्वभासकम् ॥
भर्त्सनादेनसां भस्म क्षरणात्क्षारमापदाम् ॥ ६१ ॥

---

५६ यामुळें वेदांत सिद्ध असलेलें [ वेदोक्त ] सर्वांकडून निषिद्ध न मानलेलें अशा भस्माचें ' तिर्यक् त्रिपुंड्र ' शिवव्रती शिवभक्तांनीं धारण करावें.

५७ हें भस्मोध्दूलन व तिर्यक् त्रिपुंड्र धारण, पापांचा नाश करण्यास, रक्षण करण्यास, ज्ञान होण्यास, कल्याणास, तसेंच मोक्षाला कारणीभूत होतें असें सांगितलें आहे.

५८ समजून अथवा न समजून जो भस्म त्रिपुंड्र धारण करतो तें त्याचें धारण करणें त्याच्या सर्व पापांचा अग्नीप्रमाणें नाश करतें.

५९ जो त्रिपुंड्र धारण करीत नाहीं, त्याचें ज्ञान व्यर्थ आहे, पूजा व्यर्थ, आस्तिक्यबुद्धि व्यर्थ, आणि मुमुक्षुताही व्यर्थ आहे.

६० विभूति, भसित, भस्म, क्षार, रक्षा या प्रमाणें भस्माचीं पांच नांवें सकारण आहेत.

६१ ऐश्वर्य देणारी–विभूति, सर्व तत्त्वें उत्तम रीतीनें दाखवून देणारा तो भसित पापांना भेडसावणारें तें भस्म, संकटांचा नाश करणारें तें क्षार,

रक्षणात्सर्वभूतेभ्यो रक्षेति परिगीयते ॥
एतानि भस्मनामानि सार्थकानि समूचिरे ॥ ६२ ॥
कल्पं तथानुकल्पं च ह्युपकल्पमकल्पकम् ॥
भस्मोत्पत्तिश्चतुर्धेति संगिरंति मनीषिणः ॥ ६३ ॥
एतेषामादिमं सर्वोत्कृष्टमन्यदभावतः ॥
यथाविधि यथाशास्त्रमग्निना संस्कृतं च यत् । ६४ ॥
तत्कल्पं भस्म विज्ञेयमनुकल्पमथोच्यते ॥
अरण्याद्गोमयं शुष्कमानीतं चूर्णितं तथा ॥ ६५ ॥
दग्धं चेदनुकल्पं स्यादुपकल्पमथ शृणु ॥
आनीतमापणाद्वस्त्रशोधितं भस्म भाजने ॥ ६६ ॥
गोमूत्रेणैव पूतेन पिंडीकृतमथानले ॥
पूर्वोक्तेन विधानेन दग्धं चेदुपकल्पकम् ॥ ६७ ॥

---

६२ सर्व भूतांपासून रक्षण करणारी ती रक्षा होय. हीं भस्माचीं पांच नांवें सार्थ आहेत असें सांगितलें आहे.

६३ कल्प, अनुकल्प, उपकल्प, अकल्प अशी भस्माची उत्पत्ति चार प्रकारांनीं असल्याचें जाणते लोक सांगतात

६४ या चारी प्रकारांपैकीं पहिला प्रकार सर्वोत्कृष्ट आहे याचे अभावी बाकीचे यथाकर्म व यथाशास्त्रांनीं अग्नि संस्कारानें तयार केलेलें जें भस्म

६५ तें कल्प भस्म होय. पुढें अनुकल्प भस्म सांगतों. राणशेणी आणून तिचे तुकडे करून

६६ जाळलेल्या भस्मास अनुकल्प असें ह्मणतात. पुढें उपकल्प सांगतों ऐकः—बाजारांतून आणलेल्या भस्माचा भुगा करून भस्मपात्रीत वस्त्रगाळ करून, त्याचा

६७ पवित्र गोमुत्रानें गोळा करून वाळवावें, नंतर तें अग्नीमध्यें पूर्वोक्त विधीनें जाळून काढल्यास त्यास उपकल्प ह्मणतात.

अन्यैः संपादितं भस्म त्वकल्पकमितीर्यते ॥
शक्तश्चेदर्जयेत्कल्पमशक्तश्चान्यदन्वहम् ॥ ६८ ॥
अमीष्वन्यतमम् भस्म निक्षिप्याधारभाजने ॥
स्नायात्त्रिसंध्यमथवा यथासंभवमेव वा ॥ ६९ ॥
प्रक्षाल्य पाणिपादं च स्नानकाले शिवव्रती ॥
क्षिप्त्वा वामकरे भस्म प्रच्छाद्यान्यकरेण च ॥ ७० ॥
मौनी मूलेन मंत्रेण चाष्टकृत्वाऽभिमंत्र्य तत् ॥
शीर्षमीशानमंत्रेण मुखं तत्पुरुषेण च ॥ ७१ ॥
अघोरेण हृदंभोजं गुह्यं वामाह्वयेन च ॥
सद्येन पादौ सर्वांगं प्रणवेन प्रसेचयेत् ॥ ७२ ॥

---

६८ दुसऱ्यानें तयार केलेल्या भस्माचा आपण स्वीकार केल्यास तें अकल्प भस्म होय. शक्य असल्यास कल्पभस्म मिळवावें, अशक्य असल्यास इतर भस्म मिळवावें.

६९ वर सांगितलेल्यां चार प्रकारच्या भस्मांपैकीं कोणतेंही एक भस्म पात्रांत ठेवून त्रिकाल स्नान अथवा यथासंभव [ शक्य असेल तितक्यावेळां ] स्नान करावें,

७० शिवव्रत्यांनीं स्नान करून, हातपाय धुवून, डाव्या हातांत भस्म धरून तें उजव्या हातानें झांकून.

७१–७२ मौनी ( न बोलणारे ) होऊन तें भस्म मूलमंत्रानें आठ वेळां अभिमंत्रून ईशान मंत्रानें मस्तकावर, तत्पुरुष मंत्रानें तोंडावर, अघोर मंत्रानें हृदयावर, वामदेव मंत्रानें गुह्यस्थानावर सद्योजात मंत्रानें पायांवर व प्रणव मंत्रानें सर्वांगावर भस्माचे शिंचन करावें.

आग्नेयमुच्यते भस्मस्नानं सर्वमलापहम् ॥
अन्येभ्यो वारुणादिभ्यः स्नानेभ्यश्चोत्तमोत्तमम् ॥ ७३ ॥

प्रत्यहं भसितस्नानवतां नृणां यथाविधि ॥
किमन्यैर्वारुणाद्यैस्तैस्स्नानैर्बाह्यमलापहैः ॥ ७४ ॥

प्रकाशकत्वतो वन्हावस्ति ज्ञानप्रदायिता ॥
अतो यतिभिरत्यंतं भस्मस्नानं विधीयते ॥ ७५ ॥

आर्द्रं तु प्रकृतिं विंद्यात्प्रकृतिं बंधनं विदुः ॥
प्रकृतेस्तु प्रहाणार्थं भस्मना स्नानमिष्यते ॥ ७६ ॥

ब्रम्हविष्ण्वादयो देवा नारदादिसुरर्षयः ॥
सानंदसनकाद्याश्च बाणाद्या दानवास्तथा ॥ ७७ ॥

---

७३ सर्व मलांचा ( दोषांचा ) नाश करणाऱ्या या भस्मस्नानानें आग्नेय ( अग्नी संबंधीं ) स्नान असें ह्मणतात. हें स्नान जलादि इतर सर्व प्रकारच्या स्नानांपेक्षां अतिउत्तम असें आहे.

७४ दररोज शास्त्रोक्त भस्मस्नान करणाऱ्या माणसास केवळ बाह्य मलांचा नाश करणाऱ्या इतर जलादि स्नानांचे काय प्रयोजन आहे. ( कांहीं नाहीं. )

७५ अग्नीचे ठिकाणीं प्रकाशकत्व असल्यामुळें ज्ञानदायित्त्व त्या अग्नीच्याठिकाणीं असतें. म्हणूनच यतिलोक भस्म स्नानच पुष्कळ करीत असतात.

७६ पाण्याचेंठिकाणीं असणाऱ्या आर्द्रतेला ( ओलेपणाला ) प्रकृति [ जडत्त्व ] असें म्हणतात. प्रकृतीलाच बंधन असें म्हणतात. त्या प्रकृतीच्या [ बंधनाच्या ] त्यागाकरितां भस्मस्नान अपेक्षिलें जातें.

७७ ब्रह्मा विष्णू वगैरे देव नारदादि देवर्षि, सानंद, सनकादिक ऋषि तसेच बाणादि राक्षस,

शिवभक्तवराः सर्वे भस्मोध्दूलितविग्रहाः ॥
उज्झिताखिलदोषौघाश्चासते सिद्धिमत्तराः ॥ ७८ ॥

पंचाक्षरेण मंत्रेण सप्तधा चाभिमंत्रितम् ॥
यत्नेन भस्मनोध्दूल्य सम्यक्कुर्यात्त्रिपुंड्रकम् ॥ ७९ ॥

सर्वांगोध्दूलनाच्चापि प्रशस्तं हि त्रिपुंड्रकम् ॥
अतस्त्रिपुंड्रमेवैकं कुर्वीतोध्दूलनं विना ॥ ८० ॥

भस्मना जलमिश्रेण त्रिपुंड्रं सिद्धिमिच्छता ॥
ध्रियेत पंचदशसु स्थानेषु च कलेवरे ॥ ८१ ॥

मूर्ध्नि फाले श्रुतिद्वंद्वे गले बाव्हग्रयुग्मके ॥
वक्षःस्थले तथा नाभौ पृष्ठदेशे भुजद्वये ॥ ८२ ॥

मणिबंधद्वये सम्यक्कुर्दीष्टचिकीर्षुभिः ॥
मूलमंत्रेण संधार्यं त्रिपुंड्रं भस्मना बुधैः ॥ ८३ ॥

---

७८ शिवभक्तश्रेष्ठ असे हे सर्व सर्वांगास भस्मध्दूलन केलेले, त्यामुळें सर्व दोष रहित व सर्व मनीषा पूर्ण होऊन राहिले आहेत.

७९ पंचाक्षर मंत्रानें सात वेळां अभिमंत्रलेल्या भस्मानें सर्वांगास उत्तम उध्दूलन करून नंतर भस्मत्रिपुंड्र धारण करावें.

८० सर्वांगाला भस्मोध्दूलन करण्यापेक्षां भस्मत्रिपुंड्र लावणे हें उत्तम आहे म्हणून उध्दूलन न करतां नुसतें भस्म त्रिपुंड्र लावावें.

८१ सिद्धीची अपेक्षा करणाऱ्या पुरुषानें पुढें सांगितलेल्या शरिराच्या पंधरा ठिकाणीं जलमिश्रित भस्मानें त्रिपुंड्र धारण करावें

८२ टाळू, कपाळ, दोन्ही कान, कंठ, दोन्ही खांदे, वक्षस्थल (ऊर) बेंबी, पाठ, दोन्ही बाहु,

८३ दोन्ही मनगटें, मान, या पंधरा ठिकाणीं स्वतांचें कल्याण इच्छिणारे लोकांनीं जलमिश्रित त्रिपुंड्र धारण मूलमंत्रानें करावें.

सव्ये पाणितले भस्म क्षिप्त्वाऽऽच्छाद्यान्यपाणिना ॥
स्पृष्ट्वाऽग्निरिति मंत्रेण पयसा चाभिमंत्र्य च ॥ ८४ ॥
सांभसा भस्मनोक्तेषु स्थानेषूक्तं त्रिपुंड्रकम् ॥
नित्यं कुर्वन् पदं याति पुनरावृत्तिवर्जितम् ॥ ८५ ॥
तर्जनीमध्यमाऽनाभिकांगुलित्रितयेन वा ॥
त्रियंबकेन मंत्रेण धार्यं तिर्यक्त्रिपुंड्रकम् ॥ ८६ ॥
मध्यमानामिकांगुष्ठकरशाखात्रयेण वा ॥
अनुलोमविलोमाभ्यां धार्यं तिर्यक्त्रिपुंड्रकम् ॥ ८७ ॥
स्निग्धं श्वेतमविच्छिन्नमवक्रं कर्णमानकम् ॥
एतल्लक्षणसंपन्नं धारणं सर्वसिद्धिदम् ॥ ८८ ॥

---

८४ डाव्या हातावर भस्म ठेवून उजव्या हातानें झांकून स्पर्श करून पाण्यानें अग्निइतिमंत्रानें अभिमंत्रून

८५ जळमिश्रित भस्मानें वर सांगितलेल्या शरिराच्या १५ ठिकाणीं नेहमीं त्रिपुंड्र धारण करणारा मनुष्य पुनरावृत्तिरहित असें स्थान (मोक्ष) मिळवितो.

८६ तर्जनी, मध्यमा, अनामिका या तीन बोटांनीं [ आंगठा व करंगळी हीं दोन बोटें सोडून राहिलेल्या तीन बोटांनीं ] त्र्यंबक मंत्रानें तिर्यक त्रिपुंड्र धारण करावें.

८७ अथवा मध्यमा, अनामिका व आंगठा या तीन बोटांनीं अनुलोम विलोमानें तिर्यक त्रिपुंड्र धारण करावें. [ दोन बोटांनीं डावीकडून उजवीकडे लावून व आंगठ्यानें दोन्ही बोटांनीं लावलेल्या भस्माच्या मध्य भागावर उजवीकडून डावीकडे लावणें याप्रकारास अनुलोम विलोम असें म्हणतात. ]

८८ तें तिर्यक त्रिपुंड्र स्निग्ध, (मऊ) पांढरे, अछिद्र [ एक सारखें, मध्यें न तुटलेलें ] सरळ, व कानापर्यंत [ डोळ्यांच्या शेवट भागापर्यंत ] अशा रीतीनें धारण करावें. अशा प्रकारें धारण केलेल्या त्रिपुंड्रानें सर्वसिद्धि प्राप्त होते,

प्राण्हेऽपराण्हे मध्यान्हे भस्मनैव त्रिपुंड्रकम् ॥
विदध्याद्यदि मर्त्योऽसौ रुद्रो भवति निश्चितम् ॥ ८९ ॥
यथोक्तविधिना भक्तो भस्मनोध्दूलनं तथा ॥
तिर्यक्त्रिपुंड्रमनघं कुरुते यः स मुक्तिभाक् ॥ ९० ॥
श्रद्धयोध्दूलनं पुंड्रं नाचरंति हि ये नरः ॥
न बंधान्मोचनं तेषामस्ति जन्मशतैरपि ॥ ९१ ॥
उध्दूलनं त्रिपुंड्रं च भस्मना श्रद्धयान्विताः ॥
ये कुर्वंति सदा मर्त्यास्ते धन्या नेतरे ध्रुवम् ॥ ९२ ॥
उध्दूलनं त्रिपुंड्रं यो हित्वा मुक्तिं यदीच्छति ॥
आत्मनो विषपानेन नित्यत्वमभिकांक्षति ॥ ९३ ॥
सर्वतीर्थेषु यत्पुण्यं सर्वक्षेत्रेषु यत्फलं ॥
तत्सर्वं फलमाप्नोति भस्मस्नानान्न संशयः ॥ ९४ ॥

---

८९ सकाळ, दुपार व सायंकाल अशा तिन्ही वेळेला वर सांगितल्या-प्रमाणें मनुष्य भस्मानें तिर्यक त्रिपुंड्र धारण करील तर तो खरोखरच शिव होतो.

९० वर सांगितलेल्या विधिपूर्वक भस्मानें उध्दूलन व तिर्यक त्रिपुंड्र धारण करणारा शिवभक्त मोक्ष मिळवितो.

९१ भस्मोध्दूलन व भस्मत्रिपुंड्र धारण जे श्रद्धापूर्वक करीत नाहींत, त्यांना शेंकडों जन्मांनींसुद्धां संसार बंधनें सुटत नाहींत.

९२ भस्मोध्दूलन व भस्म त्रिपुंड्र धारण जे श्रद्धापूर्वक नेहमीं करतात तेच मानव धन्य होत. इतर नाहींत. असें निश्चित समजावें.

९३ उध्दूलन व त्रिपुंड्रधारण हीं वर्ज्य करून, जो मनुष्य मोक्ष प्राप्तीची इच्छा करतो, तो 'विष पिऊन अमर होण्याची इच्छा करतो' असें समजावें.

९४ सर्व तीर्थांच्या ठिकाणीं असलेलें पुण्य, सर्व क्षेत्र दर्शनानें मिळ-णारें फल हीं सर्व, मनुष्य वरील प्रकारच्या भस्मस्नानानें प्राप्त करून घेतो. यांत मुळींच संशय नाहीं.

महापातकयुक्तोऽपि युक्तश्चाप्युपपातकैः ॥
भस्मस्नानेन तत्सर्वं दहत्यग्निरिवेंधनं ॥ ९५ ॥

स्वामिन् विज्ञानपाथोधे विभूतेर्धारणं तथा ॥
महत्वं चोपदिष्टं मे श्रुत्वाऽऽसं पुण्यवत्तरः ॥ ९६ ॥

इदानीं श्रोतुमिच्छामि रुद्राक्षाणां च धारणम् ॥
महिमानं च भगवन्नुक्त्वा मामनुकंपय ॥ ९७ ॥

अब्रवीच्चन्नवीराख्यः शिवाचार्यः शिरोव्रती ॥
शिष्यहृत्पद्मबालार्कस्तस्मै रुद्राक्षसंपदम् ॥ ९८ ॥

## —ः अथ रुद्राक्षमाहात्म्यम् :०—

नित्यं लिंगार्चनाऽऽसक्तो भस्मोध्दूलनभासुरः ॥
कृततिर्यक्त्रिपुंड्रश्च रुद्राक्षाण्यपि धारयेत् ॥ ९९ ॥

---

९५ महापातकी, उपपातकीसुद्धां शास्त्रांत सांगितलेल्या भस्म स्नानानें त्याचीं तीं सर्व पातकें अग्नीकडून भस्म होणाऱ्या सर्पणाप्रमाणें—नाश पावतात.

९६ हे स्वामी, हे ज्ञानसागरा, तुमचेकडून सांगितलें गेलेलें भस्म-धारण व त्याचें महत्व ऐकून मी अतिशय पुण्यवान् झालों.

९७ हे गुरूत्तम, आतां रुद्राक्षधारण व त्यांचें महत्त्व हीं ऐकण्याची मला इच्छा झाली आहे, तरी तें सांगण्याची मजवर कृपा करा.

९८ त्यावेळीं शिरोव्रती, शिष्यहृदयकमलाला सूर्यरूपी, अशा चन्नवीर शिवाचार्यांनीं रुद्राक्षांविषयीं स्पष्टीकरण केलें.

## —ः०ः रुद्राक्ष महात्म्यम् ः०ः—

९९ लिंगार्चनामध्यें नेहमीं आसक्त असलेला, भस्मोध्दूलनानें प्रकाशित झालेला, त्रिपुंड्र धारण केलेला, अशा मनुष्यानें रुद्राक्षसुद्धां धारण करावेत.

प्रत्यहं भसितस्येव रुद्राक्षाणां च धारणात् ॥
मुच्यंते किल्बिषैः सर्वैर्मानवा अप्यमार्गगाः ॥ १०० ॥
पुरा त्रिपुरसंहारहेतवे भगवान् शिवः ॥
चिरमुन्मीलिताक्षः सन्नुदैक्षिष्ट पुराणि सः ॥ १०१ ॥
बहवो न्यपतन् भूमौ तन्नेत्रेभ्योऽश्रुबिंदवः ॥
त एव जाता रुद्राक्षाः सर्वानुग्रहहेतवे ॥ १०२ ॥
शंभोः सूर्याक्षिसंजाताः कपिला द्वादश स्मृताः ॥
चंद्रनेत्रसमुद्भूताः शुभ्रवर्णाश्च षोडश ॥ १०३ ॥
वन्हिनेत्रसमुत्पन्नाः कृष्णभासो दश स्मृताः ॥
एतन्नामानि संस्मृत्य नरो मुच्येत किल्बिषैः ॥ १०४ ॥
ब्राम्हणाः शितरुद्राक्षाः क्षत्रिया रक्तवर्णकाः ॥
वैश्याः पीताश्च कृष्णास्तु शूद्रा इति विनिश्चिताः ॥१०५॥

---

१०० दररोज भस्मधारणेप्रमाणें रुद्राक्ष धारणेनेंही दुर्वतनी मनुष्यांच्या-सुद्धां–सर्व दोषांचा नाश होतो.

१०१ प्राचीन काळीं त्रिपुरसंहाराकरितां भगवान् शिवानें त्या त्रिपुरांना–पापण्या न झांकतां–डोळे उघडून चिरकाल पाहिलें.

१०२ त्यावेळीं शिवाच्या डोळ्यांतून अनेक अश्रुबिंदू जमिनीवर पडले, तेच अश्रुबिंदू सर्व प्राण्यांवर अनुग्रहकरण्याकरितां रुद्राक्ष झाले.

१०३ शिवाच्या सूर्य (दक्षिण) नेत्रापासून कपिल रंगाचे बारा १२ रुद्राक्ष उत्पन्न झाले, त्याप्रमाणें चंद्र (डाव्या) नेत्रापासून पांढ्या रंगाचे १६ सोळा रुद्राक्ष उत्पन्न झाले.

१०४ तसेंच अग्निनेत्रापासून काळसर रंगाचे दहा १० रुद्राक्ष उत्पन्न झाले. या रुद्राक्षांच्या नामस्मरणानें मनुष्य पापांतून मुक्त होतो.

१०५ पांढ्या रंगाच्या रुद्राक्षांना ब्राह्मणे, तांबड्या रंगाच्या रुद्राक्षांना क्षत्रिय, पिवळ्या रंगाच्या रुद्राक्षांना वैश्य व काळसर रंगाच्या रुद्राक्षांना शूद्र अशा संज्ञा आहेत.

धारयेद्ब्राम्हणः श्वेतान् रक्तवर्णांश्च बाहुजः ॥
पीतान् वैश्यस्तथा कृष्णान् बिभृयाच्छूद्र उत्तमान् ॥१०६॥

स्निग्धास्ताम्रा दृढाः स्थूलाः शुभाः कंटकसंयुताः ॥
अच्छिद्राः स्वर्णवर्णाश्च ह्यनन्यधृतपूर्वकाः ॥ १०७ ॥

रुद्राक्षाः सततं धार्याः शिवपूजापरायणैः ॥
अकंटकं छिन्नभिन्नं क्रिमिदष्टं व्रणान्वितम् ॥ १०८ ॥

अवृत्तं चेति रुद्राक्षान् षडेतान् वर्जयेत्सुधीः ॥
स्वभावसिद्धरंध्रं यत्तद्रुद्राक्षं बहूत्तमम् ॥ १०९ ॥

यत्तु पौरुषयत्नेन द्वारवन्मध्यमं स्मृतम् ॥
शिखायामेकरुद्राक्षं शिरसि त्रीणि धारयेत् ॥ ११० ॥

---

१०६ त्यास अनुसरून ब्राह्मणांनीं पांढरे रुद्राक्ष, क्षत्रियांनीं तांबडे रुद्राक्ष, वैश्यांनीं पिवळे रुद्राक्ष व शूद्रांनीं काळसर रुद्राक्ष धारण करावेत.

१०७ स्निग्ध, तांबड्या रंगाचे, घट्ट, मोठे, सुंदर, कांटेरी, न किडलेले सोनेरी रंगाचे पण दुसऱ्यांनीं न धारण केलेले,

१०८ असे रुद्राक्ष शिवलिंग पूजेंत तत्पर अशांनीं नेहमीं धारण करावेत. बिन कांटेरी, छिन्न, भिन्न, किडके, व्रणसहित,

१०९ गोलाकार नसलेले या सहा दोषांपैकीं कोणत्याही दोषयुक्त रुद्राक्षाचा शहाण्यांनीं त्याग करावा. ज्या रुद्राक्षाला स्वयंसिद्ध रंध्र [ ओवण्याकरितां ] असतें असे रुद्राक्ष धारण करण्यास अति उत्तम समजावें.

११० मनुष्यकृतीनें ओवण्यास छिद्र असलेलें रुद्राक्ष मध्यम होय. शिखेंत एक रुद्राक्ष धारण करावें व टाळूवर तीन रुद्राक्ष धराण करावे,

षट्त्रिंशन्मूर्ध्नि संदध्याद्बाह्वोः षोडश षोडश ॥
द्वात्रिंशद्भिर्भृयात्कंठे मणिबंधे द्विषड् वहेत् ॥ १११ ॥
श्रोत्रयोर्धारयेत् षट् षट् स्कंधे पंचशतानि च ॥
अष्टोत्तरशतं यज्ञसूत्रवद्धारयेत्सदा ॥ ११२ ॥
शिवार्चासमये धीमानप्रमादेन धारयेत् ॥
रुद्राक्षाणां विशेषेण दर्शनात्स्पर्शनात्स्मृतेः ॥ ११३ ॥
धारणात्पूजनान्मर्त्यो मुच्यते पाशबंधनात् ॥
उत्तमो ह्यधमो वाऽपि स्पृश्यो वाऽस्पृश्य एव वा ॥११४॥
रुद्राक्षधारणादंते रुद्रलोकं स गच्छति ॥
देहावसाने रुद्राक्षं निष्पिष्य पयसा सह ॥ ११५ ॥
पिबेद्यश्चिंतयन् रुद्रं रुद्रलोकं स गच्छति ॥
मौक्तिकैर्विद्रुमैर्वज्रैर्वैदूर्यैः कांचनांचितैः ॥ ११६ ॥

---

१११ मस्तकाभोंवतीं ३६, दोन्ही दंडांत १६-१६ कंठांत ३२, मणगटांवर १२-१२, रुद्राक्ष धारण करावेत.

११२ दोन्ही कानाचे ठिकाणीं ६--६, मानेवर ५०० पांचशें व १०८ रुद्राक्षांची माला यज्ञोपवितात्रमाणें धारण करावी.

११३ बुद्धिमान् मनुष्यानें शिवपूजेच्या वेळीं तरी न विसरतां वरील प्रकारांनीं रुद्राक्ष धारण करावेंत. विशेषेकरून रुद्राक्षांच्या दर्शनानें, पाहण्यानें, स्पर्श करण्यानें, ध्यान करण्यानें,

११४ धारण करण्यानें पूजा करण्यानें, मनुष्य भवपाशांतून मुक्त होतो, उत्तम असो वा अधम असो, स्पृश्य असो वा अस्पृश्य असो.

११५ रुद्राक्ष धारण करण्यानें, शरीरत्यागानंतर तो मनुष्य शिवलोकाप्रत जातो. मरण काळीं रुद्राक्ष उगाळून त्याच्या रसाचें -

११६ शिवाचे चिंतन करीत जो मनुष्य पान करतो तो शिवलोकाप्रत जातो. मोतीं, पोवळें, हिरे, वैदूर्य, सोनें, इत्यादिकांनींयुक्त,

रुद्राक्षान् धारयेद्यस्तु स रुद्रो नात्र संशयः ॥
केवलं चापि रुद्राक्षान् धत्ते तिर्यक् त्रिपुंड्रवान् ॥ ११७ ॥
तं न स्पृशंति पापानि ध्वांतानीव दिवाकरम् ॥
रुद्राक्षं शिरसि क्षिप्त्वा यः स्नानं कुरुतेंऽभसा ॥ ११८ ॥
गंगास्नानफलं तस्य भविष्यति न संशयः ॥
अत्रेतिहासमेकं ते वक्ष्यामि शृणु सादरम् ॥ ११९ ॥
यच्छ्रुत्वा क्रूरकर्माऽपि दोषमुक्तो भविष्यति ॥
नंदिग्रामे पुरा का चिन्महानंदेति विश्रुता ॥ १२० ॥
सौंदर्यनिंदितेंद्राणी कुंदकुड्मलदंतिका ॥
आसीद्वेश्यांगना नव्यतारुण्यमदशालिनी ॥ १२१ ॥

---

११७ असे रुद्राक्ष जो धारण करतो तो खरोखर रुद्रच होय, यांत संशय नाहीं. जो त्रिपुंड्रधारी शिवभक्त नुसते (मोतीं पोवळीं वगैरे नसलेले) रुद्राक्ष धारण करतो,

११८–११९ अशा शिवभक्ताला-- जसा अंधार सूर्याला स्पर्श करूं शकत नाहीं त्याप्रमाणें-- पापें स्पर्श करूं शकत नाहींत.

टाळूचे ठिकाणीं रुद्राक्ष ठेवून जो पाण्यानें स्नान करतो त्याला त्यापासून गंगास्नानाचें फलप्राप्त होतें. यांत मुळींच संशय नाहीं. याविषयसंबंधी तुला एक कथा सांगतों ती प्रेमानें ऐक.

१२० जी कथा ऐकून अतिशय क्रुर कृत्यें करणारासुद्धां दोषमुक्त होऊं शकतो. पूर्वी नंदीग्राम नांवाच्या गांवांत महानंदा नांवानें प्रसिद्ध असलेली,

१२१ सौंदर्यानें, इंद्रपत्नि-- शचि इचाही तिरस्कार करणारी, जाईच्या कळ्याप्रमाणें दांत असलेली, अशा प्रकारची नूतन तारुण्यांनींयुक्त अशी एक वारांगना [ वेश्या ] होती.

संपदोल्लंघिताखंडाखंडलैश्वर्यसारता ॥
अमूल्यानंतरत्नानां भूषणानि सहस्रशः ॥ १२२ ॥
विद्यमानान्यपि त्यक्त्वा रुद्राक्षाभरणप्रिया ॥
हारादिभूषणानां च तत्तत्स्थानेषु सुंदरी ॥ १२३ ॥
रुद्राक्षाभरणान्येव धारयंती वरांगना ॥
नित्यं शिवार्चनासक्ता शिवधर्मपरायणा ॥ १२४ ॥
शिवमंत्रजपाऽऽसक्तिव्यक्तचित्ता मनोरमा ॥
शिवलांछनसंयुक्तान् शिवभक्तान् शिवव्रतान् ॥ १२५ ॥
दृष्ट्वा संजातसंतोषा नमंती रोमहर्षणा ॥
मनोविनोदनार्थाय पालितं नाट्यमंटपे ॥ १२६ ॥
शाखामृगं कुक्कटं च रुद्राक्षैरेव भूषितम् ॥
करतालैर्गीतवाद्यैर्नित्यं नर्तयति स्म सा ॥ १२७ ॥

---

१२२-१२३-१२४ तिची संपत्ति इंद्राच्या संपत्तीपेक्षां श्रेष्ठ होती, अमोलिक रत्नांनींयुक्त असे हजारों दागिने असतांहीं त्यांना सोडून केवळ रुद्राक्षाच्या दागिन्यांचीच आवडती होऊन चंद्रहारादि आभरणें धारण करण्याच्या शरिराच्या त्या त्या ठिकाणीं ती सौंदर्यवान् वारांगना रुद्राक्षभूषणेंच धारण करीत होती. शिवधर्माविषयीं परायण अशी ती महानंदा नेहमीं शिव पूजेंत गढून गेलेली असे.

१२५ शिवमंत्राचा जप करण्याविषयीं उत्सुक मनाची ती सुंदरी, शिवव्रती, शिवलांछनधारी, शिवभक्तांना

१२६ पाहून अत्यानंदित व रोमांचित होऊन नमस्कार करीत असे. मन रंजनाकरितां नाट्यशालेमध्यें,

१२७ राखिलेले, रुद्राक्षांनीं विभूषित असे माकड व कोंबडा यांना हाताच्या तालावर, गायन वादनादिकांनीं नेहमीं नाचवीत असे.

मुहुर्मुहुर्हसत्युच्चैस्सवयोभिः समन्विता ॥
रुद्राक्षैः कृतकेयूरकंठाभरणकुंडलः ॥ १२८ ॥
तस्याः सम्यक् शिक्षणेन पुरो नृत्यति मर्कटः ॥
मस्तकन्यस्तरुद्राक्षः कुक्कुटः कपिना समम् ॥ १२९ ॥
नृत्तज्ञमानसं चित्रमानयन् नृत्यति स सः ॥
गते बहुतिथे काले कदाचित्कपिकुक्कुटौ ॥ १३० ॥
तावुभौ निधनं प्राप्य परलोकं च जग्मतुः ॥
ततः काश्मीरनाथस्य भद्रसेनस्य भूपतेः ॥ १३१ ॥
मर्कटो हि सुधर्माख्यस्तनयः संबभूव सः ॥
कुक्कुटस्तदमात्यस्य तारकाख्यः सुतोऽभवत् ॥ १३२ ॥

---

१२८ तें नृत्य पाहून आपल्या मैत्रिणींसह ती महानंदा वारंवार मोठ्यानें हासत होती. रुद्राक्षांनीं केलेल्या तोळबंद्या, गळ्यांतील व कानांतील दागिन्यांनीं युक्त.

१२९ असें माकड त्या महानंदेच्या उत्तम प्रकारच्या शिक्षणानें समोर नाचत होतें, आणि मस्तकावर एक रुद्राक्ष असलेला कोंबडा त्या माकडासह,

१३० नर्तन विद्येत निपुण अशा प्रेक्षक वर्गाचे मनाला आश्चर्यचकित असें नाचकाम करीत असे. अशा प्रकारें कित्येक दिवस लोटल्यानंतर एके दिवशीं तें माकड व कोंबडा,

१३१-१३२ हीं दोन्ही मरण पावून स्वर्गाला गेलीं, नंतर काश्मीर देशाच्या भद्रसेन नांवाच्या राजाचे एथें तें माकड 'सुधर्म' नांवाचा मुलगा होऊन जन्मास आलें व कोंबडा त्या राजाच्या प्रधानाचे पोटीं 'तारक' नांवानें जन्मास आला.

विद्याभ्यासात्तवैदूष्यावदूष्यौ शीलसंपदा ॥
शरीरमात्रतो भिन्नावभिन्नावंतरात्मना ॥ १३३ ॥
विद्याविनयसंपन्नौ रूपनिर्धूतमन्मथौ ॥
सर्वदा सर्व गात्रेषु रुद्राक्षाभरणान्वितौ ॥ १३४ ॥
रत्नाद्याभरणं हित्वा रुद्राक्षाभरणादरौ ॥
रुद्राक्षहारिणौ नित्यं रुद्राक्षकृतकंकणौ ॥ १३५ ॥
रुद्राक्षकंठभूषाढ्यौ रुद्राक्षकृतकुंडलौ ॥
रुद्राक्षैरेव सर्वेषु स्थानेष्वाहितभूषणौ ॥ १३६ ॥
भस्मोध्दूलितसर्वांगौ कृततिर्यक्त्रिपुंड्रकौ ॥
संपदाधिक्यसंपन्ने कुले महति तावुभौ ॥ १३७ ॥
समुत्पन्नौ महाभोगं भुंजानावपि सर्वदा ॥
पूर्वसंस्कारसंदार्ढ्याद्रुद्राक्षश्रद्धयाऽन्वितौ ॥ १३८ ॥

---

१३३ विद्याभ्यासानें पंडित झालेले, सुस्वभावाचे शरिरानें वेगळे असले तरी स्वभावानें व मनानें एकच असलेले

१३४ विद्याविनययुक्त, मदनाप्रमाणें सुंदर, नेहमीं शरिराच्या सर्व अवयवांवर रुद्राक्षालंकार धारण करणोर,

१३५ रत्नादि आभरणें सोडून रुद्राक्षाभरणावरच प्रेम असणारे, गळ्यांत रुद्राक्षमाला धारण करणारे, मनगटांवर कड्याप्रमाणें नेहमीं रुद्राक्ष धारण करणारे,

१३६ कंठांत रुद्राक्ष बांधलेले, रुद्राक्षयुक्त कर्ण कुंडले असणारे, शरिराच्या सर्व ठिकाणीं रुद्राक्ष भूषणेंच धारण केलेले,

१३७ सर्वांगाला भस्मोध्दूलन करून भस्म तिर्यक् त्रिपुंड्र धारण करणारे, अतिशय श्रीमंती असलेल्या अशा उत्तम कुलांत ते दोघे,

१३८ जन्मलेले असले व महासंपत्तीचा उपभोग घेणारे असले तरी पूर्व जन्माच्या दृढ संस्कारानें नेहमीं रुद्राक्ष धारणेवर पूर्ण निष्ठा असलेले असे ते झाले.

देहांते शांभवम् स्थानं पुनरावृत्तिवर्जितम् ॥
राजामात्यात्मजौ नित्यं प्रापतुः पंडितोत्तम ॥
अतो रुद्राक्षमेकांतं धार्यं पूज्यं मनीषिभिः ॥ १३९ ॥

—–ः अथ पादोदकमाहात्म्यम् :०—–

"अथातो महादेवस्य पादोदकविधिं व्याख्यास्यामः"
इति बोधायनेनोक्तशाखायां विद्यमानतः ॥ १४० ॥
वैदिकं शिवपादांबु तस्माद् ग्राह्यं हि वैदिकैः ॥
दीक्षापादोदकं शिक्षापादोदकमनुत्तमम् ॥ १४१ ॥
ज्ञानपादोदकं चेति त्रिप्रकारं हि वर्णितम् ॥
दीक्षा शिक्षा ज्ञानमिति शब्दभेदः श्रुतिस्मृतः ॥ १४२ ॥
शिवाभिषेकमुदकं ग्राह्यं पाशनिवृत्तये ॥
गुरुजंगमपादोदं शिरसा धारयेद्द्विजः ॥ १४३ ॥

---

१३९ हे बुद्धिमान् शिष्या, राजा व प्रधान यांचीं मुलें म्हणविणारे ते दोघेही मरणानंतर शाश्वत व पुनरावृत्तिरहित अशा शिवपदाप्रत [मोक्षाप्रत] गेले. म्हणून बुद्धिवान् लोकांनीं नेहमीं रुद्राक्ष धारण करून त्यांची पूजा करावी.

—:० पादोदक महात्म्य ०:—

१४० 'अथा तो महादेवस्य पादोदक विधिम् व्याख्यास्यामः' असें बोधायन महर्षीकडून सांगितलेल्या शाखेमध्यें असल्यामुळें,

१४१ शिवपादोदक हें वैदिक [ वेदमान्य ] आहे. म्हणून वैदिकांना शिवपादोदक ग्राह्य आहे. तें पादोदक दीक्षापादोदक, शिक्षा पादोदक,

१४२ आणि ज्ञानपादोदक अशा तीन प्रकारचे सांगितलें आहे. दीक्षा, शिक्षा, ज्ञान म्हणून वेदांत शब्दभेद सांगितले आहे.

१४३ ब्राह्मणानें पाशबंध निवारणाकरितां शिवाभिषेकजल [ शिव-पादोदक ] प्राशन करावें. गुरु जंगमांचें पादोदक मस्तकावर धारण करावें.

इत्येवं प्रतिभातीर्थं वेदेषु परिदृश्यते ॥
अतो गुरोश्वरस्यांघ्रितोयं धार्यं पिबेन्न हि ॥ १४४ ॥
इति चेन्नीलकंठेन शिवाचार्येण धीमता ॥
धारणं पानमित्यर्थं तेन सम्यक् समर्थितम् ॥ १४५ ॥
द्रष्टव्यं हि क्रियासारग्रंथे संदिग्धमानसैः ॥
ज्ञानवैराग्यसिध्यर्थं गुरोः पादोदकं पिबेत् ॥ १४६ ॥
अंतःकरणकालुष्यनिवृत्यै चौषधात्मना ॥
कुक्षिरोगनिवृत्यर्थमौषधप्राशनं यथा ॥ १४७ ॥
भवामयप्रहाणार्थं पिबेदीशपदोदकम् ॥
त्रिपादूर्ध्वेति मंत्रेण गुरोर्लिंगस्य चातिथेः ॥ १४८ ॥
पादोदकत्रयं नित्यं पिबेदित्याह वै श्रुतिः ॥
गंगादिसरितामब्धिगामिनीनामपां भुवि ॥ १४९ ॥

---

१४४ अशा प्रकारें वेदांमध्यें प्रतिभा [ ज्ञान ] तीर्थ दिसून येते, म्हणून गुरुजंगमांचें पादोदक फक्त मस्तकावर धारण करावें. मुळींच प्राशन करूं नये.

१४५–१४६ असें म्हटलें तर–पंडित अशा नीलकंठ शिवाचार्यांनीं धारण याचाच अर्थ पान असें क्रियासार नांवाच्या ग्रंथांत उत्तम तऱ्हेनें समर्थन [ सिद्ध ] करून दाखविलें आहे. साशंक लोकांनीं त्या ग्रंथात पहावें. गुरु-पादोदक ज्ञानवैराग्य यांच्या सिद्धीकरितां प्राशन करावें,

१४७ पोटांतील रोगाच्या निवारणार्थ औषध पान केल्याप्रमाणें अंतःकरणांतील दोषांचे निवारणार्थ औषधरूपानें पादोदक पान करावें.

१४८ संसाररूपी रोगाच्या नाशाकरितां शिवपादोदकाचें पान करावें, 'त्रिपादूर्ध्वेति' या वेदमंत्रानें गुरु, लिंग, जंगमांचें,

१४९ पादोदकत्रय रोज पान करावें. असें सांगितलें आहे. खरा समुद्रास जाऊन मिळणाऱ्या गंगादि नद्यांचें पाण्याच्या

धारणात्स्मरणात्पानाद्यानि पुण्यानि देहिनाम् ॥
तेभ्यः शतगुणं पुण्यमधिकं पादवारिणि ॥ १५० ॥
तस्माद्धार्यं च पेयं च स्मरणीयं शिवार्चकैः ॥
श्रीगुरोः पादतीर्थं हि पेयं दध्याच्च मस्तके ॥ १५१ ॥
भूमौ यावंति तीर्थानि तावतां फलमश्नुते ॥
पापाद्रिकुलिशं दोषराशिवाराशिवाडवम् ॥ १५२ ॥
दीपनं ज्ञानदीपस्य गुरोः पादोदकं पिबेत् ॥
जरामरणजन्मादिमहारोगमहौषधम् ॥ १५३ ॥
गुरोः पादोदकं मर्त्यः पिबंस्तरति संसृतिम् ॥
विद्यावल्लीवसंतस्य चाविद्याग्रंथिभेदिनः ॥ १५४ ॥

---

१५० धारणेनें, स्मरणानें व पान केल्यानें, पृथ्वीवरील लोकांना ज्या प्रकारचें पुण्य प्राप्त होतें त्याच्या शतपटीनें अधिक पुण्य पादोदकाचेठिकाणीं असतें.

१५१ म्हणून श्रीगुरु पादोदक शिवार्चकांकडून धारण करण्यास, आंगाला लावण्यास, [ मस्तकावर ] स्मरण करण्यास व दान करण्यास योग्य असें आहे.

१५२ या भूतलावर गंगादि सर्व तीर्थांच्या योगानें प्राप्त होणारें फल तो शिवार्चक, शिवपादोदकानें मिळवूं शकतो. तें पापरूपी पर्वताला वज्राप्रमाणें व दोषराशीरूपी समुद्राला वडवाग्नीप्रमाणें

१५३ ज्ञानरूपी दिवा प्रकाशित करणारें, जरा मरणादि रोगांना दिव्य औषधीरूप असलेलें, असें गुरुपादोदक भक्तानें प्राशन करावें.

१५४ ज्ञानरूपी वेलींना वसंतऋतूप्रमाणें, अज्ञानरूपी गांठ फोडणारा अशा गुरूंचें पादोदक पान करणारा मानव संसार तरून जातो.

जंगमस्यापि पादांबु सेवेत श्रेयसे पुमान् ॥
चरपादोदकं पुण्यं संसारार्णवतारकम् ॥
आत्मविज्ञानदं दिव्यं धार्यं पेयं मुमुक्षुभिः ॥ १५५ ॥

—ः०ः अथ प्रसादमाहात्म्यम् ः०ः—

गुरूच्छिष्टं तु भोक्तव्यं गृह्यकारैः समीरितम् ॥
पातंजलिस्मृतौ भक्तैर्भोज्यमित्यथ वर्ण्यते ॥ १५६ ॥
रुद्रेणात्तमित्यादिवेदवाक्यात् त्रिशूलिना ॥
यद्भुक्तं तद्धि भोक्तव्यं यत्पीतं तज्जलं पिबेत् ॥ १५७ ॥
पत्रं पुष्पं फलं तोयमन्नजातमुमापतेः ॥
अनिवेदितमग्राह्यं प्रशांतहृदयैर्द्विजैः ॥ १५८ ॥

---

१५५ तसेंच जंगमांचेंही पादोदक मनुष्यानें कल्याणाकरितां पान करावें. कारण—पवित्र, संसारसमुद्रांतून पार करणारें, शिवज्ञान प्राप्त करून देणारें व दिव्य असें जंगमांचें पादोदक मुमुक्षूंनीं प्राशन करावें असें प्रमाण आहे.

—० प्रसाद महात्म्य. ०—

१५६ गृह्यसूत्रकार 'गुरूच्छिष्टंतु भोक्तव्यम्' ह्मणजे गुरूंच्या प्रसादाचें सेवन करावें असें सांगतात. तसेंच पातंजली स्मृतीमध्येंसुद्धां 'गुरु प्रसादाचें भक्तांनीं सेवन करावें' असें वर्णन सांगितलें आहे.

१५७ 'रुद्रेणात्तम्' इत्यादि वेदमंत्रानें शिवाकडून जें खाल्लें गेलें तें भक्तांनीं खावें, शिवाकडून प्यालें गेलेलें पाणीच भक्तांनीं प्यावें.

१५८ पत्र, पुष्प, फल, पाणी, अन्न हीं शिवाला अर्पण केलीं नसलीं तर तीं शांत मनाच्या वीरशैव द्विजांना अग्राह्य (ग्रहण करण्यास योग्य नाहींत अशीं) आहेत.

लिंगांगसंगिनो विप्रा भुंजीरन् लिंगसेवितम् ॥
अन्यदेवोपभुक्तं च प्रमादान्न कदाचन ॥ १५९ ॥

शिवप्रसादतो भुक्तिर्मुक्तिस्तेनैव जायते ॥
शिवप्रसादेन समो नाधिको विद्यते क्व चित् ॥ १६० ॥

शिवोच्छिष्टं जलान्नादि निर्विकल्पमना बुधः ॥
भुंक्तेचेन्नित्यमंते स्यात्प्रमथानां परिवृढः ॥ १६१ ॥

निर्माल्यं परमेशस्य भुक्तिदं मुक्तिदं परम् ॥
पूर्वजन्मार्जितैः पुण्यसहस्रैर्लभ्यते नरैः ॥ १६२ ॥

लिंगांगसंगिनो ये च ये शिवार्चनतत्पराः ॥
त एव शिवनिर्माल्यं भुंजीरन्नेतरे नराः ॥ १६३ ॥

---

१५९ लिंगांगसंबंध असलेल्या वीरशैव ब्राह्मणांनीं लिंगसेवित अन्नाचेंच भोजन करावें, इतर देवतांकडून उपभोगलेला अन्नादि पदार्थ चुकूनसुद्धां मुळींच खाऊं नये,

१६० शिवप्रसादानें इहपर लोकांतील विषय–सुखोपभोग–मिळतात, त्या शिवप्रसादानेंच मोक्ष प्राप्ति होते. म्हणून शिवप्रसादापेक्षां श्रेष्ठ अथवा तिच्या बरोबरीची वस्तु त्रैलोक्यांत कोठेंही नाहीं.

१६१ शिवाकडून उपभोगलें गेलेलें जलान्नादि, बुद्धिवान् मनुष्य निर्विकल्प [ शुद्ध ] मनानें नेहमीं खात असेल तर तो मरणानंतर खात्रीनें कैलासावर असलेल्या प्रमथादिकांचा अधिपति होतो.

१६२ भुक्ति व मुक्ति देणारा परमात्म्याचा श्रेष्ठ प्रसाद मनुष्यें अनेक जन्मांच्या संचित पुण्याईनेंच मिळवितात.

१६३ लिंगांगसंबंध असणाऱ्या शिवलिंगार्चनांत तत्पर अशा शिवभक्तांनींच शिवाकडून उपभोगलेली वस्तू उपभोगावी ती इतरांनीं उपभोगूं नये

भक्तेन भुज्यमानेऽस्मिन्नन्ने शंभुनिवेदिते ॥
सिक्थे सिक्थे पुंडरीकयागस्य फलमाप्यते ॥ १६४ ॥
शिवेन स्वीकृतत्वात्तन्निर्माल्यं निर्मलं शुभम् ॥
दीक्षितैर्वीरशैवैस्तैर्धार्यं न प्राकृतैर्नरैः ॥ १६५ ॥
गुरुत्वाच्छैवजातस्य शिवतत्वप्रकाशनात् ॥
शिवस्येव गुरोश्चापि प्रसादः फलदायकः ॥ १६६ ॥
सा[illegible] : सद्गुरोर्भक्तियुक्तानां मोक्षकांक्षिणाम् ॥
कैवल्यकामिनीवक्त्रदर्शने मुकुरायते ॥ १६७ ॥
दूर्वाससो वीरशैवमुनेर्भुक्तोज्झितं शिवम् ॥
प्रसादमुपलिप्यांगे वज्रकायोऽभवद्धरिः ॥ १६८ ॥

---

१६४ शिवाला अर्पण करून, भक्तांकडून उपभोगल्या जाणाऱ्या त्या अन्नाच्या प्रत्येक कणांत पुंडरीक यज्ञाचें फल आहे.

१६५ शिवाकडून स्वीकार झाल्यामुळें तें निर्माल्य निर्मल, शुभ, व दोषरहित असतें. त्याचें दीक्षित वीरशैवांनींच सेवन करावें. प्राकृत (दीक्षारहित) लोकांनीं सेवन करूं नये.

१६६ वीरशैव–जगाला गुरु होऊन राहिल्यामुळें व त्यांच्याठिकाणीं शिवतत्त्वांचा प्रकाश करण्यानें त्या गुरूचा प्रसाद शिवप्रसादाप्रमाणें वीरशैवांना फलदायक होतो.

१६७ सद्गुरूंचा प्रसाद मुमुक्षु अशा शिव भक्तांना मोक्षरूपी कामिनीच्या मुख दर्शनास आरशा प्रमाणें आहे.

१६८ कृष्णानें वीरशैव दुर्वास ऋषींचें जेवणानंतर राहिलेलें उच्छिष्ट [ प्रसाद ] शरिराला लावण्यानें तो वज्रदेही झाला.

यद्यद्वस्तु स्वभोग्यं स्याच्छिवस्येव गुरोरपि ॥
तत्तन्निवेद्य भुंजीत चान्यथा पापमश्नुते ॥ १६९ ॥
निजानंदपयोराशिमग्नचित्तस्य योगिनः ॥
जंगमस्य प्रसादस्तु भुक्तिमुक्तिफलप्रदः ॥ १७० ॥
अघौघध्वांतसूर्यस्य विमुक्तविषयस्पृहः ॥
प्रसादश्चरवर्यस्य सेव्यः सर्वैर्मुमुक्षुभिः ॥ १७१ ॥
उक्ताष्टावरणैर्दिव्यैर्ज्ञानांगैरावृतः पुमान् ॥
पंचाचारानाचरन् सन्निर्वाणपदमश्नुते ॥ १७२ ॥
गुरुलिंगचराणां च प्रसादस्योपसेवनात् ॥
मुक्तिः संदृश्यते भक्तैर्यथा रत्नं करस्थितम् ॥ १७३ ॥

---

१६९ आपल्याला ज्या ज्या पदार्थांचा उपभोग घ्यावयाचा असेल ते ते सर्व पदार्थ शिवाप्रमाणें गुरूनाही अर्पण करून त्यांचा उपभोग घ्यावा. तसें न केल्यास पापाचा उपभोग करतो.

१७० निजानंद सागरांत निमग्न चित्ताचे व योगविशिष्ट अशा जंगमांचा प्रसादसुद्धां भुक्ति मुक्ति फलप्रद आहे.

१७१ पाप समूहरूपी अंधःकाराला सूर्य रूपानें असलेला, विषयांच्या ठिकाणीं आशारहित अशा श्रेष्ठ जंगमांचा प्रसाद सर्व मुमुक्षु लोकांकडून सेव्य होय.

१७२ ज्ञानांग व दिव्य अशा वर सांगितलेल्या अष्टावरणांनींयुक्त, पंचाचार परायण असा मनुष्य मोक्ष पद मिळावितो.

१७३ गुरु, लिंग, जंगमाच्या प्रसाद सेवनामुळें भक्तांना हातांतील रत्नाप्रमाणें मुक्ति सुलभ होते.

जीयात्सा गिरिजा देवी गिरीशहृद्यप्रिया ॥
यत्कृपालहरी सौख्यसस्यसंपत्करी नृणाम् ॥ १७४ ॥

—❀ इति तृतीयोऽध्यायः ❀—

१७४ जिचा कृपारूपी जलप्रवाह मनुष्याच्या सुखरूपी रोपट्यांची अभिवृद्धि करतो व शिवाला अतिशय प्रिय अशा त्या पार्वती देवीचा जय जयकार असो.

अध्याय ३ रा समाप्त.



॥ श्रीरस्तु ॥

ॐनमः पंचजगद्गुरुभ्यः

# श्री. ष. ब्र. चन्नबसव विजय पुराणम्‌ः



## श्रीरस्तु अथ चतुर्थोऽध्यायः शिवमस्तु

भवाय भव्याय नमो नमस्ते भवार्णवोत्तारणनाविकाय ॥
भवोद्भवायेश नमो नमस्ते बलारिमुख्यामरवंदिताय ॥ १ ॥

हृद्याभिः सर्वविद्याभिः श्रीचन्नबसवेश्वरः ॥
कलाभिः सकलाभिः संपूर्णश्चंद्र इवाबभौ ॥ २ ॥

गुरूपदेशादत्यन्तं विनयादिगुणोत्करः ॥
बभावस्मिन्‌ वटौ शाणादिव दीप्तिचयो मणौ ॥ ३ ॥

---

१ संसार उत्पन्न करणारा, मनोहर, संसार समुद्रांतून पार पाडण्यास नावाडी, इंद्रादि देवांकडून नमस्कारिला गेलेला, भवोद्भव अशा शिवाला माझा वारंवार नमस्कार असो.

२ पूर्ण कलायुक्त अशा पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें मनोहर अशा सर्व विद्यांनीं ( सर्व विद्यांत पारंगत ) तो चन्नबसव वटू शोभत होता.

३ सहाणेवर घरलेल्या रत्नाचें तेज प्रकाशमान्‌ होतें, त्याप्रमाणें गुरूपदेशानें त्या चन्नबसव देवाच्या ठिकाणीं विनयादि सद्गुण समूह प्रकाशमान्‌ झाला.

शास्त्राभ्यासाद्ध्वस्तदोषे ब्रह्मतेजःप्रदीपिते ॥
उद्दिदीप हृदाकाशे तस्यात्मा भानुमानिव ॥ ४ ॥
वक्षःस्थलीव धीरस्य दधावतिविशालताम् ॥
विशाले अपि तन्नेत्रे सापेक्षे ज्ञानचक्षुषः ॥ ५ ॥
सरलाऽपि च नासाऽस्य शिवेतरसमर्पितम् ॥
सुमादिगंधवद्वस्त्वाऽऽघ्रातुं कुटिलतामगात् ॥ ६ ॥
रसज्ञाऽप्यस्य जिव्हा तु लिंगानर्पितवस्तुषु ॥
नाधत्त चापलं जातु ब्रह्मचारिशिखामणेः ॥ ७ ॥
शास्त्रेण संस्कृता वाणी समीकृतरवावली ॥
वीणेव वाद्यमाना नृहृदयानंददायिनी ॥ ८ ॥

---

४ शास्त्राभ्यासानें सर्व दोष नाहींसे झालेला, ब्रह्मतेजानें प्रकाशित झालेला, अशा चन्नबसव देवाच्या हृदयाकाशांत आत्मा— आकाशांतील सूर्या-प्रमाणें— प्रकाशित झाला.

५ या वटूच्या बुद्धीनें त्याच्या वक्षस्थलाप्रमाणें विशालत्व धारण केलें होतें. याचे डोळे विशाल ( सर्व पदार्थ पाहण्यांत समर्थ ) असले तरी ज्ञान दृष्टीची अपेक्षा करीत होते.

६ याचें नाक सरळ असलें तरी शिवेतरादि देवतांना अर्पण केलेल्या सुगंधयुक्त पदर्थांचा वास सेवन करण्यांत कुटिल ( अनासक्त ) होते

७ ब्रह्मचारी अशा या चन्नबसवाची जीभ रुचि जाणणारी असली तरी ही लिंगाला अर्पण न केलेल्या पदार्थाविषयीं एकदांही आसक्ति दाखवीत नसे.

८ शास्त्रांनीं संस्कारित झालेली या वटूची वाणी, स्वर लावून वाज-विल्या जाणाऱ्या विण्याप्रमाणें लोकांच्या मनाला आनंददायी होत असे.

नव्यं यौवनमेतस्य ह्यलंचक्रे कलेवरम् ॥
पंचबाणस्य सवया ऋतुश्चूतवनं यथा ॥ ९ ॥
यौवनेन समुद्भिन्नबालभावोऽयमाबभौ ॥
कलभः करिराजत्वं श्रयन्निव महौजसा ॥ १० ॥
शिष्योद्धारधुरामोढुं क्षमोऽयमिति मन्वता ॥
गुरुणाऽस्याधिकारं स्वं कर्तुं चक्रे मतिस्तदा ॥ ११ ॥
पट्टाभिषेकवार्ता सा कर्णाकर्णिकया जनान् ॥
प्राप्य प्रमोदयामास कुल्येवोद्यानपादपान् ॥ १२ ॥
आहूय पौरमुख्यांस्तानिदमूचे विचक्षणः ॥
जरया जर्झरीभूतो नाहं कर्तुमलं क्रियाम् ॥ १३ ॥

---

९ आंबराइला वसंत ऋतूमुळें येणाऱ्या शोभेप्रमाणें याचे शरिराला नव तारुण्यानें शोभा आली होती.

१० आपल्या तेजानें गजराजत्व मिळविणाऱ्या हत्तीच्या बालकाप्रमाणें हा तारुण्यानें बालभाव नाहींसा करून पुरुषश्रेष्ठ झाला होता.

११ शिष्यांच्या उद्धाराचें ओझें वाहण्यास हा समर्थ आहे असें जाणणाऱ्या चन्नवीर गुरूंनीं त्या वटूस आपला अधिकार देण्याचें मनांत आणलें.

१२ पाटानें वाहणारें पाणी जसें सर्व झाडांना क्रमाक्रमानें जाऊन पोहोंचतें त्याप्रमाणें गुरूंचे पट्टाभिषेकाचे हे विचार कर्णोपकर्णी त्या गांवांतील सर्व लोकांना समजून लोकांना अतिशय आनंद झाला.

१३ कार्यविचक्षण अशा चन्नवीर गुरूंनीं गांवांतील प्रमुख मंडळीला बोलावून घेऊन असें सांगितलें कीं:—मी म्हातारपणामुळें थकून शिष्योद्धारकर्म करण्यास असमर्थ आहे.

विद्याविनयसंपन्नो युवा कार्यधुरंधरः ॥
आस्ते चन्नवृषस्तस्मै पट्टं दातुं स्पृहाऽस्ति मे ॥ १४ ॥
युष्मभ्यं यदि रोचेत सोऽयं सम्यग्गुरोः पदे ॥
तदा मदुक्तिसाफल्यं नोचेत्संचिनुतापरम् ॥ १५ ॥
अयमेवाधिकारार्थं क्षमते भवतामनु ॥
लोकस्यालोकहेतुर्हि क्रमेणेंदुर्दिवाकरः ॥ १६ ॥
इत्थं गुरोर्मनोऽभीष्टमैककंठ्येन पौरपाः ॥
अंगीकृत्याग्रकार्यार्थं प्रयतंते स्म सत्वरम् ॥ १७ ॥
गुरोराज्ञां पुरस्कृत्य मठस्थलमहच्चराः ॥
सदाचारसमाविष्टनिष्ठा माहेशमूर्तयः ॥ १८ ॥
गंगादिसरितामब्धिगामिनीनां पयांसि च ॥
जलाशयादिपुण्योरुतीर्थानामुदकानि च ॥ १९ ॥

---

१४ हा चन्नबसव, विद्या व विनय यांनीं संपन्न असून तरुण व कार्यधुरंधर आहे ह्मणून याला पट्टाधिकार करण्याची माझी इच्छा आहे.

१५ गुरुपदावर स्थापना करण्यास हा योग्य आहे, असें तुह्मां सर्वांना मान्य असल्यास मीं सांगितलेलें कार्य सफल होतें; नसल्यास दुसरा वटू तुह्मी शोधून आणा.

१६ यावर ही जमलेली मंडळी म्हणाली आपल्या पश्चात् हाच वटू गुरुपदास योग्य आहे. कारण जगांत अंधःकाराचा नाश करून उजेड करण्याकरितां सूर्य, चंद्र, हे क्रमानें कारणीभूत असतात.

१७ याप्रमाणें गुरूंचे मनोरथ एक वाक्यतेनें त्या गांवांतील प्रमुखांनीं मान्य करून पुढील कार्याविषयीं प्रयत्न करण्यास सत्वर सुरवात केली.

१८ सदाचार संपन्न असे मठस्थलाचे माहेश्वर मूर्तींनीं गुरूंची आज्ञा मान्य करून,

१९ समुद्राला जाऊन मिळणाऱ्या गंगादि नद्यांचें पाणी व जलाशयादि [ तलाव वगैरे ] पुण्य तीर्थांचें उदक,

आहरन् भक्तिसंपन्नमानसाः कलशैः शुभैः ॥
केचिदाजहृरमलं मंगलद्रव्यसंचयम् ॥ २० ॥

रंभास्तंभैरिक्षुदंडैः पंचपल्लवतोरणैः ॥
स्यंदन्मरंदसंदोहलुब्धभ्रमरझंकृतैः ॥ २१ ॥

मल्लीसेवंतिकादीनां सुमानां स्रक्समुच्चयैः ॥
शिवादिमुख्यदेवानां चित्रैश्चित्तानुरंजकैः ॥ २२ ॥

गंधस्योद्गारिभिर्धूपधूमैरारातिकाचयैः ॥
महिते मंडपे तत्र गोमयेनोपलेपिते ॥ २३ ॥

भिन्नशाखैरुपाचार्यैरात्तपट्टाभिषेचनैः ॥
पंचमुद्रांकितैः शान्तैर्विद्याविनयभूषितैः ॥ २४ ॥

चतुर्भिः शुद्धवेषाढ्यैर्गंधमाल्यादिमंडितैः ॥
ऋत्विग्भिश्चोपपन्नः श्रीचन्नवीरगुरूत्तमः ॥ २५ ॥

---

२० उत्तम अशा कलशांतून भक्ति भावनेनें स्वतां आणलें. कांहींनीं निर्मल असा मंगल द्रव्यसमूह आणला.

२१ केळीचेखुंट, ऊस, पंचपल्लवांचें तोरण, वाहणाऱ्या मकरंद रसांत मोहित झालेल्या भुंग्यांच्या झंकारयुक्त.

२२ जाई, शेवंती इत्यादि फुलांच्या माळांचा समुदाय, मनाला आनंदित करणाऱ्या शिवादि मुख्य देवांचीं चित्रें,

२३ सुगंधी धूपाचा धूर, आरतीसमूह इत्यादिकांनीं शोभणाऱ्या अशा—गाईच्या शेणानें सारविलेल्या— त्या मंडपांत.

२४–२५ निरनिराळ्या शाखेचे, पट्टाभिषिक्त, पंचमुद्रांकित, विद्या विनयानें शोभणारे, शांत, पवित्र वेशधारी, गंध, माला वगैरेंनीं भूषित, उपाचार्य, अशा चार ऋत्विजांनीं मिळून श्री चन्नवीर गुरूत्तम.

शुभमासे शुभे पक्षे शुभनक्षत्रसंयुते ॥
शुभेऽहनि मुहूर्ते च कृत्वा संकल्पमादिमम् ॥ २६ ॥
विधाय कुंभपूजां च गंगेत्याव्हानपूर्वकम् ॥
विघ्नालिध्वांतबालार्कं विघ्नराजमपूजयत् ॥ २७ ॥
ततः पुण्याहकर्माणि नांदिकर्मांकुरार्पणम् ॥
वीरमाहेश्वरैः सर्वैर्यथाशास्त्रमकल्पयत् ॥ २८ ॥
सन्मंडपोक्तदेवानां तत्तद्दिशि यथाक्रमम् ॥
प्रतिष्ठामर्चनां चक्रे चरपट्टाधिनायकः ॥ २९ ॥
मंगलस्नातसव्यग्रं शुक्लांबरयुगान्वितम् ॥
भस्मोध्दूलितसर्वांगं त्रिपुंड्रांकितमस्तकम् ॥ ३० ॥
रुद्राक्षाभरणं चन्नबसवं ब्रह्मचारिणम् ॥
साष्टांगं प्रणिपत्येंद्रदिङ्मुखोपस्थितं शिवम् ॥ ३१ ॥

---

२६ शुभमास, शुभपक्ष, शुभनक्षत्रयुक्त शुभदिवशीं उत्तम मुहूर्तावर, प्रथम संकल्प करून.

२७ 'गंगा' या मंत्रानें आह्वानपूर्वक, कलशपूजा करून, विघ्नरूपी अंधःकाराला बालसूर्यरूपी गणपतीची पूजा केली.

२८–२९ नंतर पुण्याह कर्म, नांदिकर्म, अंकुरार्पण, हीं सर्व वीर माहेश्वरांसह यथाशास्त्र केलीं. तसेंच मंडप विधींमध्ये सांगितलेल्या देवतांची स्थापना व पूजा यथाक्रम त्या त्या दिशेला– चरपट्टादि नायक अशा गुरूत्तमानें– केली.

३० मंगलस्नान केलेला, सौम्य, दोन पांढरीं वस्त्रें परिधान केलेला, सर्वांगास भस्मोध्दूलन केलेला, त्रिपुंड्रांकित कपाळाचा,

३१ रुद्राक्षांचीं आभरणें धारण केलेला, साष्टांग नमस्कार करून, पूर्वदिशेला तोंडकरून बसलेल्या मंगळकर, ब्रह्मचारी अशा चन्नबसवाला,

गंगादितीर्थसंपूर्णैर्गंधमाल्यादिपूजितैः ॥
निक्षिप्ताखिलमांगल्यद्रव्यजातैर्मनोहरैः ॥ ३२ ॥
कुंभैः सधारैः ऋत्विग्भिश्चतुर्भिर्वेदपारगैः ॥
देवस्य त्वादिभिर्मंत्रैरायुःपुष्टियशस्करैः ॥ ३३ ॥
अब्लिंगैर्वेदमंत्रैस्तैस्स्नापयामास देशिकः ॥
पंचब्रह्ममयैः पंचाचार्याव्हानपुरस्सरम् ॥ ३४ ॥
पूजितैस्स्थापितैः पंचकलशैस्तीर्थपूरितैः ॥
सद्योजातादिभिः पंचब्रह्ममंत्रैस्तथैव च ॥ ३५ ॥
रुद्रैकादशिनीमंत्रैस्सधारं चाभ्यषेचयत् ॥
भेर्यादिवाद्यजालानां मंगलानां मुहुर्मुहुः ॥ ३६ ॥
ताडितानां रवैः काष्ठाः प्रतिदध्वनुरंबरे ॥
पपठुर्वैदिका वेदान् स्तोत्राणि स्तुतिपाठकाः ॥ ३७ ॥

---

३२ गंगादि तीर्थांनीं भरलेले, गंध, माला वगैरेंनीं पूजा केलेले, सर्व प्रकारचीं सुगंधी मंगलद्रव्यें घातलेले व मनोहर,

३३ अशा कलशांनीं धारापूर्वक, वेदपारंगत अशा चार ऋत्विजांकडून 'देवस्य त्वा' वगैरे मंत्रानें आयुष्यकारक, पुष्टिकारक, कीर्तिकारक.

३४–३५ 'अब्लिंगादि' वेद मंत्रांनीं गुरूंनीं स्नान करविलें. तसेंच पंचाचार्यांच्या आह्वानपूर्वक पूजिलेले, स्थापिलेले, पंचब्रह्ममय असलेले तीर्थांनीं भरलेले अशा पंच कलशांनीं सद्योजातादि पंच ब्रह्ममंत्रांनीं, तसेंच

३६–३७ श्रीरुद्र मंत्रांनीं धारपूर्वक अभिषेक केला. वरचेवर वाजविण्यांत येणाऱ्या भेरी वगैरे मंगल वाद्यांच्या ध्वनींमुळें दिशांनीं आकाशांत प्रतिध्वनी केला. वैदिकांनीं वेद ह्मटले, स्तुतिपाठकांनीं स्तुति केली.

ततः कौपीनकंथादिपंचमुद्राभिरंचितम् ॥
भस्मत्रिपुंड्रदेदीप्यमानभालं महोज्वलं ॥ ३८ ॥
रुद्राक्षधारिणं शिष्यं सिंहपीठे न्यवेशयत् ॥
अथ श्रीचन्नवीरेशः शिष्यस्यामिततेजसः ॥ ३९ ॥
सुवर्णनिर्मितं पट्टमबध्नान्मस्तके मुनिः ॥
आचार्या ऋत्विजश्चक्रुर्जयेत्याशिषमादरात् ॥ ४० ॥
नीराजनविधिं पौरपुरंध्र्यश्च पतिव्रताः ॥
उदाजहर्जयशेति जयशब्दं पुरौकसः ॥ ४१ ॥
ततः शिष्याः प्रशिष्याश्च पौरमुख्यास्तथेतरे ॥
उपायनानि दिव्यानि ददुः प्रणतिपूर्वकम् ॥ ४२ ॥
जगद्गुरुपदे श्रीमद्रेणुकेनाभिषेचितः ॥
श्रीरुद्रमुनिराचार्य इवाऽऽभाच्चन्नदेशिकः ॥ ४३ ॥

---

३८ नंतर कौपिन, कंथादि पंच मुद्रांनीं चिन्हित, भस्म त्रिपुंड्रयुक्त कपाळ तेजस्वी,

३९ रुद्राक्ष धारण केलेल्या अशा शिष्याला चन्नवीर शिवाचार्यांनीं सिंहासनावर बसविलें. नंतर महातेजस्वी शिष्याच्या,

४० कपाळावर सुवर्णाचा तयार केलेला पट्टा मुनी अशा गुरूचमानें बांधला, आचार्य अशा चार ऋत्विजांकडून 'जय चन्नबसव' 'जय शिवाचार्य' असा प्रेमानें आशीर्वाद दिला गेला.

४१ त्या गांवांतील पतिव्रता अशा सुवासिनी स्त्रियांनीं आरत्या ओवाळिल्या. गांवांतील लोकांनीं ' जय, जय ' असा जयघोष केला.

४२ नंतर शिष्य, प्रशिष्य, गांवांतील प्रमुख, तसेच इतर लोक यांनीं साष्टांग नमस्कार करून उत्तम काणिका दिली.

४३ जगद्गुरूंच्या ठिकाणीं श्री रेणुक शिवाचार्यांकडून अभिषेकिलेल्या श्री रुद्रमुनि शिवाचार्यांप्रमाणें चन्नबसव गुरु शोभायमान् झाला.

भक्ष्यभोज्यादिमिष्टान्नं सघृतं व्यंजनान्वितम् ॥
भुक्त्वा पर्याप्तमाकंठमात्ततांबूलदक्षिणाः ॥ ४४ ॥

सहस्रशो वीरशैवब्राह्मणा ब्रह्मभावुकाः ॥
चन्नवीरमुनेः कीर्तिं गायंतो जग्मुरादरात् ॥ ४५ ॥

अंतेवासिव्रजाः सर्वे प्रमोदांबुधिमज्जिताः ॥
शशंसुर्भागधेयं स्वं दीनाः प्राप्तधना इव ॥ ४६ ॥

शिष्यपालनभारं स्वं धुर्ये चन्नवृषे गुरुम् ॥
निक्षिप्यात्मसुखं लेभे चन्नवीरगुरूत्तमः ॥ ४७ ॥

ततो निर्धूतभोगैकसुखसंतानसंगतिः ॥
केवलं सच्चिदानंदब्रह्मसंलग्नमानसः ॥ ४८ ॥

निरुपाधिचिदानंदरसास्वादनतत्परः ॥
शरीरेंद्रियजालेऽस्मिन्निर्ममो निरहंक्रियः ॥ ४९ ॥

---

४४. तूप, भाज्या वगैरेनींयुक्त असें भक्ष्य भोज्यादि मिष्टान्न भोजन पोटभर जेवून तांबूल, दक्षणा वगैरे घेऊन,

४५ हजारों वीरशैव ब्राह्मण चन्नवीर मुनींची प्रेमानें कीर्ति गात गेले.

४६ सर्व शिष्यवर्ग आनंदित होऊन त्यांनीं 'दरिद्र्याला द्रव्यप्राप्ती झाल्याप्रमाणें' आपल्या सुदैवाचें गाणें गाइलें.

४७ अतिशय जबाबदारीचें असें आपणावरील शिष्य संरक्षणाचें ओझें त्या चन्नबसवावर घालून चन्नवीर गुरुश्रेष्ठ हे स्वसुख पावले.

४८ नंतर विषय भोगानें मिळणाऱ्या सुख संतानांचा संबंध सोडून केवळ सच्चिदानंद ब्रह्माचें ठिकाणीं गढून गेलेला.

४९ शरीर व इंद्रिय यांच्या समूहासंबंधीं 'मी, माझें' अशा प्रकारचा संबंध सोडून उपाधिरहित अशा चिदानंद रसस्वादाचेठिकाणीं आसक्त होऊन राहिले

अंतर्लिंगानुसंधानान्मंदीभूतबहिःक्रियः ॥
तथापीशार्चनध्यानस्तोत्रमंत्रजपादरः ॥ ५० ॥
मंदाधिकारिमर्त्यानां मार्गसंदर्शनोत्सुकाः ॥
संतः शरीरपातांतमाचरंति बहिः क्रियाम् ॥ ५१ ॥
विश्रांतिसमये द्रष्टुमागतान् भक्तिमज्जनान् ॥
दयार्द्रदृष्टिसंपूतान् तृप्तान्वागमृतेन च ॥ ५२ ॥
यदा कदानु भक्तानां कथया मोक्षसांगिनां ॥
पाशग्रंथिविमोक्षाय यतमानान् व्यधान्मुनिः ॥ ५३ ॥
कदाचिन्नूतपट्टाधिकारिणं चन्ननंदिनम् ॥
लौकिकव्यवहाराणां तारतम्यं व्यबोधयत् ॥ ५४ ॥

---

५० नेहमीं अंतर्लिंगाचेठिकाणीं ध्यान असल्यामुळें बाह्य क्रिया मंदावल्या होत्या, तरीही शिवलिंगाची पूजा, ध्यान, मंत्रजप, यांचेठिकाणीं मात्र पूर्ण निष्ठा होती ( शिवलिंग पूजा करीत होते )

५१ सज्जन लोक, अंतर्लिंगाचे अनुसंधानांत ( त्याची पूजा, ध्यान इत्यादिकांत ) त्याचा विशेष व्यासंग नसल्यानें ज्यांचे अधिकार मंदावले आहेत. अशा मनुष्यांना मार्ग दाखविण्यांत उत्सुक होऊन शरिराच्या अंतापर्यंत ( मरेपर्यंत ) बाह्याक्रिया [ इष्टलिंग पूजादिकर्में ] करतात.

५२ विश्रांतीचेवेळीं आपल्या दर्शनास आलेल्या भक्तिवान् लोकांना कृपार्द्रदृष्टीनें व उपदेशामृतानें पवित्र व संतुष्ट करीत होते.

५३ कांहीं कांहीं वेळीं पूर्वी मोक्ष प्राप्ति करून घेतलेल्या भक्तांच्या कथा सांगून संसारपाशबंधनांतून मुक्त होण्याविषयीं त्या लोकांना उत्सुक करीत असत.

५४ कांहीं वेळेला आपल्या इथें आलेला व नवीन पट्टाभिषिक्त अशा चन्नबसव शिष्याला लौकिक व्यवहारांतील वागणुकीसंबंधीं तारतम्य ज्ञानाची समजूत करून देत असत.

कदाचिद्द्वारमाच्छाद्य पूजासद्मनि सत्तमः ॥
दिवारात्रिमजानन् सन् शिवयोगपरोऽभवत् ॥ ५५ ॥
एवमेव शिवाचार्यः शिवानंदपरायणः ॥
दिवसान् यापयन्नासीच्चन्नवीरगुरूत्तमः ॥ ५६ ॥
इतः सिंहासनासीनश्चन्ननंदी धरामृडः ॥
उदयाचलमारूढो व्यराजद्भानुमानिव ॥ ५७ ॥
सर्वभूतदया तस्मिन्नासीच्छंभाविवानघा ॥
बुद्धदेव इवाहिंसायाश्च स्वाभाविकी स्थितिः ॥ ५८ ॥
धरायामिव योगींद्रे स्थिरा चासीत्सहिष्णुता ॥
शिवाचार्यं क्षमाऽऽश्रित्य चंद्रिकेवेंदुमाबभौ ॥ ५९ ॥

---

५५ एकादे वेळीं शिवपूजेस बसावयाच्या खोलीचा दरवाजा झांकून ते शिवध्यानांत इतके निमग्न होत असत कीं, आतां हा दिवस आहे कीं रात्र आहे, याचें त्यांना भानसुद्धां रहात नसे.

५६ शिवानंदाविषयीं तत्पर व गुरूत्तम असे चन्नवीर शिवाचार्य हे वरीलप्रमाणें आपली कालक्रमणा करीत होते.

५७ इकडे भूरुद्र असलेले चन्नबसव शिवाचार्य हे उदयाचलावर विराजमान झालेल्या सूर्याप्रमाणें त्या सिंहासनावर विराजित झाले होते.

५८ परमेश्वराचेठिकाणीं असलेल्या भूतदयेप्रमाणें, या शिवाचार्यांचे-ठिकाणीं निर्दोष ( आपपर भावनारहित ) अशी सर्व प्राणीमात्रांविषयींची भूतदया होती.

५९ पृथ्वीप्रमाणें या आचार्यांचेठिकाणींही सहिष्णुता [ सोशिकपणा ] होती, चंद्राच्या आश्रयानें चांदणें शोभायमान दिसतें, त्याप्रमाणें या आचार्यांच्या सहवासानें यांचे ठिकाणची क्षमा शीलता अति उज्वल होती.

यस्याऽऽज्ञाऽऽकीटब्रह्मांतसर्वदेहिशिरःस्थिता ॥
मदनः सोऽयमेतस्मिन्नासीत्कुंठीभवद्बलः ॥ ६० ॥

जितासुरसुरामर्त्यसार्थं कामादिसंज्ञकम् ॥
अरिषड्वर्गमंतस्थं जित्वा बाल्ये शिवार्चकः ॥ ६१ ॥

स्वराष्ट्रे चक्रवर्तीव शिवाश्रमपदे स्थितः ॥
निरातंकः स्वधर्मास्तानाचरन् सन्नवर्तत ॥ ६२ ॥

लावण्यं यौव्वनं नूत्नं ब्रह्मतेजः परं तपः ॥
शापानुग्रहसामर्थ्यमस्मिन्ननुपमं स्थितम् ॥ ६३ ॥

कीर्तिः कार्तिकराकेंदुचंद्रिकाधवला गुरोः ॥
दिगंगनांगसंलग्नदुकूलश्रियमातनोत् ॥ ६४ ॥

---

६० ज्याची आज्ञा कीटकापासून ब्रह्मापर्यंतच्या सर्व प्राणिमात्रांना शिरसावंद्य आहे असा त्रैलोक्याचा वीरनायक जो मदन तो या आचार्यांचे ठिकाणीं मात्र हतवीर्य होऊन राहिला.

६१ मनुष्य, राक्षस, देव इत्यादिकांना ज्यांनीं जिंकलें आहे अशा काम क्रोधादि षड्रिपूनांसुद्धां या आचार्यांनीं बालवयांतच जिंकून,

६२ शत्रूंना जिंकून आपल्या राज्यांत सार्वभोमत्त्व उपभोगणाऱ्या राजाप्रमाणें—हेही आपल्या शिवाश्रमाचेंठिकाणीं राहून गुरूसंबंधीं आपलीं कर्तव्यें निर्भयपणें करीत होते.

६३ सौंदर्य, नवीन तारुण्य, ब्रह्मतेज, दुश्चरतप, शापानुग्रह सामर्थ्य हीं सर्व या गुरूंचेठिकाणीं असदृश ( पहिल्या नंबरचीं ) होतीं.

६४ शरदृतूंतील चंद्राच्या चांदण्याप्रमाणें शुभ्र, अशा या गुरुश्रेष्ठांचे कीर्तीनें, दिशारूपी स्त्रियांच्या आंगावरील पांढऱ्या वस्त्राची शोभा धारण केली होती.

दीक्षासंस्कारतः सर्वधर्माणामुपदेशतः ॥
अंतेवासिगणानार्यश्चक्रे सत्पथचारिणः ॥ ६५ ॥

सुवाक्कुंभीमुखोद्भूतसम्यग्बोधांबुधारया ॥
भक्तहृत्क्षेत्रसंरूढं धर्माङ्घ्रिपमपोषयत् ॥ ६६ ॥

एवं स्थिते शिवाचार्ये गुरोर्देहावसानिका ॥
विपत्तिः पतिता घोरा दंभोलिरिव पर्वते ॥ ६७ ॥

दुःखातिरेकतः सर्वा दिशाः शून्या अभुः क्षणम् ॥
बुध्वा विनश्वरं देहं जहाति स्मागतां शुचम् ॥ ६८ ॥

विज्ञस्याप्यंतरात्मानमाच्छादयति संसृतिः ॥
तथापि न चिरं मेघः सूर्यबिंबमिवांबरे ॥ ६९ ॥

---

६५ दीक्षा संस्कारानें व धर्मोपदेशानें आपल्या शिष्यांना हे गुरुवर्य सन्मार्गगामी करीत होते.

६६ हे आचार्य आपल्या वाक्यरूपी कुंभांतील पडणाऱ्या उत्तम बोधरूपी जलधारेनें भक्तांच्या अंतःकरणरूपी जमिनींत उगवलेल्या धर्मरूपी झाडांची वाढ करीत होते.

६७ अशा प्रकारें असणाऱ्या त्या शिवाचार्यांवर आपले गुरु चन्नवीर शिवाचार्यांचें शिवैक्यरूप महा संकट पर्वतावरील वज्राप्रमाणें येऊन पडलें.

६८ त्यामुळें त्या गुरुवर्यांना दुःखाच्या अतिरेकानें थोडा वेळ सर्व दिशा शून्यवत् भासल्या, नंतर देह नश्वर [ नाश पावणारा ] आहे हें उमगून तें दुःख त्यांनीं सोडलें.

६९ चांगल्या सूज्ञ ( आत्मस्वरूप जाणणाऱ्या ) माणसाच्या आत्म्याला संसाराचें आवरण पडतें ( अज्ञान प्राप्त होतें ) तरीही तें आकाशांतील सूर्य मंडलाला आवरण घातलेल्या मेघांप्रमाणें फार वेळ राहूं शकत नाहीं.

भिन्ने घटे तदाकाशो महाकाशे विलीयते ॥
तथैव चन्नवीरात्मा चात्मनैकत्वमागतः ॥ ७० ॥
जरा मृत्युः शरीरस्य विद्यते न हि चात्मनः ॥
अमृत्युरजरश्चात्मा सच्चिदानंदलक्षणः ॥ ७१ ॥
एवं वेदान्तवाक्याभिप्रायपूतैर्मनोहरैः ॥
विचारैर्विगताऽऽवेगमानसोऽभूद्गुरूत्तमः ॥ ७२ ॥
दुःखापगमनाच्चासौ चकास्ते स्मेह देशिकः ॥
सैंहिकेयमुखान्मुक्तः सहस्रांशुरिवांबरे ॥ ७३ ॥
धृत्वा धुरमखर्वां तां शिष्याणां पालनात्मिकाम् ॥
अखिन्नोऽश्रमितश्चासीच्छेषाहिरिव तापसः ॥ ७४ ॥
स्वकीयाचरणैर्भव्यैर्लिंगपूजादिकर्मगैः ॥
शान्तैरालोकनैः सत्यवाग्भिश्चातोपयज्जनान् ॥ ७५ ॥

---

७० फुटलेल्या घागरींतील आकाश ब्राह्माकाशाशीं एकरूप होतें त्या प्रमाणें त्या गुरुश्रेष्ठ चन्नवीर शिवाचार्यांचा आत्मा शिवरूपी आत्म्याशीं एकरूपत्व पावला.

७१ म्हातारपण, मरण या अवस्था शरिराला आहेत, आत्म्याला असत नाहींत. कारण सच्चिदानंदरूपी आत्मा अजरामर आहे.

७२ याप्रकारच्या वेदांत वाक्याच्या अभिप्रायानें पवित्र आणि मनोहर अशा विचारांनीं गुरूत्तमांनीं मानसिक दुःख सोडलें.

७३ हे आचार्य मानसिक दुखःच्या मुक्ततेनें राहूच्या मुखांतून सुटलेल्या आकाशांतील चंद्राप्रमाणें प्रकाशमान् झाले.

७४ हे श्रेष्ठ तपस्वी आदिशेषाप्रमाणें शिष्यांच्या संरक्षणाचें ओझें वाहून त्यामुळें दुःखित किंवा थकलेले असे झाले नाहींत.

७५ मनोहर अशा शिवपूजादि आपल्या आचरणानें, शांत दृष्टीच्या पाहण्यानें सत्य भाषणानें, लोकांना आनंदित करीत होते.

संतुष्टा जनता सर्वा भव्यभक्तिपुरःसरम् ॥
नित्यं निध्यायति स्मेशमिव तं चन्ननंदिनम् ॥ ७६ ॥
स्नात्वाऽभ्यर्च्येष्टलिंगं स्वं जलबिल्वादिसाधनैः ॥
मठमभ्येत्य भक्तौघो नत्वा श्रीगुरुमादरात् ॥ ७७ ॥
स्वस्वागारमुपेत्याभ्यवहारं संविधाय च ॥
आत्मकर्मणि चासक्तो भवति स्म दिने दिने ॥ ७८ ॥
यदा कदाचिदार्यस्य दर्शनं यद्दिने न चेत् ॥
तद्दिनं दुर्दिनं लोको मनुते स्मात्मचेतसि ॥ ७९ ॥
अनभ्यर्च्य शिवं चान्नग्रहणं पापकारणम् ॥
यथा तथा गुरुं चेति व्यजानाच्छिष्यसार्थकम् ॥ ८० ॥
इत्थं भक्तिभराक्रांतमानसा मनुजर्षभाः ॥
न गुरोरधिकं चेति मंत्रं जजपुरन्वहम् ॥ ८१ ॥

---

७६ त्यामुळें संतुष्ट झालेला सर्व जनसमूह मोठ्या भक्तिपूर्वक नेहमीं चन्नबसव गुरूंना शिवाप्रमाणें चिंतीत होता.

७७ भक्तसमूह स्नान करून, जल, बेल वगैरे साधनांनीं आपल्या इष्टलिंगाची पूजा करून मठाला येऊन प्रेमानें श्रीगुरूंना नमस्कार करून,

७८ आपापल्या घरीं येऊन, जेऊन आपापल्या उद्योगास लागत असत. असा हा कार्यक्रम दररोज चालत असे.

७९ कदाचित् एकादे दिवशीं गुरूंचे दर्शन झालें नाहीं तर तो दिवस ‘ दुर्दिन ’ [ वाईट दिवस ] असें भक्तलोक मनांत समजत असत.

८० शिवपूजा न करितां अन्नग्रहण केलें तर तें पापास कारणीभूत होतें त्याप्रमाणें दररोज गुरूंची पूजा न करितां अन्नग्रहण करणें हें पापच आहे. असें ते भक्त लोक समजत होते.

८१ याप्रमाणें अतिशय भक्तियुक्त अंतःकरणाचे मानवश्रेष्ठ ‘ नगुरोरधिकं ’ याचा मंत्राप्रमाणें नेहमीं जप करीत असत.

भक्तोद्धरणकार्यार्थे जागरूकः शिवव्रती ॥
उपायनमिषेणान्यग्रामांतेवासिनां गृहान् ॥ ८२ ॥
गत्वा तत्कृतसत्कारः स्वेन पूर्वमुदाहृतः ॥
धर्मस्तु पाल्यते नो वा तैरित्यत्यंतसूक्ष्मया ॥ ८३ ॥
दृष्ट्याऽवलोक्य भक्तं तमचरंतं मृदूक्तिभिः ॥
मर्मस्पृशद्गभीराभिरावेद्याचारिणं व्यधात् ॥ ८४ ॥
ये सदाचारसंपन्ना गुरुजंगमसेविनः ॥
धनाढ्या वा दरिद्रा वा तेष्वस्य परमादरः ॥ ८५ ॥
महिमागारमाचार्यं दृष्ट्वाऽऽत्मानं पुनीतकम् ॥
विधातुमिव वर्षर्तुराजगामांबराद्भुवम् ॥ ८६ ॥
चक्रवाकांगनामानं पश्यतो हरणक्षमैः ॥
केतकीगंधमाघ्रातुं भ्रमत्पुष्पंधयांधितैः ॥ ८७ ॥

---

८२ भक्तांचा उद्धार करण्याच्या कार्यांत दक्ष, शिवव्रती असे चन्नवसव काणिकेच्या निमित्तानें इतर गांवीं असणाऱ्या शिष्यांचे घरीं जाऊन.

८३-८४ भक्तांकडून करण्यांत आलेल्या आदर सत्काराचा स्वीकार करून, आपण पूर्वीं केलेल्या धर्मोपदेशाप्रमाणें त्या लोकांकडून वर्तन होतें कीं नाहीं याचें सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण करून, न वागणाऱ्या लोकांच्या मर्मस्थळाला भिडणारें परंतु मृदु व गंभीर अशा भाषणानें समजावून सांगून त्याप्रमाणें वागण्यास लावत होते.

८५ सदाचार संपन्न, गुरु, जंगम प्रेमी अशा लोकांचे ठिकाणीं—ते श्रीमंत असोत वा गरीब असोत या आचार्यांचें प्रेम होतें.

८६ महिमाशाली गुरूंचें दर्शन घेऊन, आपण पवित्र व्हावें म्हणूनच कीं काय? त्यावेळीं पावसाळा आला.

८७ चक्रवाक पक्षाच्या मादीचा [स्त्रीचा] अहंकार नाहींसा करणारा केवड्याच्या सुगंधसेवनास्तव इतस्ततः भटकणाऱ्या भुंग्यानें शामवर्ण झालेला,

मेदस्वीकृतमायूरकेकारावैर्मनोहरैः ॥
मेघमेदुरिताशौघैर्दिदीपे दिवसैर्भृशम् ॥ ८८ ॥
नीलांबुदालिनालाग्रात्तडिद्वर्त्याऽनुयोजितात् ॥
निस्सरत्करकागोलैर्ग्रीष्मं वर्षभटोऽहनत् ॥ ८९ ॥
जितमर्दलरावेण स्वरावेण पयोधरः ॥
नर्तयामास युग्मानि यौवनोन्मत्तकेकिनाम् ॥ ९० ॥
कंदलीपुष्पगंधाढ्यैः कदंबरजसाऽऽवृतैः ॥
मारुतैर्विदधे मानभंगः कांतेषु योषिताम् ॥ ९१ ॥
मेघस्याद्यांभसां बिंदुजालैरुर्वीतलं यथा ॥
कृतं निरस्तसंतापं न तथाऽध्वगमानसम् ॥ ९२ ॥

---

८८ मोरांच्या आवाजानें भरलेला, मनोहर, मेघाच्छादित दिशायुक्त अशा दिवसांनीं पावसाळा अतिशय शोभायमान् झाला.

८९ पावसाळारूपीं योध्यानें वीजरूपी अग्निमुखवातीनें, मेघांच्या पंक्तिरूपी बंदुकींतून बाहेर निघणाऱ्या गाररूपी गोळ्यांनीं ग्रीष्मऋतूला मारलें.

९० मेघांनीं, मृदंगाच्या आवाजाप्रमाणें गंभीर अशा आपल्या आवाजानें, तारुण्यानें उन्मत्त झालेल्या मोरांच्या जोडप्यांना

९१ नाचविलें, कंदली पुष्पांच्या सुगंधयुक्त, कळंबाच्या फुलांतील परागांनीं भरलेल्या अशा वायूनें आपापल्या प्रियतमाविषयीं असलेला स्त्रियांचे ठिकाणचा जो मान [ गर्व ] त्याचा भंग केला.

९२ पावसाळ्यानें मेघाच्या पाण्याच्या पहिल्या थेंबांनीं भूतल (पृथ्वी) जसा ताप रहित केला तशीं वाटसरूंचीं मनें तापरहित केलीं नाहींत.

दंतिदंतार्जुनं भृंगसंगि कैतकमंबरात् ॥
घनौघघट्टनभ्रष्टः शशिखंड इवाऽऽबभौ ॥ ९३ ॥
मुक्ताचूर्णावदातास्ते निर्झरांबुकणोपमाः ॥
कुटजानां परागौघा दधिरेणुश्रियं दधुः ॥ ९४ ॥
मालतीपुष्पजालानां परागपरिपांडुराः ॥
भ्रमंतो भ्रमरा रेजुश्चलत्तारागणा इव ॥ ९५ ॥
पराङ्मुख्योऽपि कोपात्ता घनगर्जनभीरवः ॥
परिरब्धुं न्यवर्तंत कांतान् कांताः सविभ्रमाः ॥ ९६ ॥
वाति वारिदवातौ के विरक्ता विषयस्पृहाः ॥
नेत्युच्चैरिव गर्जंतो दध्वनुर्भ्रमरा वने ॥ ९७ ॥

---

९३ हत्तीच्या दाताप्रमाणें शुभ्र व भुंग्यांनीं युक्त, असें केवड्याचें फूल हें, मेघांच्या घर्षणानें तुटून खालीं पडलेला चंद्राचा तुकडाच कीं काय? असें दिसत होतें.

९४ मोत्यांच्या चूर्णाप्रमाणें शुभ्र, पर्वतावरून खालीं वहात येणाऱ्या नदीच्या जलकणांशीं समान, अशा रानजाईच्या फुलांचे पराग दह्याच्या बारीक कणाप्रमाणें शुभ्र दिसत होते.

९५ मालती फुलांच्या परागांनीं पांढरे झालेले आकाशांत भटकणारे भुंगे, चर ताऱ्याप्रमाणें भासत होते.

९६ अति कोपायमान होऊन घराबाहेर जाणाऱ्या विलासी स्त्रिया, मेघ गर्जना ऐकून भयभीत होऊन आपापल्या पतींना आलिंगन देण्याकरितां मागें परतत होत्या.

९७ “ पावसाळ्यांतील वारा वहात असतां कोणता विरक्त विषयाचे ठिकाणीं आसक्त होत नाहीं ! ” असें जोरानें ओरडत आहेत कीं काय ? असा आवाज भुंगे रानांत करीत होते.

पटवासमिवातानीद्ात्मीयांश्च रजःकणान् ॥
धृतवस्त्रोपमाब्दानां दिशां नीपवनावलिः ॥ ९८ ॥
शंपाभयादिवागारमयुंचंतोऽगनाजनाः ॥
एकांते रमयंति स्म हृष्यद्रोमोद्गमान् प्रियान् ॥ ९९ ॥
वर्षतौं श्रावणे मासे शैवसंघसमाश्रिते ॥
अखिलोर्वीतले शैलसुताजानेर्जगद्गुरोः ॥ १०० ॥
शिवलिंगस्य संपूजा कीर्तनं च यथाविधि ॥
विधीयते विशेषेण सद्भक्त्या भक्तपुंगवैः ॥ १०१ ॥
राकेंदुधवलक्षीराखंडधाराभिरादरात् ॥
रुद्रैकादशिनीमंत्रैस्स्नापयित्वा सदाशिवम् ॥ १०२ ॥
पत्रपुष्पादिभिः षोडशोपचारैर्मनोहरैः ॥
देवदेवं महादेवं पूजयामासुरव्ययम् ॥ १०३ ॥

---

९८ नीप वृक्षांची रांग, मेघरूपी वस्त्र परिधान केलेल्या दिशांचे ठिकाणीं आपले परागांचा उपयोग बुक्याप्रमाणें करीत होती.

९९ जणूं काय विजेच्या कडकडाटाच्या भीतीमुळेंच आपलें राहते घर [ झोंपण्याची जागा ] न सोडणाऱ्या विलासी स्त्रिया रोमांचित झालेल्या आपल्या प्रियतमांबरोबर एकांतांत विनोद करीत होत्या.

१०० वर्षर्तूंत श्रावणमासांत, शैवसमूहयुक्त सर्व पृथ्वीवर गिरिजापति जगद्गुरू, अशा

१०१ शिवलिंगाची पूजा व शिव कीर्तन हीं यथाविधि सद्भक्तीनें भक्तश्रेष्ठांकडून विशेषेकरून केलीं जातात.

१०२ पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें शुभ्र व अखंड अशा दुधाच्या धारांनीं श्रीरुद्र मंत्रांनीं मोठ्या प्रेमानें शिवाला स्नान घालून

१०३ मनोहर अशा पत्र पुष्पादि षोडशोपचारांनीं नाशरहित अशा देवांचा देव महादेव, याची पूजा करीत होते.

कोमलाच्छिद्रबिल्वानां सहस्रेण च केचन ॥
अन्ये दशसहस्रैश्च परे लक्षेण भेजिरे ॥ १०४ ॥
मिताऽऽहारपराः केचिदेके गोक्षीरपायिनः ॥
परं समाचरन् शैवाः श्रावणे शांभवं व्रतम् ॥ १०५ ॥
एवमेव महादेवसपर्याया महोत्सवे ॥
जाते सत्यखिले देशे भक्त्युत्कर्षेण भूयसा ॥ १०६ ॥
चन्नबसवांशसद्बोधाद्बुद्धसाफल्यसाधनाः ॥
जग्मुर्भक्तेः परां कोटिं होट्टिगिग्रामवासिनः ॥ १०७ ॥
श्रीचन्नबसवाचार्यपादपाथोजपूजने ॥
अहं पूर्वमहं पूर्वमिति बुद्धिरभून्नृणाम् ॥ १०८ ॥
माभूत्कस्याप्यसंतोषश्चेति वृद्धतमास्तदा ॥
एकैकस्मिन् गृहे पूजा स्यादित्थं क्रममूचिरे ॥ १०९ ॥

---

१०४ कांहीं भक्तलोक, मृदु, अच्छिद्र अशा हजार बिल्वदळांनीं, कांहीं दहा हजार बिल्वदळांनीं कांहीं लक्ष बिल्वदळांनीं शिवाची पूजा करीत होते.

१०५ कांहीं मिताहारी होऊन, कांहीं फक्त गाईचें दूध घेणारे असे होऊन शैव श्रावण मासांत शिवव्रताचें आचरण करीत होते.

१०६ अशा प्रकारें महादेवाच्या पूजेचे मोठमोठे समारंभ सर्व देशांत अत्यंत भक्तीनें उत्कर्षपूर्वक होत असतां,

१०७ चन्नबसव स्वामींच्या उपदेशानें पूजेचें साफल्य जाणणारे होटगी गांवांतील रहिवाशी भक्तीचें शेवटचें टोंक मिळवितें झालें ( अतिशय भक्तिवान् झाले होते )

१०८ श्री चन्नबसवांच्या पादकमलाच्या पूजेविषयीं ‘मी प्रथम, मी प्रथम,’ अशी बुद्धि होटगी एथील लोकांत निर्माण झाली होती.

१०९ त्याकाळीं ह्यातारे लोकांनीं कोणालाही असंतोष होऊं नये म्हणून दररोज एकेका शिवभक्ताच्या घरीं स्वामींची पादपूजा व्हावी असा क्रम ठरविला.

एकैकस्य तथैवासीद् गृहे च गृहमेधिनः ॥
श्रीगुरोः पादपाथोजपूजा पापविनाशिनी ॥ ११० ॥
स्वसंपत्या स्वभक्त्या च स्वकीर्त्या स्वप्रतिष्ठया ॥
सदृशीं गुरुपूजां ते भक्तास्तेनुरवंचनम् ॥ १११ ॥
क्रमेण गुरुवर्यस्य पूजाकालो गृहं गतः ॥
सायव्वेति प्रसिद्धायाः कोठाणीललनामणेः ॥ ११२ ॥
या भृंगनीलकेशाली राकाचंद्रनिभानना ॥
चतुर्थीचंद्रसंकाशललाटललितद्युतिः ॥ ११३ ॥
भ्रूवल्लीनिर्जितानंगचापश्रीररुणाधरा ॥
नेत्राभ्यां निर्हृतांभोजसौभाग्या सौम्यदर्शना ॥ ११४ ॥
तिलपुष्पसधर्माऽऽसीत्तन्नासा चारुतागुणात् ॥
दाडिमीबीजनीकाशदंतपंक्तिमनोहरा ॥ ११५ ॥

---

११० नंतर त्याप्रमाणें प्रत्येक शिवभक्ताचे घरीं श्रीगुरूंची— पापांचा नाश करणारी— पादपूजा होऊं लागली.

१११ आपापली, संपत्ति, भक्ति, कीर्ति, प्रतिष्ठा इत्यादिकांना अनुरूप अशी गुरुपूजा अभेद बुद्धीनें ते भक्त करीत होते.

११२ अशा प्रकारें गुरुवर्य चन्नबसव स्वामींची पादपूजा क्रमाक्रमानें चालू असतां, एक दिवस कोठाणी घराण्यांतील सायव्वा नांवाच्या बाईच्या एथें पूजेची पाळी आली.

११३–११४ भुंग्याच्या रंगाप्रमाणें काळे केस असलेली, पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें जिचें मुख, चतुर्थीच्या चंद्राच्या तेजाप्रमाणें जिच्या कपाळाची शोभा, जिच्या भिंवया मदनाचे धनुष्याचा तिरस्कार करीत होत्या, तांबड्या रंगाच्या ओठाची, जिचे डोळे कमळाचें सौंदर्य बलात्कारानें हिरावून घेत होते शांत दर्शनी,

११५ जिचें नाक तिलपुष्पाशीं समान होतें, डाळिंबाच्या बियाप्रमाणें जिच्या दंतपांक्ति मनोहर होत्या,

कंठकुंठीकृताऽनूनशंखश्रीर्द्व्यणुकोदरी ॥
श्रीकाराकारकर्णाढ्या कुंभिकुंभसमस्तनी ॥ ११६ ॥
शिरीषपुष्पमालानुकारिबाहालतोर्जिता ॥
करकोमलतादूरीकृतपल्लवपेलवा ॥ ११७ ॥
उरोजगिरिदुर्गं तं समारोढुं मनोभुवा ॥
कृतसोपानपंक्तिर्वा बभौ तस्या वलित्रयी ॥ ११८ ॥
नितंबनिन्हुतानंगक्रीडापुलिनचारुता ॥
कर्कशत्वाच्च शीतत्वाच्छुंडादंडश्च हस्तिनः ॥ ११९ ॥
सुवर्णकदलीकांडस्तावुभौ जगतीतले ॥
तदूर्वोरुपमालेशस्यापि बाह्यौ बभूवतुः ॥ १२० ॥

---

११६ जिचा कंठ, शंखाच्या सौंदर्याचा तिरस्कार करणारा आहे, द्व्यणुका ( दोन अणु जवळ जवळ ठेवण्यानें व्यापल्या जाणाऱ्या जागेइतकें ) प्रमाणें अति सूक्ष्म कंबर असलेली, जिचे कान 'श्री' काराच्या आकाराचें आहेत, हत्तीच्या कुंभस्थलाप्रमाणें कुच असलेली.

११७ शिरसाच्या पुष्पमालेप्रमाणें मृदु बाहु असलेली, तळहात कोंवळ्या पानाप्रमाणें मृदु असलेली,

११८ जिच्या कुचरूपी डोंगरी किल्ल्यावर चढण्याकरितां मदनानें जणूं काय तीन पायऱ्याची शिडीच तयार केली आहे त्या शिडीप्रमाणें जिच्या पोटाच्या तीन वळ्या दिसत होत्या,

११९-१२० जिचे नितंब [ ढुंगणाचे कुले ] मन्मथाच्या क्रीडापुलिनाला ( वाळूच्या ढिगाला ) तिरस्कारित होते, कर्कशत्वामुळें व अतिथंडपणामुळें अनुक्रमें हत्तीची सोंड व सोनेरी रंगाचे केळीचे खुंट हीं दोन्हीं जिच्या मांड्यांची बरोबरी करूं शकत नव्हतीं,

अशोकांकुरसंकाशं कंबुकंठ्याः पदांबुजम् ॥
किंतु मार्दवमारुण्यं नित्यमाभात्पदद्वये ॥ १२१ ॥
एवं सौंदर्यसौभाग्यशालिनी शीलवत्तरा ॥
वयःषोडशवर्षीया सद्गुणाभरणांचिता ॥ १२२ ॥
स्वधर्माचारसंसक्तमानसा मानवत्तमा ॥
पत्युश्च स्वस्य चाविद्यमानाप्तजनसंकुला ॥ १२३ ॥
संवत्सरद्वयात्पूर्वं दुर्दैवान्मृतभर्तृका ॥
दुःखातिरेकसंभिन्नहृदया मदिरेक्षणा ॥ १२४ ॥
वैधव्यवन्हिसंदग्धे कोमले कायकानने ॥
चारुताचंद्रिका तस्या वैयर्थ्यं समपद्यत ॥ १२५ ॥

---

१२१ जिचे पाय, अशोक वृक्षाच्या कोंवळ्या पानाप्रमाणें होते, तरी त्या स्त्रीच्या पायाचे ठिकाणीं (तळपायाचे ठिकाणीं) मृदुपणा व लाली हीं नेहमीं असत,

१२२ अशा प्रकारें सौंदर्याची शोभा असलेली, सुस्वभावी, सोळा वर्षांचे वयाची तरुणी, सद्गुणरूपी अलंकारांनींयुक्त,

१२३ स्वधर्म, आचार यांत गढून गेलेली, लोकांत मान मिळविलेली अशी ती स्त्री होती. तिला माहेर व सासर या दोन्हीं घराण्यांतील कोणीच माणसें राहिलेलीं नव्हतीं.

१२४ या सुंदराक्षीचा नवरा दोन वर्षांपूर्वी दुर्दैवानें आकस्मिक मृत्यु पावल्यामुळें सध्याचें स्थितींत ती अतिशय दुःखी कष्टी होती.

१२५ अग्नीनें जळून भस्म झालेल्या अरण्यांत पडलेल्या चांदण्याप्रमाणें तिचें वैधव्याग्नीनें दग्ध झालेल्या शरिराला हें वरील सौंदर्य व्यर्थ होतें.

क्रमेण ध्वस्तदुःखार्तिर्गृहकर्मपरायणा ॥
साऽभूद्बलवती ह्याशा विद्वांसमपि कर्षति ॥ १२६ ॥
सेयं सायव्वनाम्नी तं चानेतुं गुरुपुंगवम् ॥
कृतेष्टलिंगसंपूजा पूतचित्ता मठं ययौ ॥ १२७ ॥
श्रीगुरोः शिवपूजाया यावदंतो भविष्यति ॥
तावत्पूजालयद्वारि निषण्णाऽऽसीद्वरांगना ॥ १२८ ॥
समापितेष्टलिंगार्चो जपकर्मविचक्षणः ॥
भस्मोध्दूलितसर्वांगस्त्रिपुंड्रांकितमस्तकः ॥ १२९ ॥
रुद्राक्षकंठभूषोऽसौ जटामुकुटमंडितः ॥
काषायांबरकंथाढ्यः पद्भ्यामादृतपादुकः ॥ १३० ॥

---

१२६ कालगतीनें पतिवियोगाचें दुःख हळूहळू नाहींसें होऊन आपल्या गृहकृत्यांत तिचें मन गुंतलें, कारण—'बलवत्तर अशी संसाराची आशा विद्वानांनासुद्धां आपल्याकडे ओढून घेते.'

१२७ अशी सायव्वा नांवाची तरुण स्त्री आपली इष्टलिंगपूजा संपवून पवित्र मनाची ती सायव्वा गुरुपुंगव अशा चन्नबसव स्वामींना पादपूजानिमित्त घरीं बोलावून आणण्याकरितां मठाला आली.

१२८ ही ललनामणी, आल्यावेळीं श्रीगुरूंची शिवपूजा सुरू होती म्हणून ती पूजा संपेपर्यंत त्या पूजागृहाच्या दरवाजाचे बाहेरील बाजूस बसून राहिली.

१२९ जप करण्यांत कुशल अशा श्रीगुरूंनीं इष्टलिंगपूजा पूर्ण करून सर्वांगास भस्मोध्दूलन केलेले, कपाळास, त्रिपुंड्र धारण केलेले,

१३० गळयांत रुद्राक्षांच्या माळा धारण केलेले, डोक्यावरील जटांनीं अलंकृत असलेले, भगवी कफनी धारण केलेले, पायांत खडाव घातलेले,

द्वाविंशवर्षदेशीयो वपुष्मानिव मन्मथः ॥
उत्सर्पिब्रह्मतेजोभिः स्थितः प्रांशुरिवानघः ॥ १३१ ॥
शिवाचार्यः शिवागारात्साक्षाच्छिव इवापरः ॥
यदा बहिः समायातस्तदोत्थाय कुलांगना ॥ १३२ ॥
साष्टांगं प्रणिपत्याथ कृतहस्तांबुजांजलिः ॥
स्वामिन् समेत्य मद्गेहं मत्कृताऽतिथिसत्क्रियाम् ॥१३३॥
स्वीकृत्य कृपया मां च पुनीतां कुरु मत्प्रभो ॥
इत्थं संप्रार्थ्य तं देवं चन्ननंदिगुरूत्तमम् ॥ १३४ ॥
प्रसन्नीकृत्य तेनेयं निर्जगाम मठाद्गृहम् ॥
व्यक्त्यपेक्षा सतां कुत्र भक्तिमात्रावलोकिनाम् ॥ १३५ ॥

---

१३१ बावीस वर्षांचे तरुण असलेले, यामुळें 'शरीर धारण करून आलेला जणूं मन्मथच कीं काय!' असे असणारे, वर पसरणाऱ्या ब्रह्मतेजामुळें अति उंच भासणारे,

१३२ अशा प्रकारचे चन्नबसव शिवाचार्य 'साक्षात् जणों दुसरा शिवच कीं काय!'—जेव्हां त्या शिवपूजागृहांतून बाहेर आले त्यावेळीं ती कुलवान् सायव्वा उठून

१३३ साष्टांग नमस्कार करून नंतर दोन्ही हात जोडून, हे स्वामी माझे घरीं येऊन, माझेकडून केल्या जाणाऱ्या अतिथिसत्काराचा

१३४-१३५ कृपेनें स्वीकार करून हे माझ्या प्रभो, मला पुनीत करा; अशा प्रकारें प्रार्थना करून गुरूत्तम अशा चन्नबसव देवाला संतुष्ट करून त्यांच्यासह ती मठाहून आपल्या घरीं आली. बरोबर आहे. कारण— "केवल भक्तिकडेच पाहणाऱ्या सज्जनांना व्यक्तीची जरूर नसते."

गत्वा गेहं स्वयं पाद्यमादौ दत्वा सुलोचना ॥
पूजासने गुरुश्रेष्ठमुपावेशयदादरात् ॥ १३६ ॥
गुरुपूजां समाधातुं कृतासनपरिग्रहा ॥
पत्रपुष्पफलादीनि सज्जीकृत्याखिलानि च ॥ १३७ ॥
पद्मासनसमासीना चानन्यासक्तमानसा ॥
पूजां कर्तुं समारेभे श्रीगुरुं शरणं गता ॥ १३८ ॥
या पत्युः परलोकाप्तिमारभ्यात्मबलाद्भृशम् ॥
सन्निरुध्याखिलाक्षाणां विषयाभिनिवेशनम् ॥ १३९ ॥
कुलीनविधवानां च सदाचारं समाविशत् ॥
चतुर्थीचंद्रवद्या तु परपुंसोऽवलोकनम् ॥ १४० ॥
पापायेति व्यजानाच्च तथैवाचरति स्म च ॥
तस्या एवाद्य हृद्ग्रंथिः शिथिलत्वं समाययौ ॥ १४१ ॥

---

१३६ सुलोचनी ती सायव्वा घरीं जाऊन आपण स्वतां त्या स्वामींना पाय धुण्यास पाणी देऊन देवघरांतील पूजासनावर गुरुश्रेष्ठ अशा चन्नबसवाचार्याला प्रेमानें बसविती झाली.

१३७–१३८ तिनें गुरूंची पूजा करण्याकरितां गुरूंच्या समोर आसनावर बसून पत्र, पुष्प, फल इत्यादि सर्व पूजा सामग्री सिद्ध करून घेऊन गुरूंना शरण जाऊन, इतर कोणीकडे मन न जातां केवळ गुरुपूजेकडेच मन घेतलेली, अशी होऊन पद्मासन घालून श्रीगुरूंची पूजा करण्यास सुरवात केली.

१३९–१४० जी स्त्री नवरा मेल्यादिवसांपासून आजपर्यंत आपल्या स्वसामर्थ्यानें चक्षुरादि सर्व इंद्रियें, रूपादि विषयासक्त न होऊं देतां सत्कुलोत्पन्न अशा विधवा स्त्रियांचे आचारच हिचे वागणुकींत होते. भाद्रपद शुद्ध ४ थींच्या चंद्राप्रमाणें जी 'परपुरुषाचें मुखावलोकन,

१४१ हें मोठें पाप आहे' असें समजत असे, व त्याप्रमाणें वागतही असे. अशा त्या जितेंद्रिय सायव्वाची हृदयगांठ यावेळीं दैववशात ढिली झाली.

सारल्यं सात्विकं हित्वा तारल्यं राजसात्मकम् ॥
आददे भावभूयिष्ठं तन्वंग्या नेत्रनीरजम् ॥ १४२ ॥
गंभीरमुद्रामुन्मुच्य मदनोन्मादसूचिकाम् ॥
कां चिन्मुद्रां दधे तस्याश्चार्वंग्या वदनांबुजम् ॥ १४३ ॥
तत्पादपल्लवस्पर्शाद्रोमांचैरंचिता तनुः ॥
उद्भूतकोरकानीककदंबश्रियमावहत् ॥ १४४ ॥
स्वेदशीकरसम्मिश्रं बाहुवल्लीयुगं मृदु ॥
विभ्रमं विदधे तस्याः स्यंदर्दिदुमणिस्रजः ॥ १४५ ॥
कटाक्षाः शरवत्तीक्ष्णा रागक्ष्वेळोपलेपिताः ॥
तन्वंग्या पातिताश्चापि गुरौ वैयर्थ्यमाययुः ॥ १४६ ॥

---

१४२ त्या सूक्ष्मांगी सायव्वाचे डोळे सरळपणा व सात्विकभाव सोडून चंचलत्व व हेतूंनींयुक्त असा रजोभाव धारण करते झाले.

१४३ त्या सुंदरांगीचें मुखकमल गंभीर मुद्रा सोडून मन्मथविकाराचा अतिशयपणा सूचित करणारी, मुद्रा ( चेहरा ) धारण करते झालें

१४४ त्या शिवाचार्यांच्या—पल्लवाप्रमाणें कोमल अशा—पाद स्पर्शानें रोमांचित झालेल्या तिचें शरिरानें— उत्पन्न झालेल्या कळ्यांनींयुक्त अशा— कदंबाच्या झाडाची शोभा धारण केली.

१४५ घामाच्या थेंबांनींयुक्त व मृदु अशा तिच्या वेलाप्रमाणें असलेल्या दोन्ही बाहूंनीं टपकणाऱ्या चंद्रकांत मण्याच्या माळेची शोभा धारण केली होती.

१४६ प्रेमरूपी विषानें लेपलेल्या बाणाप्रमाणें त्या स्त्रीचे तीक्ष्ण असे कटाक्ष श्री गुरूंचे ठिकाणीं पडले असतांही ते व्यर्थ झाले.

तरुण्यास्तीक्ष्णदृक्पातश्चेतसश्चालने गुरोः ॥
अत्यंतदुर्बलो जातो मारुतो भूभृतो यथा ॥ १४७ ॥
स्नानार्थमुध्दृतं क्षीरपात्रं तद्धस्तकंपनात् ॥
पतितं पश्यतां नृणामट्टहासमचीकरत् ॥ १४८ ॥
पुरोहितोक्तमंत्राणामनया पद्मनेत्रया ॥
क्रियमाणोपचाराणां नासीदन्योन्यसंगतिः ॥ १४९ ॥
मन्मथोद्रिक्तचित्तायास्तथाभूतं विचेष्टितम् ॥
पश्यन्नपि चकारास्ये हासं कोपं न संयमी ॥ १५० ॥
कन्यानां बालिशाचाराः क्रियमाणास्तथा पुरः ॥
पितॄणां मानसं मोदमत्तं कुर्वंति नान्यथा ॥ १५१ ॥

---

१४७ त्या तरुणीचे तीक्ष्ण असे कटाक्ष पात– गुरूंचें मन चंचल करण्याविषयीं– पर्वत हालविण्याचे बाबतींत वाऱ्याप्रमाणें अत्यंत असमर्थ झालें.

१४८ अभिषेकाकरितां वर उचललेलें दुधाचे भांड्यानें हात कंपित होत असल्यामुळें खालीं पडल्यानें पाहणाऱ्या लोकांना हंसू उत्पन्न केलें (लोक हंसले)

१४९ पुरोहिताकडून सांगण्यांत येणाऱ्या मंत्रांना व त्या कमलाक्षी सायव्वा करीत असलेल्या उपचारांना परस्पर ताळमेळ मुळींच नव्हता.

१५० मन्मथाच्या विकारयुक्त मनाच्या त्या सायव्वाच्या त्या प्रकारच्या चेष्टा पाहूनही जितेंद्रिय अशा त्या गुरूंनीं स्मित हास्यच केलें. परंतु मुळींच रागावले नाहींत.

१५१ कारण– आपल्यापुढें मुलींचे मुर्खपणामुळें होणारे आचार हे बापाच्या मनाला संतोष व आनंदच उत्पन्न करीत असतात, दुसरे कांहीं उत्पन्न करीत नाहींत.

एवं यथाकथंचित्सा मादनोन्मादगर्हिता ॥
सपर्याकार्यमाचार्यवर्यस्यापूरयत्तदा ॥ १५२ ॥
शिवप्रसादमास्वाद्य स्वीकृतोपायने मुनौ ॥
विवक्षंतीं किमप्येनां हित्वा निर्गंतुमिच्छति ॥ १५३ ॥
तस्यास्तदा जगज्जीर्णमरण्यमभवद्भृशम् ॥
दिशः सर्वास्तमोराशिपूरिता इव रेजिरे ॥ १५४ ॥
धृतिर्नष्टा मतिर्भ्रष्टा विवेकस्तु पलायितः ॥
स्तंभीभूता क्षणं तन्वी किमप्यालिख्य चेतसि ॥ १५५ ॥
भूताविष्टेव धावित्वा गच्छन्तं गुरुपुंगवम् ॥
आलिलिंगातिगाढं तमाकाशमिव मोहिता ॥ १५६ ॥
मुग्धाक्ष्या बाहुपाशेऽस्मिन्महामहिमसागरः ॥
नासीद्गुरूत्तमः साक्षादंतर्धानं जगाम सः ॥ १५७ ॥

---

१५२-१५३ मन्मथाचें वेड लागलेल्या त्या सायव्वानें कसेंतरी करून त्यावेळीं ती गुरुपूजा संपविली नंतर आचार्यांनीं जेवण करून गुरुदक्षणा घेऊन, कांहींतरी सांगण्याचा प्रयत्न करणाऱ्या त्या सायव्वाला सोडून जाण्याकरितां प्रयत्न करीत असतां

१५४ त्यावेळीं तिला हें सर्व जग ओसाड अरण्याप्रमाणें भासूं लागलें दिशा गाढ अंधःकारांनीं भरून गेल्या अशा भासूं लागल्या,

१५५ तिचें धैर्य नाहींसें झालें, तिची बुद्धि भ्रष्ट झाली, विचारशक्ति नाहींशी झाली. थोडा वेळ ती खांबाप्रमाणें स्तब्ध होऊन मनांत कसला तरी विचार करून,

१५६ मोहित झालेल्या त्या सायव्वानें पिशाच्चग्रस्ताप्रमाणें पळत जाऊन त्या जाणाऱ्या गुरु श्रेष्ठांना आकाशाप्रमाणें दृढालिंगन दिलें

१५७ अतिशय महिमाशाली गुरुश्रेष्ठ, त्या सुंदराक्षीच्या बाहुपाशांत सांपडले नाहींत ( ते साक्षात् अंतर्धान पावले )

कामो वामोऽपि लोकेऽस्मिन्नूर्ध्वरेतस्सु योगिषु ॥
नैति स्वाच्छंद्यमीशेन कृतदाहं स्मरन्निव ॥ १५८ ॥
भवंति विषयाणां ते दासा ये चलितेंद्रियाः ॥
जितांतःकरणानां तु विषया यांति दासताम् ॥ १५९ ॥
तनुर्मांसास्थिमेदोभिर्भरिता चर्मभास्त्रिका ॥
इति ज्ञानवतः पुंसः को मोहस्तत्र का रतिः ॥ १६० ॥
सुवर्णवर्णचर्मावच्छन्नं तं पूतिगंधिनम् ॥
कायं को मुह्यति ज्ञानी मलपूर्णं घटं यथा ॥ १६१ ॥
आचार्यस्याद्भुतं श्राव्यं वृत्तांतं ग्रामवासिनः ॥
विदित्वा मठमभ्येत्य प्रणेमुस्तं तपोधनम् ॥ १६२ ॥

---

१५८ "जगांत काम हा वाम [ प्रतिकूल ] असला तरी तो शंकरानें केलेल्या देहदहनाला स्मरूनच कीं काय जितेंद्रिय अशा योग्यांचे ठिकाणीं आपला स्वच्छंदीपणा करीत नाहीं." [ यांचे सारख्यावर त्या मदनाचा कांहींही परिणाम होत नाहीं ]

१५९ ज्यांचीं इंद्रियें चलनवलन करीत असतात, असे लोक विषयांचे दास बनतात, परंतु जितेंद्रियांचे ते विषयच दास होतात.

१६० शरीर हें मांस, हाडें, मेदु वगैरेनीं भरलेली एक कातड्याची पिशवी आहे, असें समजणाऱ्या त्या मनुष्याच्या शरिरामध्यें मोह कुठून येणार, व प्रेम तरी कुठून येणार.

१६१ मलांनीं भरलेल्या घागरीप्रमाणें दुर्गंधयुक्त व सोनेरी रंगाच्या कातड्यानें मढविलेल्या या शरिराविषयीं कोणता ज्ञानी मोहित होईल? [ कोणताही होणार नाहीं.

१६२ आचार्य श्रेष्ठांचा श्राव्य ( ऐकण्यास योग्य ) व आश्चर्यकारक असा वृत्तांत गांवांतील लोकांनीं ऐकून मठाला येऊन तपोनिधी गुरूंना साष्टांग नमस्कार घातला.

स्वामिन् दयानिधे योगिन्नपराधस्तया कृतः ॥
क्षंतव्यो भवता सेयं धर्मपुत्री तव प्रभो ॥ १६३ ॥

मांसखंडमिति ज्ञात्वा वन्हिपिंडं वृकी यथा ॥
तथा त्वामियमाक्रम्य दुःखदुःखाय कल्पिता ॥ १६४ ॥

अजानंती प्रभावं भो तवामानुषमद्भुतम् ॥
वयःप्रतारिता भूत्वा चक्रे चेष्टामनन्विताम् ॥ १६५ ॥

तद्दोषाननुस्मृत्य स्वस्वभावं दयात्मकम् ॥
स्मृत्वैनामव तां लोकोद्धारकार्यविचक्षण ॥ १६६ ॥

साष्टांगं प्रणिपत्येत्थं याचमानान् पुरौकसः ॥
अनुजग्राह तांस्तन्व्या साकमस्तोकधौर्यमी ॥ १६७ ॥

---

१६३ नंतर हे स्वामी, हे दयानिधे, हे योगी, आपण त्या सायव्वा-कडून घडलेल्या अपराधाची क्षमा करावी. कां तर! हे प्रभो, ती तरुणी तुह्मांला धर्ममुलगी नव्हे काय?

१६४ हे स्वामी, लांडगी ही लांब पडलेल्या विस्तवाच्या गोळ्याव तो मांसाचा गोळा समजून झडप घालते त्याप्रमाणें ही सायव्वा सामान्य मनुष्य समजून तुमचेवर पडून स्वतांला अतिशय दुःखित करती झाली.

१६५ हे प्रभो, तुमचे अमानुष व आश्चर्यकारक असें सामर्थ्य न जाणतां वयामुळें [तारुण्यामुळें] फसविली जाऊन तुमचेठिकाणी हिनें असंगत चेष्टा केली.

१६६ हे गुरो, तिचे दोष मनांत न आणतां, दयामय अशा आपल्या स्वभावास स्मरून हे लोकोद्धारकार्य कुशल, तुम्ही इचें रक्षण करा.

१६७ असें म्हणून साष्टांग नमस्कार घालून प्रार्थना करणाऱ्या गांवां-तील लोकांवर त्या सायव्वासह त्या कुशलबुद्धि आचार्यांनीं अनुग्रह केला.

ततः पौराः सुसंतुष्टाः स्वामिनस्तां दयामयीं ॥
मनआर्हां मनोवृत्तिं स्तुवंतः प्रत्यगुर्मठात् ॥ १६८ ॥
ततः प्रभृत्यसौ धीमान् शिवाचार्यवरोत्तमः ॥
भक्तालये स्वभृत्येन कृतं पाकं सुनिर्मलं ॥ १६९ ॥
लिंगार्पणाय गृण्हामि नान्यथेत्यखिलान् प्रति ॥
उक्त्वा भक्तजनोद्धारे यथापूर्वमवर्तत ॥ १७० ॥
सुरांगनाशिरोरत्नरंजितांघ्रिनखावलीं ॥
सर्वमंगलमंजूषां वंदेऽहं सर्वमंगलाम् ॥ १७१ ॥

—❀ इति चतुर्थोऽध्यायः ❀—

---

१६८ नंतर ते गांवांतील लोक अति आनंदित होऊन गुरूंच्या दयाळू, मनास योग्य अशा मनोवृत्तीची स्तुति करीत मठांतून परत गेले.

१६९ त्या दिवसापासून बुद्धिमान् शिवाचार्य श्रेष्ठांनीं "भक्तांच्या घरीं आपल्या सेवकाकडून तयार केलेल्या, निर्मल अन्नाचेंच

१७० लिंगार्पणाकरितां मी ग्रहण करीन, दुसरें कोणाचेही ग्रहण करणार नाहीं" असें सर्व लोकांना कळवून पूर्वीप्रमाणें भक्तोद्धार कार्य करीत राहिले.

१७१ देवस्त्रियांच्या मस्तकावरील रत्नांनीं रंगीत झालेल्या पायांच्या बोटांच्या नखांनींयुक्त सर्व मंगल गुणांचा सांठा अशा त्या सर्वमंगला देवीला माझा नमस्कार असो.

—०: अध्याय ४ था समाप्त. :०—

॥ श्रीरस्तु ॥

ॐनमः पंचजगद्गुरुभ्यः

# श्री. ष. ब्र. चन्नबसव विजय पुराणम्ः



## श्रीरस्तु अथ पंचमोऽध्यायः शिवमस्तु

यत्कंठालिंगनानंदनिमीलन्नयनाऽद्रिजा ॥
विषस्पर्शविमुग्धेव बभौ सोऽव्यात्सदाशिवः ॥ १ ॥
कदाचित्फाल्गुनो मास आविरासीन्महोज्वलः ॥
यो विलासियुवानीकमहोत्सवसुखाकरः ॥ २ ॥
यो दिगंतरसंचारिचंदनाचलबंधुना ॥
वायुनोध्दूतचांपेयरजोरंजितखांतरः ॥ ३ ॥

---

१ ज्या शंकराच्या कंठालिंगनानें उत्पन्न झालेल्या आनंदानें डोळे झांकल्यामुळें जणूं काय कंठांतील विषस्पर्शनानें पार्वती मूर्च्छित झाली की काय ? अशी दिसत होती; असा तो शंकर भक्तांचें रक्षण करो.

२ विलासी तरुणांच्या समूहाला महोत्सवापासून उत्पन्न होणाऱ्या सुखाचें स्थान व महा उज्वल, असा फाल्गुन मास आला.

३ ज्या फल्गुनमासांत दाही दिशांना संचार करणारा, चंदन पर्वतास [ मलयागिरीस ] बंधु असलेला अशा वायूनें वर उडविले गेलेले चाफ्याच्या फुलांतील परागकण आकाशांत प्रकाशत होते.

य आम्रपल्लवास्वादमत्तकोकिलकूजितैः ॥
संप्रोक्तपांथसंदोहप्राणसंदेहवानिव ॥ ४ ॥
प्रभाते शीतलो वातो मध्यान्हे चोष्णतायुतः ॥
सौम्यस्तीक्ष्णगुणः काले राजेवाभाद्धि फाल्गुने ॥ ५ ॥
वैशाख इव नात्युष्णो नातिशीतश्च पौषवत् ॥
जितदेशगतो राजेवासीदादौ च फाल्गुनः ॥ ६ ॥
समाधेरंतरायं संविधातुं विधिचोदितम् ॥
मधोः साहाय्यतां प्राप्य चेष्टमानं मनोभवम् ॥ ७ ॥
कुपित्वा त्र्यंबकः शंभुः फालनेत्रानलार्चिषि ॥
जुहाव फाल्गुने शुक्लपक्षे वै पौर्णिमातिथौ ॥ ८ ॥

---

४ जो फाल्गुन मास, आंब्याच्या झाडांचीं कोंवळीं पानें खाऊन मस्त झालेल्या कोकिल पक्षांच्या आवाजानें जणूं काय—वाटसरूंच्या प्राणासंबंधीं कांहीं विशेष प्रकारचा ( धोक्याचा ) निरोप सांगत आहे—अशा

५ फाल्गुन मासांत सकाळीं थंड व दोनप्रहरीं उष्ण असा वायु कालाला अनुसरून सौम्यता व उग्रपणा या गुणांनीं युक्त अशा राजाप्रमाणें भासत होता.

६ फाल्गुन मास हा आरंभी वैशाख महिन्याप्रमाणें अति उष्ण अथवा पौष मासाप्रमाणें अति थंड ही नाहीं असा अर्थात् जिंकलेल्या देशांत नूतन प्रवेश केलेल्या राजाप्रमाणें ( नवीन जिंकलेल्या देशाची परिस्थिति माहित नसल्यामुळें फार कडक अथवा फार सौम्य नाहीं अशा वृत्तीच्या राजाप्रमाणें ) दिसत होता.

७-८ शंकराच्या योगाचा भंग करण्याकरितां दैवानें प्रेरित होऊन, मित्र असलेल्या वसंताचें सहाय्य मिळवून, चेष्टा करणाऱ्या मन्मथाला, त्रिनेत्री शिवानें फाल्गुन मासांत शुक्लपक्षांतील पौर्णिमा तिथीस भालनेत्राग्नीच्या ज्वालेनें जाळून भस्म केलें.

तद्दिनं स्मारकत्वेन पालयंतीह भारताः ॥
महोत्सवं च कुर्वन्ति यथाकामं समंततः ॥ ९ ॥
समागतं दिनं तद्धि लोकैकानंदहेतुकम् ॥
तदा सुवर्णवल्लीस्था जनाः सर्वे सकौतुकाः । १० ॥
कृत्वा कारिषकाष्ठानां महांतं राशिमद्रिवत् ॥
कामस्य प्रतिमां तत्र निधाय विधिपूर्वकम् ॥ ११ ॥
पुरोहितेन पूतेन कारयामासुरर्चनाम् ॥
पाद्यार्घ्याद्यादिनैवेद्यावसानैरुपचारकैः ॥ १२ ॥
वाद्यानां पटहादीनां ताडितानां रवैर्भृशम् ॥
मुखरास्वखिलाशासु तस्मिन्वन्हिं प्रचिक्षिपुः ॥ १३ ॥
विनिक्षिप्तः क्षणादग्निर्बाणपत्तनवेष्टनात् ॥
जातवासनयेवाशु तद्राशिं व्यानशेऽर्चिषा ॥ १४ ॥

---

९ भरतखंडांत चोहोंकडे तो दिवस स्मारक म्हणून सर्व भारतवासिय ( हिंदुस्थानांतील लोक ) पाळतात, व त्या दिवशीं मनसोक्त महोत्सव करीत असतात.

१०–११ लौकिक लोकांना आनंददायक असा तो पौर्णिमेचा दिवस आला, त्यावेळीं सोलापुरांतील सर्व लोकांनीं मोठ्या उत्साहानें एकत्र जमून, गोवऱ्या व लांकडे यांचा पर्वताप्रमाणें ढीग रचून तेथें कामाची ( मदनाची) प्रतिमा ठेवून त्याची विधिपूर्वक–

१२ पवित्र अशा पुरोहिताकडून पाद्यादिकांपासून तों नैवेद्यापर्यंतच्या सर्व उपचारांनीं पूजा करविली.

१३ हालग्या वगैरे वाद्यांच्या आवाजानें दाही दिशा दणाणून सोडल्या त्याचवेळीं त्याला ( ढिगाला ) पेटविलें.

१४ पेटविलेल्या अग्नीनें जणूं काय? बाणासुराच्या शोणपुर राजधानी भोंवतीं वेष्टिलेल्या संस्कारानें तो गोवऱ्या व लांकडे यांचा ढीग एका क्षणांत ज्वालेनें व्यापून गेला.

उद्गच्छंत्याः परित्रासादग्नेः कामवपुःश्रियः ॥
कबरीव श्लथा धूमराजिराकाशमानशे ॥ १५ ॥
तमालादितरुव्यूहपर्णानामुच्चयैरिव ॥
पयोधरावलीनीलधूमस्तोमैर्विसृत्वरैः ॥ १६ ॥
बंधूककिंशुकादीनां पुष्पाणां स्तबकैरिव ॥
पुंजीभूयोद्गतज्वालाकंदलैर्यावकारुणैः ॥ १७ ॥
तिलकप्रमुखोर्वीजपचेलिमफलावलेः ॥
बीजोत्करायमाणैस्तैः स्फुलिंगैर्विद्रुमप्रभैः ॥ १८ ॥
हरिचंदनभूर्जादिवृक्षाणां वल्कलैरिव ॥
आपाटलैर्विसर्पद्भिरालोकैर्लोकलोकितैः ॥ १९ ॥
नीडवद्भूरुहे षूच्चैर्युध्यत्खगच्छदोद्भवैः ॥
रटनैरिव संप्लोषचट्चटध्वनिभिर्नवैः ॥ २० ॥

---

१५ जणूं अग्नीच्या त्रासामुळें वर उडून जाणाऱ्या मदनाच्या शरीर सौंदर्यरूपी लक्ष्मीचे विखुरलेले केसच कीं काय अशा त्या धुराच्या पंक्तींनीं सर्व आकाश व्यापून टाकलें.

१६ तमालादि वृक्षांच्या पानांच्या समूहाप्रमाणें व मेघाप्रमाणें काळसर अशा चोहोंकडे पसरलेल्या धुरानें

१७ जास्वंदी व पळस यांच्या पुष्पगुच्छांप्रमाणें, व लाखेप्रमाणें तांबडी, अशा समूहानें बाहेर पडणाऱ्या ज्वालांच्या समूहांनीं,

१८ तिलकादि वृक्षांच्या पिकलेल्या फळांच्या बियांप्रमाणें असलेल्या व पोवळ्याप्रमाणें लाल अशा ठिणग्यांनीं,

१९ हरिचंदन व भुजपत्र इत्यादि वृक्षांच्या सालांप्रमाणें असलेल्या तांबूस अशा पसरलेल्या प्रकाशानें,

२० घरटीं असलेल्या झाडांच्या फांदीवर भांडणाऱ्या पक्षांच्या पंखांच्या चटपट आवाजाप्रमाणें होत असलेल्या जळण्यानें उत्पन्न होणाऱ्या नवीन चटचट आवाजांनीं

कारीषराशिमुत्तुंगं सर्वतो व्याप्य संदहन् ॥
मुहूर्तमादधे वन्हिर्वनशोभामनुत्तमाम् ॥ २१ ॥
एवं संदह्यमानेऽस्मिन् कारीषाणां चयेऽग्निना ॥
उत्साहिजनता सम्यक् सानंदं गीतमातनोत् ॥ २२ ॥
मृदंगवेणुवीणादिवादनैस्तज्ज्ञचोदितैः ॥
केचिच्छंभुकृतानंगभंगपद्यानि चोचिरे ॥ २३ ॥
शृंगाररससंपृक्तपद्यान्यन्ये मनोहरम् ॥
हावभावलयैः सम्यग्गायंति स्वोर्जितस्पृहाः ॥ २४ ॥
शृंगाराभासभूयिष्ठां ग्राम्यशब्दकदर्थितां ॥
अश्लीलतासमाजुष्टां केचित्पद्यालिमाजगुः ॥ २५ ॥
यथेच्छं गायतामेवं जनानां नृत्यतां तथा ॥
नालीयत हृदुत्साहो रात्रिरेव व्यलीयत ॥ २६ ॥

---

२१ गोवऱ्यांच्या मोठ्या ढिगाला चोहोंकडे व्यापून जळत असलेल्या त्या अग्नीनें थोडावेळ उत्तम वनाची शोभा दाखविली.

२२ अशा प्रकारें गोवऱ्यांचा ढीग अग्नीनें जळत असतां तो उत्साही जनसमूह आनंदानें उत्तम प्रकारें गात होता-

२३ कांहीं उत्साही लोक वादनपटु अशा लोकांकडून वाजविल्या जाणाऱ्या मृदंग, बासरी, वीणा वगैरे वादनांनीं शिवाच्या कामदहन लीलेचीं पद्यें गात होते.

२४ कांहीं लोक इच्छातिशयानें शृंगाररसांनीं ओतप्रोत हावभावयुक्त अशी गाणीं चांगल्या प्रकारें गात होते.

२५ कांहीं लोक बीभत्स, शृंगारयुक्त व ग्राम्यशद्बांनीं तयार झालेली अश्लील (घाणेरडी, वाईट) गाणीं गात होते.

२६ अशा प्रकारें मनसोक्त गाणीं गाणाऱ्या व नाचणाऱ्या लोकांच्या ठिकाणचा उत्साह कमी झाला नाहीं परंतु रात्रच मात्र कमी झाली. [उजाडलें]

प्रभाते सत्वरं बाला बालिशप्रकृतीरिताः ॥
नानावास्तव्यभागेभ्यः समागत्य समाहिताः ॥ २७ ॥
तत्रत्यं भस्मनिचयं भस्त्रिकायां निधाय तं ॥
गच्छदागच्छतां पुंसामुपरि व्यक्षिपन् भृशम् ॥ २८ ॥
दग्धानंगशरीरस्य भस्मनांऽगविलेपनम् ॥
यथाऽकरोच्छिवस्तद्वद्यूयं कुरुथ किं न हि ॥ २९ ॥
इत्थं हठात्साधुमुग्धान् धृत्वा सजलभस्मना ॥
कृत्वा विलेपनं तेषां हसंतश्चेरुरर्भकाः ॥ ३० ॥
असह्यकृतिमुद्वीक्ष्य गृहांतर्वर्तिनो जनान् ॥
कर्षं कर्षं बहिर्बालाश्चक्रिरे लिप्तकर्दमान् ॥ ३१ ॥
एवमादिविनोदैस्तैरामध्यान्हमतंद्रिताः ॥
बालका धूलिकेलिं तां कलयामासुरादरात् ॥ ३२ ॥

---

२७ सकाळीं मुलें पोरकट स्वभावास अनुसरून निरनिराळ्या वस्तींतून तेथें येऊन जमलीं

२८ व तेथील राख एका पिशवीत घालून येणाऱ्या जाणाऱ्या लोकां-वर टाकूं लागलीं.

२९ मदनाला जाळून त्याचें भस्म शंकरानें सर्वांगास फासून घेतलें त्याप्रमाणें ही राख तुम्ही आपल्या आंगास कां लावून घेत नाहीं ?

३० असें म्हणून तीं मुलें मूढ साधूंना पकडून बलात्कारानें पाणी मिसळलेल्या त्या भस्माचें साधूंच्या सर्वांगास लेपन करून हासत चाललीं

३१ हें बाहेरील असह्य कृत्य न आवडून कांहीं लोक घरांत लपून बसले होते त्यांना बळजबरीनें बाहेर ओढून मुलें त्यांच्या सर्वांगास चिखल फासीत होतीं.

३२ अशा प्रकारच्या चेष्टांनीं दोनप्रहरपर्यंत मुलें न कंटाळतां तो धुळीचा खेळ खेळलीं.

मध्यान्हात्परमत्रत्याः प्रोज्वलद्वेषधारिणः ॥
बहवो युवसंघातास्तद्राजपथमाश्रिताः ॥ ३३ ॥
रक्तपीतादिवर्णांभःपूर्णभांडैर्विराजितम् ॥
बलवद्वृषभोदूढं सुदृढं शकटोत्तमम् ॥ ३४ ॥
समारुह्य समुत्साहा वर्णतोयानि भांडतः ॥
आकृष्य नलिकायंत्राद्विक्षिपुः पथिकोपरि ॥ ३५ ॥
नानावेषधरास्संतस्तालकाललयैस्समम् ॥
नृत्यंतो युवकाश्चेरुस्तत्र तत्र पृथक् पृथक् ॥ ३६ ॥
एवमेव जनास्सर्वे हर्षनिर्भरमानसाः ॥
क्रीडंतो व्यचरंस्तत्र सर्वत्र सखिभिस्सह ॥ ३७ ॥
तदानीं कुत्रचिद्भागे श्रीनिवासाभिधो युवा ॥
मिलितानां स्वमित्राणां पुरतः प्राह सत्वरम् ॥ ३८ ॥

---

३३ नंतर तिसऱ्या प्रहरीं सोलापुरांत असणाऱ्या उत्तम पोषाख केलेल्या अनेक तरुणांनींयुक्त असे संघ राजमार्गाचा आश्रय करून,

३४ तांबड्या पिवळ्या इत्यादि रंगांनीं भरलेल्या भांड्यासह उत्तम बैल जुंपलेल्या मजबूत गाड्यांतून

३५ मोठ्या उत्साहानें भांड्यांतील रंग पिचकारीनें वर ओढून घेऊन रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या लोकांवर टाकीत होते.

३६ कांहीं तरुण लोक नानाप्रकारचा पोषाख करून ताल सुरावर नाचत नाचत निरनिराळ्या अनेक ठिकाणीं फिरत होते.

३७ अशा प्रकारें सर्व लोक आपापल्या मित्रांसह अतिशय आनंदानें खेळत खेळत चोहोंकडे भटकत होते.

३८ त्यावेळीं कोणा एका भागांत श्रीनिवास नांवाच्या एका तरुणानें तेथें जमलेल्या आपल्या मित्रांपुढें अति त्वरेनें असें सांगितलें कीं:—

भो भो मित्राणि सर्वेषां नानावेषेण खेलतां ॥
जनानामपि साश्चर्यं यथा चेतो भविष्यति ॥ ३९ ॥
तथैवास्माभिरत्रत्यैश्छद्मना शवखेलनम् ॥
कर्तव्यमिति तद्वाक्यमंगीचक्रुस्सुहृज्जनाः ॥ ४० ॥
ततः सवयसामेकश्छद्मना कुणपोऽभवत् ॥
वयसा षोडशाब्दीयः कोऽपि तद्भार्यतामगात् ॥ ४१ ॥
के चित्तद्बांधवा जाता दध्वनुः पटहास्तदा ॥
निवेशितशवं चांत्यविमानं समलंकृतम् ॥ ४२ ॥
स्कंधेषु सुविशालेषु केचिदूहुर्दृढांगकाः ॥
पुरो नानाविभागेभ्यश्चागत्य मिलिता जनाः ॥ ४३ ॥

---

३९ हे मित्र हो, अनेक प्रकारचे वेष धारण करून खेळणाऱ्या सर्व लोकांच्या मनाला आश्चर्य वाटण्यासारखें

४० आपणही, एथें एक मेलेल्या माणसाचें [ प्रेताचें ] सोंग घेऊं. असें वाक्य ऐकून मित्रांनीं तात्काळ त्याला संमति दिली.

४१ नंतर त्या मित्रांपैकीं एकानें प्रेताचें सोंग घेतलें, व १६ वर्षांच्या एका तरुणानें त्याच्या बायकोचें सोंग घेतलें,

४२ व कांहीं त्या प्रेताचे आप्तजन झाले. त्यावेळीं तेथें हालग्यांचा ध्वनी झाला [ हालग्या वाजूं लागल्या ] श्रृंगारिलेल्या शेवटच्या विमानांत तें प्रेत ठेवून,

४३ कांहीं शक्तिमान् लोकांनीं आपल्या बळकट खांद्यावर तें विमान घेतलें नंतर अनेक विभागांतून त्या प्रेतयात्रेकरितां पुष्कळ लोक जमले

निरगात्तत्स्थलं हित्वा शवयात्रा सुसाज्जिता ॥
अयि प्राणपते कांत तनुच्छायामिव स्थिताम् ॥ ४४ ॥
मां धर्मचारिणीं त्यक्त्वा कथं त्वं गंतुमीहसे ॥
आवयोः सुंदरं योगं रतिमन्मथयोरिव ॥ ४५ ॥
निर्दयं दैवमत्यंतं न शशाक समीक्षितुम् ॥
नाथ त्वत्कृतचाटूनि स्मृतानि वचनानि मे ॥ ४६ ॥
दहंति नितरां देहं भिंदंति हृदयं प्रिय ॥
हा नाथ हा मम प्राण हा हा मंगलदैवत ॥ ४७ ॥
असति त्वयि जीवामि कथं ज्योत्स्नेव शीतगौ ॥
किं करोमि क्व गच्छामि को वा शरणतां व्रजेत् ॥ ४८ ॥

---

४४–४५ नंतर उत्तम रीतीनें सज्ज झालेली ती प्रेतयात्रा तेथून पुढें चालू लागली. हे प्राणपति, कांत, शरिराच्या सावलीप्रमाणें नेहमीं मिळून राहणारी, व धर्मचारिणी (पत्नि) अशा मला सोडून जाण्याची तुला कशी इच्छा झाली? रति मन्मथाप्रमाणें आपणां दोघांचा सुंदर अशा संबंध

४६ निर्दय असें दैव पाहूं शकलें नाहीं. हे नाथ, तुझ्याकडून म्हटल्या गेलेल्या प्रेम व हास्यकारक अशा भाषणांचीं आठवण केल्यास,

४७ तीं भाषणें माझ्या शरिराला जाळून टाकताहेत. हे प्रिया, माझें अंतःकरणाला भेगा पाडताहेत, हे नाथ, हे माझ्या जिवलगा, हा! हा!! माझ्या मंगल दैवता,

४८ चंद्राचे अभावी चांदण्याप्रमाणें मी तुजवांचून कशी जिवंत राहूं शकेन! मी काय करूं! कोठें जाऊं! माझें कोण रक्षण करूं शकेल?

पश्यामि च जगत्कृत्स्नं जीर्णारण्यमिवाधुना ॥
क्रोशंती कुररीवेयमश्रुसिक्तपयोधरा ॥ ४९ ॥
पश्यत्पौरांगनाचेतश्छिदंतीवाऽऽर्तनिस्वनैः ॥
अन्वगात्कैतवाब्जाक्षी पतिं सत्यसतीव सा ॥ ५० ॥
दृष्ट्वा स्मशानयात्रां तां प्रासादस्थांगनाजनाः ॥
कोऽयं व्यसुर्युवा कस्य तनूजातो भवेन्नु ॥ ५१ ॥
अहहाऽपूर्वलावण्यशालिनी हरिणेक्षणा ॥
नूतने वयसीत्थं हा वैधव्यार्हा भवेदिति ॥ ५२ ॥
निर्दयो विधिरप्यस्या ललाटे तिलकोचिते ॥
दुर्लिपिश्रेणिमलिखत्कथं त्रुट्यतु तत्करः ॥ ५३ ॥
इत्थं दुःखाग्निसंतापाद्द्रुतहृद्द्रवपाथसः ॥
धाराभिः प्लावयामासुरश्रूणां छद्मना भुवम् ॥ ५४ ॥

---

४९ आतां मला हें जग सर्व ओसाड अरण्याप्रमाणें भासत आहे. अशा प्रकारें कुररि ( एक प्रकारच्या ) पक्षाप्रमाणें आक्रोश करणारी, डोळ्यांतील पाण्यांनीं भिजलेल्या कुचाची ( स्तनाची ),

५० या आक्रोशानें गांवांतील इतर पाहणाऱ्या स्त्रियांचे मनाचा भंग करणारी ती (स्त्री सोंगधारी) खऱ्या स्त्रीप्रमाणें पतीच्या प्रेतामागून जाऊं लागली.

५१ ती प्रेतयात्रा पाहून माळवंदावर, माडीवर असलेल्या स्त्रिया "मेलेला कोण ? हा कोणाचा मुलगा ?

५२ अहाहा ! नूतन सौंदर्ययुक्त हरिणाक्षी अशी ही तरुण स्त्री, या नव तारुण्यांतच विधवा व्हावी म्हणून,

५३ निर्दय अशा ब्रह्म्यानें कुंकुमतिलकास योग्य अशा इचे कपाळावर वाईट अक्षरांची ओळ कशी लिहिली ? त्याचा हात तुटून पडो !"

५४ अशा प्रकारें दुःखाग्नीच्या तापानें वितळलेल्या हृदयद्रवाच्या पाण्याच्या धारांनीं डोळ्यांतील अश्रूंच्या मिशानें जमीन भिजवून टाकली.

तथैव पुरुषाश्चापि निनिंदुर्दैवमेव तत् ॥
यथार्थं शवयात्रेति प्रायशः पथि पश्यतां ॥ ५५ ॥
जनानां बुद्धिरासीत्सा रचना तादृशी किल ॥
एवं वीथ्यां च वीथ्यां च प्रेक्षकाणां पुरौकसाम् ॥ ५६ ॥
कैश्चित्सुश्लाघिता कैश्चित्कृतहासाऽनुशोचिता ॥
कपटव्यसुयात्रा सा जनस्तोमसमन्विता ॥ ५७ ॥
आजगाम क्रमेणासौ यत्र योगीश्वरोऽवसत् ॥
शांताकारः शिवानंदसुधासंतृप्तमानसः ॥ ५८ ॥
प्रसर्पच्छैवतेजोभिर्दीप्तदेहः शिवव्रती ॥
सोऽयं श्रीचन्ननंदीशः शिवाचार्यशिखामणिः ॥ ५९ ॥
स्वग्रामं गंतुचेताः सन् यावद्रथ्यामुपागमत् ॥
तावत्सम्मुखमायांतं शवयात्रामहोत्सवम् ॥ ६० ॥

---

५५-५६ तसेंच, पुरुषांनींही दैवाला अतिशय दोष दिला. वाटेंत प्रेतयात्रा पाहणाऱ्या लोकांची बुद्धि ' ही प्रेतयात्रा खरी आहे ' अशी पुष्कळ अंशांनीं समजत होती. कारण, तशा प्रकारची रचना झाली होती. अशा प्रकारें प्रत्येक रस्त्यांत पाहणाऱ्या रहिवाशांतील,

५७ कांहीं लोकांनीं त्या यात्रेची प्रशंसा केली, तर कांहींनीं तिरस्कार केला, तर कांहींनीं दुःख केलें, अशा प्रकारें तें प्रेत यात्रेचें सोंग पुष्कळ लोकांच्या जमावानें येत येत,

५८ ज्या ठिकाणीं शांतस्थिति, शिवानंद रूपी अमृताच्या पान करण्यानें झालेल्या आनंदी मनाचा योगीश्वर रहात होता तेथें आलें.

५९ प्रसरणशील अशा शिवतेजानें प्रकाशमान् देहाचा शिवाचार्य, शिवाचार्य शिखामणी, असा तो हा चन्नबसव स्वामी

६० आपल्या गांवास जाण्याचा बेत करून जेव्हां त्या रस्त्यांत आला इतक्यांत आपल्या समोर येत असलेला प्रेतयात्रा--महोत्सव

दृष्ट्वा तन्मार्गपार्श्वे श्रीरेणुकालयसन्निधौ ॥
स जोषं तस्थिवानासीज्जनवृत्तिं विलोकयन् ॥ ६१ ॥
अथ यात्रास्थिताः केचिदप्रगल्भाशया जनाः ॥
तडिद्वंतं शरन्मेघमिव गौरकलेवरम् ॥ ६२ ॥
जटाच्छटाभिरामं तं काषायांबरकैतवात् ॥
अमात्वांतर्बहिर्यातब्रह्मतेजोऽभिवेष्टितम् ॥ ६३ ॥
अमानुषप्रभावं श्रीशिवाचार्यमवेक्ष्य ते ॥
निंद्यव्यापारनिष्णाताः कुचेष्टां कर्तुमुद्यताः ॥ ६४ ॥
काचकांचनयोर्भेदं कथं जानंति मर्कटाः ॥
दांभिका जंगमा भांति दिवा वेषेण साधवः ॥ ६५ ॥
विटवेषधरा रात्रौ वेश्यानां यांति दासताम् ॥
आत्मनाऽज्ञातमप्येते वेदांतं विधवाजने ॥ ६६ ॥

---

६१ पाहून त्या रस्त्याच्या बाजूला असलेल्या श्री रेवणसिद्धेश्वराच्या देवळाजवळ लोकांची हालचाल पहात स्वस्थ उभा राहिला.

६२ नंतर त्या यात्रेंतील कांहीं दुष्ट माणसांनीं वीजयुक्त शरत्कालीन मेघांप्रमाणें गौरवर्णी,

६३ जटांनीं मनोहर, भगव्या वस्त्राच्या मिषानें जणूं काय अंतःकरणांत न सांठविलें गेल्यामुळें बाहेर आलेल्यां ब्रह्म तेजानें सर्वांगास वेष्टिलेल्या,

६४ अमानुषप्रभावी अशा शिवाचार्यांना पाहून निंद्य व्यापारांत कुशल असे ते लोक त्यांची कुचेष्टा करण्यास प्रवृत्त झाले.

६५ कारण– 'माकडांना कांच व सोनें यांतील भेद कसा समजूं शकेल ?' [ मुळींच समजणार नाहीं ] ढोंगी जंगम दिवसा वेषानें सज्जनाप्रमाणें दिसतात.

६६ तेच रात्रीं विट (जार) वेष धारण करून वेश्या स्त्रियांचे दास बनतात. हे धूर्त जंगम आपण स्वतां वेदांत न जाणणारे असले तरी विधवा लोकांत,

मित्थ्यैव बोधयंतस्तं पातयंत्यसुखानले ॥
तापसा इति मंत्रज्ञा वयं स्वामिन इत्यपि ॥ ६७ ॥
बहुवेषधरा धूर्ता हरंति धनिनां धनम् ॥
औषधच्छद्मना मंत्रव्याजेन शकुनेन वा ॥ ६८ ॥
यंत्रबंधकलाभिर्वा वंचयंति वधूजनान् ॥
तादृशोऽयं जटाधारी काषायवस्त्रेनोज्वलः ॥ ६९ ॥
कैलासादागतः शंभुरिवात्याभाति दांभिकः ॥
अत एव वयं गत्वा पृच्छामः प्रश्नमुत्तमम् ॥ ७० ॥
किं वदिष्यति पश्यामो विनोदस्तु भविष्यति ॥
इत्युक्त्वा धूर्तदुर्वृत्तास्समुपेत्य तपोधनम् ॥ ७१ ॥
भो भो तपस्विवेषाढ्य त्रिकालज्ञ इवेक्ष्यसे ॥
तादृशी ज्ञानसंपत्तिरस्ति चेत्त्वयि तापस ॥ ७२ ॥

---

६७-६८ कांहीं तरी खोट्याच वेदांताचा उपदेश करून त्या लोकांना दुःखाग्नींत लोटतात. निरनिराळे वेष धारण करणारे हे धूर्त जंगम लोक आह्मी तपस्वी आहोंत, आह्मी मंत्र जाणणारे आहोंत, आह्मी स्वामी आहोंत असें सांगून श्रीमंतापासून द्रव्य लुटतात, व औषधाचे मिशानें, शकुनानें व मंत्राच्या मिशानेंही श्रीमंतांचें द्रव्य लुटतात.

६९ यंत्र बांधण्याच्या कलांनीं कित्येक स्त्रियांना फसवितात, त्याप्रमाणें हा जटाधारी व उज्वल भगवी वस्त्रें परिधान केलेला जंगमही त्यांपैकींच एक आहे.

७० हा ढोंगी, कैलासाहून उतरलेला शंकरच कीं काय! असा दिसतो. म्हणून आपणही त्याचे जवळ जाऊन उत्तम प्रकारचा एक प्रश्न विचारूं.

७१ तो काय सांगतो तें पाहूं या तर खरें. शेवटीं विनोद तर होईल असें म्हणून ते दुष्ट धूर्त लोक तपोनिधी अशा गुरुवर्यांचे जवळ जाऊन

७२ अहो! अहो! तपस्वी, वेषधारी, तूं त्रिकाल ज्ञान्याप्रमाणें दिसतोस. हे तपस्वी, तशा प्रकारची ज्ञानसंपत्ति तुजजवळ असल्यास

वदास्माभिरिदानीं यत्कृत्वा निर्यासितो महान् ॥
उत्सवः पत्तने साधो तत्तथा ह्यथवाऽन्यथा ॥ ७३ ॥

इत्युक्तो मुनिशार्दूलो मूर्खाणामात्मघातुकी ॥
अन्यावहेळिका चातो नोपेक्ष्या वृत्तिरीदृशी ॥ ७४ ॥

इत्यालोच्य व्रती चाह मंदस्मितमुखांबुजः ॥
तदन्यथा कथं वा स्याद्युष्माभिः साधुभिः कृतम् ॥ ७५ ॥

इत्युक्तवंतमाचार्यमुपहस्यापभाषितैः ॥
निंदंतो निरगुर्यात्राजनैः साकं ततो व्रती ॥ ७६ ॥

सशिष्यः स्वपुरं प्राप्य मठे तस्थौ यथा पुरा ॥
इतः शवमहायात्रा पत्तने सर्ववीधिषु ॥ ७७ ॥

---

७३ सांग. आम्ही आतां जें कांहीं करून मोठा समारंभ या गांवांत काढला आहे तें खरें आहे कीं कसें ?

७४ अशा प्रकारचें भाषण ऐकलेला तो मुनिश्रेष्ठः— आत्मघातकी अशी मूर्खांची वागणूक ही दुसऱ्यांचा तिरस्कार करणारी आहे यामुळें हा मुर्खांचा व्यापार उपेक्षिण्यास योग्य नाहीं.

७५ याप्रमाणें स्वतांशीं विचार करून त्या मुनीश्रेष्ठानें स्मितहास्ययुक्त मुद्रेनें सांगितलें, आपल्या सारख्या साधूंकडून झालेलें तें कार्य निराळें कसें होईल. ( शवयात्रा ही खरी आहे )

७६ याप्रमाणें सांगणाऱ्या त्या आचार्यांचा वेड्यावाकड्या भाषणानें अपमान करून ते आलेल्या प्रेतयात्रेच्या लोकांसह पुढें निघून गेले नंतर तो शिवयोगी

७७ आपल्या शिष्यांसह आपल्या गांवास ( होटगीस ) जाऊन वृहन्मठांत पूर्वींप्रमाणें सुखानें वास करूं लागला. इकडे शवयात्रा शहरांतील सर्व रस्त्यांनीं

कृत्वा संचारमासायं स्वस्थानमगमत्ततः ॥
तत्तद्वेषं विसृज्यांभःप्रक्षालितमुखांबुजाः ॥ ७८ ॥
ते वेषधारिणः सर्वे पूर्ववस्त्राण्यधारयन् ॥
शववेषधरस्तावन्नोत्थितो न चचाल सः ॥ ७९ ॥
सत्यं शवत्वमापन्नो विमाने तस्थिवानभूत् ॥
किं नागतोऽयमित्युक्त्वा सवर्ग्याः समुपेत्य वै ॥ ८० ॥
उत्तिष्ठाऽऽगच्छ संध्याऽभून्नेक्षसे किं न भाषसे ॥
इत्युक्त्वा चालयंतस्तं दृष्ट्वाऽनायातचेतनम् ॥ ८१ ॥
मृतोऽयं सत्यमेवेति ज्ञात्वा सवयसस्तदा ॥
मुखानींगालभंगस्य सवर्णत्वं समानयन् ॥ ८२ ॥
दुर्नीतिरवसाने हि दुरासदविपत्प्रदा ॥
अकस्मादापदस्माकं कथमापतिता किल ॥ ८३ ॥

---

७८–७९ सायंकालपर्यंत फिरून पुन्हां पूर्वस्थळीं ( निघालेल्या ठिकाणीं ) आली. नंतर सर्व वेषधाऱ्यांनीं आपापला वेष टाकून पाण्यानें आपापलीं तोंडें धुऊन आपलीं पूर्वींचीं वस्त्रें घातलीं. परंतु प्रेताचा वेष धारण करणारा तो तरुण विमानांतून उठला नाहीं व हाललाही नाहीं.

८० तो खरोखरच प्रेतच झाला होता! म्हणून तो विमानांत जशाचा तसाच राहिला होता. त्याचे मित्रांनीं हा प्रेत वेष धारण करणारा अद्याप कां आला नाहीं? म्हणून त्याचेजवळ येऊन.

८१ अरे मित्रा, ऊठ. ये. संध्याकाळ झालेला आहे कां पहात नाहींस? आमच्या बरोबर तूं कां बोलत नाहींस? असें म्हणून त्याला हालविलें, तरीही जागा न झालेला पाहून

८२ हा खरोखरच मरण पावला आहे. असें समजून त्या मित्रांचीं तोंडें तेव्हां कोळशाच्या तुकड्याप्रमाणें काळी ठिक्कर पडलीं. [ दुःखामुळें ]

८३ कां म्हणाल तर 'अनीतीचा परिणाम हा शेवटीं असह्य स्थिति प्राप्त करून देणारा होतो.' आमच्यावर हें संकट अकस्मात् कसें आलें?

इति चिंतासरिन्मग्ना अभवन् मुनिदूषकाः ॥
मृतिवार्तामुपश्रुत्य जननीजनकादयः ॥ ८४ ॥
बांधवा मंदिरादेत्य दृष्ट्वा मृतकलेवरम् ॥
दुःखाग्निदह्यमानांतरंगा आलिंग्य तं मृतम् ॥ ८५ ॥
उच्चैराक्रुश्य चाक्रुश्य रोदनं चक्रुरक्रमम् ॥
हा वत्स हा मदुत्संगसंगोपनविवर्धित ॥ ८६ ॥
हा प्रीतिवल्लरीमूलकंद कुत्राऽसि मे वद ॥
कुलांकुरस्त्वमेवासीस्त्वयि नष्टे दिवं गताः ॥ ८७ ॥
पितरः क्षुत्तृडार्तास्ते क्लिश्नीयुस्सततं बत ॥
त्वदुत्संगतलोचांसमहेतुस्मितसुंदरम् ॥ ८८ ॥

---

८४ याप्रमाणें ते, मुनीला दोष देणारे लोक चिंतारूपी नदींत बुडाले. मरणाची हकिकत ऐकून त्या तरुणाचे आई-बाप वगैरे,

८५ आप्तेष्ट मंडळींनीं घरून तेथें येऊन मृतशरीर पाहून, दुःखाग्नीनें तप्त होऊन, त्या मृतशरिराला आलिंगन देऊन;

८६ मोठ्यानें ओरडून आक्रोश चालविला, त्यावेळीं आईः— हे मुला, माझ्या मांडीवर पोसून वाढलेल्या,

८७ अहा! प्रेमवल्लीला मूळ होऊन राहिलेला असा तूं कोठें आहेस? माझेबरोबर दोन शद्ब तरी बोल! तूं माझा कुलांकुर होऊन राहिला आहेस. तुझ्या मरणामुळें स्वर्गांतील.

८८ तुझा पितृगण भुकेनें व तहानेनें पीडित होऊन, नेहमीं दुःखी होईल. तुझ्या मांडीला अलंकारित करणारा, (मांडीवर बसणारा) कारण नसतांहीं नेहमीं हसत मुख असणारा,

पुत्रमीक्षे कदेत्याशावल्ली दैवेन संहृता ॥
वार्धके सुखिनौ स्याव पुत्रेणानेन धीमता ॥ ८९ ॥
इतीच्छा चावयोर्वत्स जातैव मृगतृष्णिका ॥
किं करोमि क्व गच्छामि केनोपायेन मे सुतः ॥ ९० ॥
जीविष्यति जना यूयं कृपया वदताऽधुना ॥
इत्युरस्ताडनं कृत्वा प्रलपंतीं प्रसूं तदा ॥ ९१ ॥
प्रसमीक्ष्य पुरंध्रीणां स्तोमोऽत्यंतं रुरोद सः ॥
अनिमित्तमयं मृत्युः कथमस्यागतो भवेत् ॥ ९२ ॥
इत्थं परस्परं तेषु पृच्छत्सु पुरुषेषु वै ॥
शवयात्रास्थितैः कैश्चित्तरुणैः कारणं विना ॥ ९३ ॥
परिभूतस्य पट्टाधिकारिणस्तपसां निधेः ॥
वाङ्माहात्म्यं तथाभूतं निमित्तं स्यान्न चान्यथा ॥ ९४ ॥

---

८९ अशा मुलाला मी केव्हां पाहीन? अशा प्रकारची आशावेल दैवानें तोडली गेली. आम्ही दोघे [ आई, बाप ] म्हातारपणीं बुद्धिवान् अशा या मुलाकडून सुखी होऊं,

९० अशी आम्हा दोघांची इच्छा, हे मुला, मृगजलाप्रमाणें खोटी ठरली. मी काय करूं? मी कोठें जाऊं? अथवा कोणत्या उपायानें माझा मुलगा,

९१ जिवंत होईल. हे जन हो,! मला आतां हें कृपा करून सांगा, अशा प्रकारें वक्षस्थळ ( छाती ) बडवून रडणाऱ्या त्या आईला

९२ पाहून. तेथें जमलेला स्त्री समूहसुद्धां अतिशय मोठ्यानें रडूं लागला. कांहीं कारण नसतां या मुलाला आतां हें मरण कसें प्राप्त झालें.

९३–९४ अशाप्रकारें तेथें जमलेली पुरुष मंडळी एकमेकांत विचारपूस करीत असतां त्या प्रेत यात्रेंतील कांहीं तरुणांनीं कांहीं कारण नसतां तिरस्कारिला गेलेला तपोनिधि अशा पट्टाधिकारी चन्नबसव स्वामींचें तें तशा प्रकारचें भाषण या मुलाच्या मरणाला कारणीभूत झालेलें आहे, दुसरें कांहीं नाहीं.

इत्युक्तामुक्तिमाकर्ण्य के चित्तत्रत्यपूरुषाः ॥
बाढमित्युररीकृत्य बांधवानिदमब्रुवन् ॥ ९५ ॥
सर्वे वयं मिलित्वाऽथ होट्टिगिग्राममुत्तमम् ॥
गत्वा तस्य शरण्यस्य शिवाचार्यस्य धीमतः ॥ ९६ ॥
पादपाथोजयुगलं व्रजामः शरणं शिवम् ॥
नान्यथा गतिरस्माकं विद्यते परमार्थदा ॥ ९७ ॥
भूमौ स्खलितपादानां भूमिरेवावलंबनम् ॥
इत्युक्त्वा प्रातरुत्थाय शवमादाय सत्वरम् ॥ ९८ ॥
ययुस्सर्वे जनाः साप्ता यत्रास्ते तापसोत्तमः ॥
शापानुग्रहशक्तः श्रीचन्ननंदी शिवव्रती ॥ ९९ ॥

---

९५ अशाप्रकारें सांगितलेली गोष्ट ऐकून त्या ठिकाणीं असलेल्या कांहीं पुरुषांनीं हें खरें असेल असें ह्मणून तें ह्मणणें सत्य मानून, प्रेताच्या आप्तेष्टांस सांगितलें कीं:—

९६–९७ आह्मी सर्वजण मिळून होटगी गांवीं जाऊन बुद्धिमान् शरण आलेल्यांचें रक्षण करणारा, अशा त्या शिवाचार्य श्रेष्ठांचे पदकमलीं शरण जाऊं. विचार करून पाहतां परमार्थ देणारा असा हा उपाय सोडून आह्मांला खरोखर दुसरा उपायच नाहीं

९८ भूमीवर पाय निसरून पडलेल्या भूमीखेरीज दुसरा आधार नाहीं. (आपण ज्याचा अपराध केलेला असतो त्याचीच क्षमा मागणें इष्ट आहे.) असें सांगून प्रातःकाळीं उठून तें प्रेत बरोबर घेऊन लौकर

९९ आप्तेष्टांसह ते लोक जेथें आतिशय तपस्वी, शाप व अनुग्रह करण्यास समर्थ, शिवव्रती असें चन्नबसव स्वामी रहात होते. तेथें गेले.

समुपेत्य गुरोस्तस्य शिवाचार्यस्य सन्निधिम् ॥
साष्टांगं प्रणिपत्याथ तुस्तुवुर्बद्धभक्तयः ॥
मस्तकन्यस्तहस्ताब्जसंपुटाः पटुबुद्धयः ॥ १०० ॥ (वृत्तम्)

शिवस्वरूपाय सुखात्मकाय शमप्रधानाय शुभावहाय ॥
श्रीचन्ननंदीश नमो नमस्ते दुःखार्णवादुद्धर
कामममस्मान् ॥ १०१ ॥

कृपाऽमृताप्यायितसज्जनाय कृतारिषड्वर्गजयाय देव ॥
श्रीचन्ननंदीश नमो नमस्ते दुःखार्णवादुद्धर
कामममस्मान् ॥ १०२ ॥

पादार्पणात्पावितभूतलाय पापावलीदावदवानलाय ॥
श्रीचन्ननंदीश नमो नमस्ते दुःखार्णवादुद्धर
कामममस्मान् ॥ १०३ ॥

---

१०० त्या गुरूत्तमाचेजवळ जाऊन पदकमलांला साष्टांग नमस्कार करून, हात जोडून, तीक्ष्णबुद्धि असे ते लोक भक्तियुक्त होऊन त्या स्वामींची स्तुति करूं लागले.

१०१ शिवस्वरूपी, सुखस्वरूपी, शांतिप्रधान, लोक कल्याण करणाऱ्या अशा चन्नबसव स्वामी, तुला आमचा नमस्कार असो. दुःख समुद्रांतून आमचा उद्धार कर

१०२ सज्जनांना कृपारुपी अमृतांचें पान करविणाऱ्या, षड्रिपु जिंकलेल्या देवा, चन्नबसवा, तुला नमस्कार असो ? दुःख समुद्रांतून आमचा उद्धार कर.

१०३ पादस्पर्शानें भूमीला पावित्र्य आणणाऱ्या, पापसमूहरूपी अरण्याला दावाग्नी झालेल्या हे गुरो चन्नबसवा, तुला नमस्कार असो ? दुःख समुद्रांतून तूं आमचा उद्धार कर.

शापायुधायापदपायकर्त्रे स्वोपाश्रितानेकजनालिभर्त्रे ॥
श्रीचन्द्रनंदीश नमो नमस्ते दुःखार्णवादुद्धर
कामस्मान् ॥ १०४ ॥

सद्भिः सदोषःस्मरणीयनाम्ने शुभंयुसत्यादिगुणौघधाम्ने ॥
श्रीचन्द्रनंदीश नमो नमस्ते दुःखार्णवादुद्धर
कामस्मान् ॥ १०५ ॥

आचार्यवर्य भवतो विश्रुतामबुध्वा पापैरपेतमतिभिर्विहितं
यदागः ॥
तद्धीमता नु भवता कृपया महेश क्षंतव्यमित्यनुपदं
शरणं गताः स्मः ॥ १०६ ॥

शिवे रुष्टे गुरुस्त्राता गुरौ रुष्टे न कश्चन ॥
अतो देशिकरत्न त्वमस्मासु करुणां कुरु ॥ १०७ ॥

---

१०४ शाप हेंच ज्याचें आयुष्य आहे, पापाचा नाश करणाऱ्या, आश्रयास आलेल्या अनेक लोकांचें रक्षण करणाऱ्या अशा चन्द्रनसवा, तुज आमचा नमस्कार असो ! दुःख समुद्रांतून तूं आमचा उद्धार कर.

१०५ सज्जनांकडून प्रातःकालीं नेहमीं उच्चार करण्यास योग्य अशा नांवाच्या, शुभकर अशा सत्यादि गुणांचें स्थान अशा चन्द्रनसवेश्वरा, तुला आमचा नमस्कार असो. दुःख समुद्रांतून आमचा तूं उद्धार कर.

१०६ हे आचार्य श्रेष्ठा, आपलें सामर्थ्य न समजून पापी व मूर्ख अशा या लोकांकडून घडलेल्या अपराधाची हे महेशा, बुद्धिवान् अशा तुह्मीं कृपेनें क्षमा करावी. हें उमगतांच आह्मीं शरण आलों आहोंत

१०७ शिव शिष्यावर रागावला असतांही गुरु त्या शिष्याचें संरक्षण करीत असतो. परंतु शिष्यावर गुरूंचाच क्षोभ झाल्यास तेथें त्या शिष्याचें कोणीही संरक्षण करूं शकत नाहीं. करितां हे गुरुश्रेष्ठा, तूं आह्मांवर कृपा कर.

पुत्रैः कृतापराधस्य पिता क्षंता न चापरः ॥
पितुरप्यधिकोऽस्माकं भवान् क्षंतुमतोऽर्हसि ॥ १०८ ॥

इत्थं दैन्यमुपाश्रित्य क्षमायाचनतत्परान् ॥
अश्रुधाराभिषिक्तांगान् सबांधवजनान् गुरुः ॥ १०९ ॥

दृष्ट्वा कृपासुधासारशांतकोपानलो मुनिः ॥
कमंडलुजलेनार्द्रं कृत्वा भस्म भवापहम् ॥ ११० ॥

यदा लिलेप तद्भूत्या प्रेतगात्रं शिवं स्मरन् ॥
तदा प्रत्यागतप्राणो निद्राबुद्ध इवोत्थितः ॥ १११ ॥

---

१०८-१०९ मुलानें केलेल्या अपराधाची बापच क्षमा करतो, इतरांकडून ती होऊं शकत नाहीं. म्हणून हे गुरो, तूं आम्हांला बापापेक्षांही श्रेष्ठ असल्यामुळें आमचे अपराध क्षमा करण्यास तूंच योग्य आहेस. अशा प्रकारें करुणा वाणीनें क्षमा मागणाऱ्या, व नेत्रांतील पाण्यानें ज्यांचें आंग भिजून गेलें आहे अशा आप्तेष्टांसह असलेल्या लोकांना गुरूंनीं

११० पाहून कृपारूपी अमृतरसानें ज्याचा कोपाग्नी शांत झाला आहे, असा मुनीश्रेष्ठ, आपल्या कमंडलूंतील पाण्यानें संसाराचा नाश करणारें भस्म भिजवून, त्याचें

१११ शिव स्मरण करीत– जेव्हां त्या प्रेताचें सर्वांगास लेपन केलें, त्यावेळीं तो झोंपेंतूनच जागा होऊन उठला कीं काय? असा जिवंत होऊन उठला.

प्रत्यासन्नासुमेतं तं युवानं वीक्ष्य ते जनाः ॥
सोऽयमाचार्यवर्यस्तु भक्तानुद्धर्तुमानसः ॥ ११२ ॥
कैलासाद्भुवमायात आस्ते शंभुरिवापरः ॥
विहाय सर्पभूषां च तार्तीयीकं च लोचनम् ॥ ११३ ॥
धृताचार्यशरीरः सन्नागतः शिव एव सः ॥
नोचेदमानुषं कर्म करोति कथमीदृशम् ॥ ११४ ॥
मत्तमातंगकुंभघ्नः केसरी नहि जंबुकः ॥
महामहिमपाथोधिं शीतदीधितितेजसम् ॥ ११५ ॥
मुनिं पश्यंति ये भक्त्या त एव सफलोदयाः ॥
जन्मांतरकृतानेकपुण्यवत्त्वं शरीरिणाम् ॥ ११६ ॥
सूचयत्यघविध्वंसि साधूनां दर्शनं भुवि ॥
वयं धन्या वयं धन्या इत्यानंदवशंवदाः ॥ ११७ ॥

---

११२-११३-११४ त्या लोकांनीं जिवंत झालेल्या त्या तरुणाला पाहून ह्मटलें तो हा आचार्य श्रेष्ठ भक्तांचा उद्धार करण्याकरितां कैलासाहून प्रत्यक्ष शंकरच अवतार घेऊन आला आहे, सर्प भूषण, व तृतीय नेत्र सोडून आचार्यांचें शरीर धारण करून शंकरच आला आहे. तसें झालें नसल्यास हा अशा प्रकारचें अमानुष कर्म कसा करूं शकेल ?

११५ अतिशय मस्त अशा हत्तींचें गंडस्थळ फोडणारा तो सिंहच होय, कोल्हा नव्हे. अति महिमासागर, चंद्राप्रमाणें आनंदकारक असें तेज असलेला.

११६-११७ अशा मुनीला भक्तिभावानें जे पाहतात त्यांचेंच जीवित सफल होय, पापांचा नाश करणाऱ्या सज्जनांचें दर्शन हें अनेक जन्मांतील केलेल्या पुण्याचें सूचक आहे. आह्मी धन्य ! आह्मी धन्य !! असें ह्मणून लोक आनंदित होऊन,

शशंसुः पुण्यचारित्र्यं चन्ननंदिगुरूत्तमम् ॥
पश्यत्सु पुरुषेष्वेकस्तज्ज्ञस्तानिदमब्रवीत् ॥ ११८ ॥
मदांधा मूर्खमूर्धन्याः परोत्कर्षासहिष्णवः ॥
ये साधून् स्वमिवोत्प्रेक्ष्य चेष्टंतेऽसाधुकर्मणा ॥ ११९ ॥
त एवानिष्टभूयिष्ठं तत्फलं भुंजते परम् ॥
पुरा महर्षिर्दुर्वासा वीरमाहेश्वरो यमी ॥ १२० ॥
भिक्षार्थं यादवावासं गत्वा भिक्षामयाचत ॥
गृहाजिरगताः सर्वे यादवा मुनिमागतम् ॥ १२१ ॥
दृष्ट्वा जहसुरत्युच्चैः करतालसमन्विताः ॥
तेष्वेकः कुक्षिनिक्षिप्तमुसलं मोहनाकृतिम् ॥ १२२ ॥
स्त्रीवेषधारिणं मर्त्यमादायागत्य चाब्रवीत् ॥
भो महर्षे वधूरेषा धत्ते गर्भं च नूतनम् ॥ १२३ ॥

---

११८ पुण्यचरित्र अशा त्या चन्नबसव गुरुश्रेष्ठाची स्तुति करते झाले. त्या पाहणाऱ्या लोकांपैकीं एका जाणत्या माणसानें त्यांना असें सांगितलें कीं,

११९ मदांध, मूर्खश्रेष्ठ, दुसऱ्यांचा उत्कर्ष न सहणारे असे जे लोक साधूंना आपल्याप्रमाणें सामान्य माणूस असें समजून त्यांची वाईट कृत्यांनीं निंदा करतात.

१२० तेच अतिशय मोठें असें अनिष्टाचें फल उपभोगतात. पूर्वी दुर्वास नांवाच्या वीरशैव महर्षीनें,

१२१ भिक्षेकरितां यादवांचे घरीं जाऊन भिक्षा मागितली, त्या घराच्या आंगणांत असलेले सर्व यादव लोक आलेल्या ऋषीला.

१२२–१२३ पाहून टाळ्या वाजवीत मोठ्यानें हसले त्यांच्यापैकीं एका मनुष्यानें पोटावर मुसळ ठेवून स्त्रीवेश धारण केलेल्या, सुंदर आकाराच्या अशा वेशधारी माणसास घेऊन येऊन ह्मणाला, हे ऋषिवर्य, ही स्त्री नूतन गर्भिणी आहे.

पुमपत्यं स्त्र्यपत्यं वा प्रसूते भवदाशिषा ॥
सत्यं मे ब्रूहि विप्रेंद्रेत्यथ संयमिशेखरः ॥ १२४ ॥
क्रोधातिरेकसंस्पंदमानाधरपुटो भवन् ॥
रे रे क्षत्रकुलांगार तापसं मां परीक्षितुम् ॥ १२५ ॥
छद्मनानेन यतसे शृणु तत्कथयामि ते ॥
कुक्षिस्थितेन कृतकतन्वंग्या मुसलेन वै ॥ १२६ ॥
यादवानां कुलं सर्वं ध्वस्यतां ध्वस्यतामिति ॥
उक्त्वांतर्धानमगमच्छीघ्रकोपी महामुनिः ॥ १२७ ॥
ततो हसंतस्ते वेषधरस्योदरसंस्थितम् ॥
अप्रेक्षमाणा मुसलं भयमाजग्मुरुत्तमम् ॥ १२८ ॥
नवमासोत्तरं तेन प्रसूतं मुसलं तदा ॥
बृहच्छिलातले घर्षं घर्षं गंधं विधाय च ॥ १२९ ॥

---

१२४ ही आपल्या आशीर्वादानें मुलाला प्रसवेल कीं मुलीला ? हे विप्रश्रेष्ठा, हें मला खरें सांग. नंतर जितेंद्रिय अशा त्या दुर्वास ऋषीनें

१२५ अतिशय रागानें कंपित अशा ओष्ठाचा होऊन 'अरे! अरे!! शत्रू कुलांगारा, तपस्वी. अशी माझी परीक्षा करण्याकरितां

१२६ कपट वर्तन करतोस काय ? ऐक. तें तुला सांगतों. या कपटी स्त्रीच्या पोटांतील मुसळानेंच

१२७ सर्व यादव कुलांचा नाश होवो ! नाश होवो !! असें ह्मणून शीघ्र कोपी असा महर्षि गुप्त झाला.

१२८ यावर प्रथम ते सर्व यादव हसले, नंतर वेशधारीच्या पोटावर असलेलें मुसळ दिसेनासें झाल्यामुळें त्यांना अतिशय भीति वाटली.

१२९ पुढें त्या वेशधारीच्या पोटीं नऊ महिने भरल्यानंतर (दहाव्या महिन्यांत) मुसळच जन्माला आलें. भयभीत झालेल्या यादवांनीं तें मोठ्या पाट्यावर उगाळून, त्याचा गंध काढून,

प्रचिक्षिपुः पयोराशौ मेनिरे निर्भया इति ॥
ततः कदाचिदेते वै जलकेलिचिकीर्षया ॥ १३० ॥
यादवा यादसां नाथमुपेताः सह बंधुभिः ॥
प्रधनं प्रथयामासुरत्यल्पेनापि हेतुना ॥ १३१ ॥
तदा मुसलगंधोत्थैस्तृणैरन्योन्यमीर्षया ॥
हत्वा हत्वा गतप्राणा बभूवुरखिले जनाः ॥ १३२ ॥
जातो यादववंशस्य नाशो मुनिकृदग्निना ॥
जानताऽजानता वापि जनेन यदि सज्जने ॥ १३३ ॥
विधीयतेऽपराधो यत्तस्मिन्नेव क्षमाऽऽर्थना ॥
श्रेयस्करी भवत्येव नूनं तस्यापराधिनः ॥ १३४ ॥
प्रथितो हि सतां कोपः प्रार्थनांतो महात्मनाम् ॥
अथाऽऽगता जनाः सर्वे हर्षनिर्भरमानसाः ॥ १३५ ॥

---

१३०–१३१ तो गंध समुद्रांत टाकून दिला. नंतर आह्मी निर्भय झालों असें ते समजले. त्यानंतर एका वेळीं हे यादव जलक्रीडेच्या इच्छेनें आपल्या बांधवांसह समुद्रास जाऊन अतिशय क्षुल्लक कारणांवरून त्यांनीं भांडण केलें.

१३२ त्यावेळीं सर्व यादव मुसळगंधापासून उत्पन्न झालेल्या गवतानें आपापसांत मारामारी करून मरण पावले.

१३३–१३४ दुर्वास ऋषींच्या कोपाग्नीनें यादव कुळाचा नाश झाला. समजून ह्मणा अथवा न समजतांही जो मनुष्य सज्जनांचे ठिकाणीं अपराध करतो, त्या सज्जनांकडेच अपराधाची क्षमा मागणें हें अपराध्याला हितकर असतें.

१३५ महिमाशाली सज्जनांचा राग, प्रार्थना करी पर्यंत असतो. ( अखेर पर्यंत असूं शकत नाहीं. ) नंतर आलेले सर्व लोक अतिशय आनंदित होऊन

चन्ननंदीशपादाब्जयुगले भक्तिभावुकाः ॥
साष्टांगं प्रणिपत्योच्चैः कृत्वा स्तोत्राणि सादरम् ॥ १३६ ॥
अनुग्रहं चोपलभ्य स्वर्णवल्लीपुरं ययुः ॥
महात्मनो महेशस्य शिवाचार्यस्य धीमतः ॥ १३७ ॥
दिगंतमगमत्कीर्तिः कार्तिकेंदुसमप्रभा ॥
श्रुत्वा माहात्म्यमत्यंतप्रथितं पृथिवीतले ॥ १३८ ॥
पवित्रीकर्तुमात्मानं दर्शनाद्भाषणादपि ॥
आगतानां दिगंतेभ्यो जनानां मानसानि सः ॥ १३९ ॥
संतोषसागरांभ्रौघमग्नानि विदधत्सदा ॥
त्रिकालक्रियमाणेशपूजापूतमना मुनिः ॥
उवास स्वमठेऽधीयमानांतेवासिवासिते ॥ १४० ॥
सर्वदा सर्वदा मेऽस्तु सा गौरी सर्वमंगला ॥
यस्याः कटाक्षलेशेन मूर्खो भवति पंडितः ॥ १४१ ॥

—❀ इति पंचमोऽध्यायः ❀—

---

१३६ श्री चन्नबसव स्वामींच्या पदकमलीं भक्तिभावानें सांष्टांग नमस्कार करून प्रेमपूर्वक स्तुति करून,

१३७ आचार्यश्रेष्ठांचा अनुग्रह मिळवून, सोलापुरास गेले. इकडे महात्मा, बुद्धिमान्, महेश्वर, अशा शिवाचार्य श्रेष्ठांची

१३८ कार्तिक मासांतील चंद्रप्रभेप्रमाणें उज्वल अशी कीर्ती चोहोंकडे पसरली. पृथ्वीतलावर अत्यंत प्रसिद्ध असें महत्त्व ऐकून

१३९-१४० महात्म्याच्या दर्शनानें व संभाषणानें स्वतांला पवित्र करण्याकरितां अनेक दिशांकडून आलेल्या लोकांची मनें त्या शिवयोगीनें संतोषित करून, तो मुनि त्रिकाल शिवपूजा करीत, अध्ययन करणाऱ्या शिष्यांनीं युक्त अशा मठांत सुखानें राहूं लागला.

१४१ ज्या पार्वतीच्या कटाक्षांशानें मूर्ख सुद्धां पंडित होतो व सर्व मंगला, अशी ती पार्वती नेहमीं मला सर्व इच्छित देणारी होवो.

—❀ अध्याय पांचवा समाप्त ❀—

॥ श्रीरस्तु ॥

ॐनमः पंचजगद्गुरुभ्यः

## श्री. ष. ब्र. चन्नबसव विजय पुराणम्ः



## श्रीरस्तु अथ षष्ठोऽध्यायः शिवमस्तु

कल्याणायास्तु नित्यं नः कल्याणमहसां निधिः ॥
कल्याणाचलकोदंडः शिवः कात्यायनीधवः ॥ १ ॥

कदाचिदाविरासंस्ते वासंतदिवसा भुवि ॥
जलावगाहसौभाग्याः परिणामसुखावहाः ॥ २ ॥

चंडांशुभानुभल्लाग्रैस्ताडिताः शैत्यरंकवः ॥
स्नानालयं समासेदुः शरणं शरणार्थिनः ॥ ३ ॥

---

१ मंगलकारक, तेजाचा सांठा, सुवर्णपर्वत हेंच ज्याचें धनुष्य आहे, व पार्वतीपती असा शंकर हा आमचें कल्याणाकरितां असो.

२ पृथ्वीतलावर एके काळीं थंडपाण्यांत स्नान केल्यानें सुखकर, परिणामीं ( सायंकाळीं ) शुभकारक, अशा वसंतऋतूचे दिवस आले.

३ सूर्याच्या किरणरूपी भाल्याच्या टोंकांनीं मारण्यांत आलेलीं शीत रूपीं हरिणें, रक्षणाची अपेक्षा करणारीं होऊन स्नानगृहांत प्रवेश करतीं झालीं ( थंड अशा ठिकाणीं गेलीं. )

अब्जिनीकंटकाग्रैस्संविद्धपादो नु मारुतः ॥
रुदन्नलिरवव्याजान्मंदमंदं ववौ वने ॥ ४ ॥

कुसुमस्तवकानम्रां पल्लवाधरपाटलाम् ॥
आलिलिंग लतां वातः कामीवांबुजलोचनाम् ॥ ५ ॥

सहकारांकुरान्रक्तान् मधुना लोहकारिणा ॥
तापितानीव शल्यानि नेशिरे द्रष्टुमध्वगाः ॥ ६ ॥

बभुर्वायुरयोद्भ्रांतकर्णिकाररजःकणाः ॥
शाणोत्कषणतोऽनंगबाणाणुकणिका इव ॥ ७ ॥

गुरुमत्सरभेदिन्या परपुष्टगिरा स्त्रियः ॥
शिक्षिता इव कांतेभ्यो ददुः स्वांगमयाचितम् ॥ ८ ॥

---

४ वायु, वनांत कमळाच्या वेलाच्या काट्यांचीं टोंकें जणुं पायांला टोंचण्यानेंच कीं काय भुंग्यांच्या आवाजमिषानें रडत हळू हळू वाहूं लागला.

५ पुष्प गुच्छांनीं किंचित् वांकलेल्या, ओठाप्रमाणें अंकुरांनीं तांबड्या झालेल्या अशा वेलींना वायूनें-कामियानें तरुणीला आलिंगिल्याप्रमाणें-आलिंगन दिलें.

६ तांबड्या रंगाच्या आंब्याच्या कोंवळ्या अंकुरांना– वसंत नांवाच्या लोहाराकडून भट्टींत घालून तापविलेल्या बाणाप्रमाणें– वाटसरू पाहण्यास असमर्थ झाले.

७ जोराच्या वाऱ्यानें फिरणाऱ्या कर्णिकारफुलाचे पराग-कण हे-जणों सहाणेवर लावले जाणाऱ्या मन्मथाच्या बाणांपासून निघणाऱ्या लहान लहान ठिणग्याच कीं काय– असे दिसूं लागले.

८ मत्सर बुद्धीचा नाश करणाऱ्या कोकिळ पक्षाच्या आवाजानें जणों शिकविल्या गेल्या कीं काय? अशा त्या स्त्रियांनीं न मागतां आपलें शरीर आपापल्या पुरुषांना आलिंगण्यास दिलें.

कलनादकरैर्भृंगैरध्वगाः कामतंत्रताम् ॥
अनीयंत भृशं व्याधैरवटं हरिणा इव ॥ ९ ॥
याः प्रायो मानतः कांतान्नेक्षंते स्म नतानपि ॥
वसंते शांतमानास्ताः प्रियानन्वसरन् स्त्रियः ॥ १० ॥
हालिकाः खलशुद्धानां धान्यानां राशिमादरात् ॥
गेहमानीय शकटैर्विश्रांतिमगमन् भृशम् ॥ ११ ॥
कर्षणादि कृषेः कर्म विधाय मधुवासरे ॥
गोष्ठे गावोऽपि रोमंथमभ्यस्यंति स्म सादरम् ॥ १२ ॥
केचिन्मध्यमवृद्धाश्च वृक्षच्छायमधिश्रिताः ॥
सज्ज्यकुर्वत रज्जूस्ता यासु कृष्युपयुक्तता ॥ १३ ॥

---

९ पारधी लोक मंजुळ व मोहक आवाजानें हरिणांना जाळें लावलेल्या खोलगट जागेकडे आकर्षून आणतात त्याप्रमाणें भुंग्यांनीं आपल्या मधुर आवाजानें वाटसरूंना मन्मथाच्या स्वाधीन केलें.

१० वसंत ऋतूच्या आधीं ज्या स्त्रिया क्षमा करावी म्हणून पायांस नमस्कार करीत असला तरी त्या आपल्या प्रियतमाला गर्वानें नुसतें पहातसुद्धां नव्हत्या, त्या स्त्रिया या वंसतकालांत गर्व रहित होऊन आपल्या प्रियतमाला अनुसरूं लागल्या.

११ शेतकरीलोक खळ्यांत, मोडणी, मळणी, उफणणें इत्यादि कृत्यांनीं स्वच्छ केलेल्या धान्याच्या राशी गाड्यांच्यायोगानें आपापल्या घरांत लावून स्वस्थ विसांवा घेत बसत होते.

१२ बैल वसंत काळांत सकाळीं रानांत नांगर वगैरे ओढून दोन प्रहरचे वेळीं आपापल्या गोठ्यांत प्रेमानें रवंथ करीत बसत होते.

१३ वसंत काळांत कांहीं अर्धवट म्हातारे लोक दोन प्रहरीं झाडाच्या सावलींत बसून शेतकीच्या उपयोगी अशीं दोरखंडे तयार करीत होते.

तंतुयंत्रमुपक्षिप्य छायाबद्धकदंबकाः ॥
गायंत्यः पल्लिपद्यानि तेनिरे तंतुमंगनाः ॥ १४ ॥
वसंते यत्र कुत्रापि प्रायः प्रियमहोत्सवाः ॥
मानवाः शुभकर्माणि चोद्वाहादीन्यकुर्वत ॥ १५ ॥
धर्मवद्धादरैर्मर्त्यैरमर्त्यत्वाप्तये तदा ॥
पुण्यक्षेत्रादियात्रासु बभूवे जातहर्षकैः ॥ १६ ॥
तद्दिने जातु चित्प्रातः कृतलिंगार्चनो मुनिः ॥
जलार्द्रभस्मनाच्छाच्छधृततिर्यक्त्रिपुंड्रकः ॥ १७ ॥
भूत्युध्दूलनदंभेन देहेऽमांतीं बहिर्गताम् ॥
सत्वोद्रेकमहोव्याप्तिं दधान इव भास्वरः ॥ १८ ॥
वदनांभोजसौरभ्यलोभादागत्य संस्थिताम् ॥
अलिमालामिवोद्बिभ्रत्कंठे रुद्राक्षमालिकाम् ॥ १९ ॥

---

१४ सावलींत टोळ्या टोळ्यांनीं बसून रहाट पुढें ठेवून घेऊन खेडवळ स्त्रिया खेडवळ गाणीं गात सूत काढीत होत्या.

१५ महोत्सव प्रिय अशीं माणसें या काळांत बहुतेक कुठेंही पाहिलें तरी विवाहादि शुभ कार्येंच करीत होते.

१६ धार्मिक भावनेचे लोक देवत्वाच्या प्राप्तीकरितां या वसंत काळांत पुण्यक्षेत्रादिकांच्या आनंदानें यात्रा करीत होते.

१७ अशा त्या वसंत काळांत एके दिवशीं प्रातःकाळीं शिवलिंग पूजा उरकून जलमिश्र भस्मानें त्रिपुंड्र भस्म कपाळावर धारण करणारा, मननशील [ ध्यान करणारा ]

१८ भस्मोध्दूलनाचे मिषानें देहांत न मावल्यामुळें बाहेर आलेली सत्त्व गुणाच्या तेजाची व्याप्तिच धारण केली आहे कीं काय? असा प्रकाशमान्;

१९ मुख कमलाच्या सुवासाच्या लोभानें येऊन रांगेनें बसलेली भ्रमरांची पंक्तीच कीं काय अशा प्रकारच्या त्या रुद्राक्ष माळा गळ्यांत धारण करणारा.

स्थिरं मार्दवमारुण्यं पर्णे प्राप्तुं सपर्यया ॥
आगते इव पाटीरे पादुके पादयोर्दधत् ॥ २० ॥
रंजत्काषायवस्त्रेण संवेष्टितकलेवरः ॥
बालातपेन भूयिष्ठः प्रालेयाद्रिरिव स्थितः ॥ २१ ॥
शांतावलोकनानम्रीक्रियमाणासुमद्गणः ॥
वाक्सुधाधारया शांतिं लंभयन् भवपीडितान् ॥ २२ ॥
मूर्तां शैवीं विभूतिं वा मोक्षलक्ष्मीमिवांगिनीम् ॥
स्थितां सत्वमयीं पुण्यां मूर्तिं बिभ्रद्बुधोत्तमः ॥ २३ ॥
साष्टांगप्रणिपातेन पूतकायान् जनान् पथि ॥
कृपावलोकनेनातिधन्यान् तन्वन् तपोनिधिः ॥ २४ ॥

---

२० कायमचा मृदुपणा व तांबडेपणा पानांच्या ठिकाणीं सेवा करून प्राप्त करून घेण्याकरितां आलेला कीं काय ? असे असणारे चंदनाचे खडाव पायांत धारण केलेला,

२१ मनोहर अशा भगव्या वस्त्रांनीं झांकल्या गेलेल्या शरिराचा असा मुनिश्रेष्ठ, कोंवळ्या उन्हानें वेष्टिलेल्या हिमालय पर्वताप्रमाणें दिसणारा,

२२ शांत अशा पाहण्यानें प्राण्यांचे ठिकाणीं नम्रता उत्पन्न करणारा, संसार पीडित लोकांना भाषण रूपी अमृताच्या धारेनें शांतता मिळवून देणारा,

२३ शरीर धारण करणारा, शैव संपत्तीच कीं काय ? अथवा मूर्तपणा मिळविलेला ' मोक्ष लक्ष्मीच कीं काय ' असा असणारा, सत्वगुण—प्रधान, पुण्यमय असें शरीर धारण करणारा पंडितश्रेष्ठ,

२४ वाटेंत साष्टांग नमस्कारानें पवित्र झालेल्या शरिराचे अशा लोकांना कृपावलोकनानें धन्य करणारा तपोनिधी,

सृष्टिसौंदर्यसौभाग्यमभाग्यानामगोचरम् ॥
दर्शं दर्शमुमानाथलीलाजालमनुस्मरन् ॥ २५ ॥
चिदानंदरसास्वादामंदतुंदिलमानसः ॥
चन्ननंदी शिवाचार्यः शिवतत्त्वाब्धिचंद्रमाः ॥ २६ ॥
सल्लक्षणसमायुक्तमश्वमारुह्य संयमी ॥
भृत्यानुगम्यमानः सन् ययाविंद्रदिशं प्रति ॥ २७ ॥
पथि पार्श्वगतैरश्वशफशब्दसहैर्मृगैः ॥
विस्मृत्य पक्ष्मणां पातानीक्ष्यमाणस्सकौतुकम् ॥ २८ ॥
तस्य संयमिनः पश्चाद्दूराद्धावंत आययुः ॥
शकटा बालिकाबालाऽबलासंहतिसंकुलाः ॥ २९ ॥
ग्रैवेयकिंकिणीक्वाणमनुसृत्य पतत्पदैः ॥
तारुण्यासवमाद्यद्भिरुह्यमाना महावृषैः ॥ ३० ॥

---

२५ वाटेंत पुण्यरहित लोकांना न दिसणाऱ्या अशा सृष्टि सौंदर्याचें मनोहरत्व पाहून पाहून उमानाथ अशा शिवाचे लीला जालाची आठवण करणारा,

२६ चिदानंद रसाच्या गोडीनें तृप्त झालेल्या मनानें युक्त, शिव तत्त्वरूपी समुद्राला चंद्र होऊन राहिलेला असा चन्नबसव शिवाचार्य

२७ उत्तम अशा घोड्यावर बसून मागून येणाऱ्या सेवकासह तो संयमी, पूर्व दिशेकडे निघाला.

२८ त्या रस्त्याच्या दोन्ही बाजूंस असणारीं हरणें घोड्याच्या खुरांचा आवाज सहन करीत ( आवाजानें पळून न जातां ) पापण्या हालविण्याचेंसुद्धां विसरून त्या मुनीला पहात होतीं.

२९ अशा संयमी शिवाचार्यांच्या मागें लांब अंतरावरून, मुलें, मुली, आणि बायका यांनीं गच्च भरलेल्या गाड्या धावत येत होत्या.

३० गळ्यांत बांधलेल्या घाट्यांच्या आवाजाच्या तालावर पावले टाकीत, तारुण्य मदानें उन्मत्त अशीं मोठीं खोंडें जुंपलेल्या,

उज्जृंभते हि चंडांशुरनो धावय धावय ॥
इति वृद्धैश्चोद्यमानभृत्यद्विगुणधाविताः ॥ ३१ ॥
ऊढोक्षाश्चातिधावंतः शकटा अटवीतटे ॥
पुरो याथिनमाचार्यमतिक्रम्य गताः किल ॥ ३२ ॥
बलीवर्दान् बलात्कारादातपे धावनैर्मुधा ॥
क्लेशयंतं भृत्यगणं दृष्ट्वा मुनिरखिद्यत ॥ ३३ ॥
अहमेवाग्रयायी स्यामित्याकारकया धिया ॥
भृत्यैः प्रधाव्यमानेषु शकटेष्ववटगामिषु ॥ ३४ ॥
निम्नोन्नततया भूमेरतिनम्रैकभागतः ॥
पपात शकटश्चैको हाहाकारस्तदोदभूत् ॥ ३५ ॥
हा भग्नः किल मत्पादः स्फुटिता मम नाशिका ॥
कर्तिता करशाखा मे जानुर्विश्लथबंधनः ॥ ३६ ॥

---

३१ सूर्य वर वर जात आहे [ ऊन होणार ] गाड्या पळवा, गाड्या पळवा, अशी ज्ञात्याच्या माणसांकडून प्रेरणा झाल्यामुळें गाडीवान् दुप्पट वेगानें पळवीत असलेल्या,

३२ अशा जुंपलेल्या बैलांनीं पळविल्या जाणाऱ्या गाड्या रानांतून पुढें जात असलेल्या चन्नवसव शिवाचार्यांना ओलांडून त्यांच्यापुढें गेल्या.

३३ उन्हांत मुद्दाम जोरानें पळवून बैलांना निष्कारण दुःख देणाऱ्या त्या गाडीवान् लोकांना पाहून हे आचार्य मनांत खिन्न झाले.

३४ ‘ मी पुढें जातों, मी पुढें जातों ’ अशा भावनेनें गाडीवान् खळग्यांतून गाड्या पळवीत असतां, अशा वेळीं

३५ जास्त मोठा खळगा असलेल्या जागेंतून जात असतां एक गाडी उलथली त्यावेळीं मोठा हाहाकार उत्पन्न झाला.

३६ अहाहा ! माझा पाय मोडला, माझें नाक फुटलें ! माझे हातांचें बोट तुटलें, माझ्या गुडघ्याचा सांधा निखळला,

इत्याक्रोशरवान् स्त्रीणां बालानामंबरं कपान् ॥
आकर्ण्य खिन्नचित्तास्ते शकटेभ्योऽवरुह्य च ॥ ३७ ॥

झटित्यागत्य मिलिता जना दृष्ट्वा भयावहाम् ॥
विपत्तिं घनशोकार्तास्तेनुराक्रोशमुच्चकैः ॥ ३८ ॥

गृहाधीशमनुष्यास्तं संभ्रांतं यानचालकम् ॥
यथेच्छमशपन् किं रे बुद्धिः कुत्र गतेति ते ॥ ३९ ॥

अत्रांतरे मृता कन्या ममेत्युच्चैः कुलांगना ॥
काचित्तथैव चुक्रोश भिद्याच्छ्रोतुर्यथा श्रुतिः ॥ ४० ॥

तद्ध्वनिं ते समाकर्ण्य विहायार्तान् चिकित्सकाः ॥
प्रधाव्यागत्य चैक्षंत कुमारीमष्टहायनाम् ॥ ४१ ॥

पतितां शकटाक्षाधःप्रदेशे धूलिधूसराम् ॥
मीलितम्लाननेत्राब्जां नष्टचेष्टां श्लथांगकाम् ॥ ४२ ॥

---

३७ याप्रमाणें आकाशांत व्यापणाऱ्या—स्त्रिया व मुलें यांच्या आक्रो-
शांचा— आवाज ऐकून खिन्न मनाचे होऊन— त्या गाडीवरून खालीं उतरून,

३८ त्या ठिकाणीं लौकर धावत आलेल्या लोकांनीं ती भयंकर अशी
दुःखद स्थिति पाहून अधिक दुःखपीडित होऊन मोठ्यानें आक्रोश केला.

३९ त्या घरमालकाच्या माणसानें भयभीत झालेल्या त्या गाडीवानाला
अरे तुझी बुद्धि कोठें गेली होती? इत्यादि वाक्यांनीं त्याला खूप शिवीगाळ केली.

४० इतक्यांत एक स्त्री ' माझी मुलगी मेली, माझी मुलगी मेली '
असें [ कांठाळी बसेल इतक्या ] मोठ्यानें ओरडून रडूं लागली.

४१-४२ दुःखितांना उपचार करणाऱ्या लोकांनीं त्या स्त्रीचा आवाज
ऐकून त्या दुःखितांना तेथेंच सोडून धावत येऊन चाकाच्या आंसाखालीं
पडलेली, धुळीनें मळून गेलेली, डोळे सुकलेले व झांकलेली, चलन वलन
रहित, शिथिल शरीराची अशी आठ वर्षांची मुलगी पाहून,

उध्दृत्य शकटं शीघ्रं कोमलां बालिकां शनैः ॥
आनयन् बहिरेते ते तरुणाः करुणार्द्रिताः ॥ ४३ ॥
मात्रादिबांधवाः सर्वे बालामावृत्य कोमलाम् ॥
भृशमाक्रंदनं चक्रुरुरस्ताडनपूर्वकम् ॥ ४४ ॥
दुःखध्वनिमुपशृत्य निकटक्षेत्रसंस्थिताः ॥
हालिका हलकर्मादि विहायाश्वागता जनाः ॥ ४५ ॥
किमासीत्कस्य कन्येयं किमर्थं कुत्र गच्छथ ॥
इति पृष्टा बंधुजना ऊचिरे कारणं तदा ॥ ४६ ॥
अहो दैवगतिश्चित्रा क्षणात्पूर्वमिमे जनाः ॥
आनंदनिर्भरा आसन्निदानीं दुःखदुःखिताः ॥ ४७ ॥
उद्वाहमंगलार्थाय कन्येयं चाष्टहायना ॥
गच्छन्ती कालकालाहिदष्टाऽहो क्रूरता विधेः ॥ ४८ ॥

---

४३ दयार्द्र झालेल्या त्या तरुणांनीं तावडतोब ती गाडी हळूच वर उचलून त्या कोमलांगी मुलीला बाजूस काढलें.

४४ आई इत्यादि सर्व आप्त मंडळी कोमल अशा त्या मुलीच्या-भोंवतीं जमून छाती बडवीत मोठ्यानें रडूं लागली.

४५ त्या दुःखाचा आवाज ऐकून आसपासच्या शेतांत असणारीं माणसें, नांगरणें वगैरे जेथल्या तेथें सोडून तावडतोब त्या ठिकाणीं धावून आलीं.

४६ काय झालें? ही मुलगी कोणाची? कोठें कशाकरितां चाललात? असें शेतकऱ्यांकडून विचारले गेलेले बांधव लोक यांनीं तेव्हां कारण सांगितलें.

४७ अहो! दैवगती विचित्र आहे. हेच लोक एका क्षणापूर्वींच पूर्ण आनंदित होते, तर आतां यावेळीं अतिशय दुःखित होऊन राहिले आहेत.

४८ आठ वर्षांची ही मुलगी लग्नाच्या मंगल कार्याला जात असतां तिला मृत्युरूपी काळ सर्पानें दंश केला. अहो! हा दैवाचा क्रूरपणा.

विवाहात्पूर्वमेवास्या मृतिः स्यादिति वेधसा ॥
ललाटे लिपिविन्यासश्चक्रे दहतु तत्करः ॥ ४९ ॥
अवश्यमनुभोक्तव्यं कृतं कर्म शुभाऽशुभम् ॥
इति दैवस्य नियमो न लंघ्यः प्राणिभिः किल ॥ ५० ॥
एवं कन्याबंधुवर्गान् समाधातुमुपक्रमम् ॥
तेनिरे दुःखिनं दृष्ट्वा कृपा कस्य न जायते ॥ ५१ ॥
गतासुं सुकुमारीं तां कन्यामंके निधाय च ॥
आक्रोशंतीं सवित्रीं नो समाधातुमलं जनः ॥ ५२ ॥
अत्रांतरे चन्ननंदी शिवाचार्यः शिवव्रती ॥
आगत्य जनसंमर्दं दृष्ट्वा पार्श्वस्थसेवकम् ॥ ५३ ॥

---

४९ 'लग्नाच्या आधीं ही मुलगी मरो' म्हणून ब्रह्मदेवानें हिचे कपाळावर लेख लिहिला आहे ना ?

५० आपण केलेल्या चांगल्या अथवा वाईट कर्माचें फळ हें अवश्य उपभोगलेंच पाहिजे. हा दैवाचा नियम प्राणिमात्रांकडून ओलांडण्यास अशक्य आहे.

५१ याप्रमाणें कन्येच्या बंधुवर्गाकडील माणसांचें ते शेतकरी समाधान करण्याचा प्रयत्न करते झाले. कारण-दुःखी माणसांना पाहून कुणाला आपोआप दया उत्पन्न होत नाहीं ?

५२ सुकुमारी व गतप्राण अशा त्या मुलीला मांडीवर घेऊन रडणाऱ्या आईचें सांत्वन करण्यास कोणीही समर्थ झाला नाहीं.

५३ इतक्यांत शिवव्रती चन्नबसव शिवाचार्य तेथें येऊन लोकांची गर्दी पाहून बाजूस असलेल्या आपल्या सेवकाला,

किमाक्रोशंति सर्वे ते किं जातं पृच्छ तानिति ॥
ऊचे गंभीरया वाचा कृपारसझरीमुचा ॥ ५४ ॥
श्रुत्वा श्रुतिसुधां वाचं दृष्टयस्तत्क्षणं नृणाम् ॥
हित्वा कन्यां मुनौ पेतुरनुकूले विधाविव ॥ ५५ ॥
शांताकारं चिदानंदप्रफुल्लमुखपंकजम् ॥
जटाधरं त्रिपुंड्रांकं काषायवसनान्वितम् ॥ ५६ ॥
अनुगृण्हातुमायातमुमाधवमिव स्थितम् ॥
आचार्यपुंगवं दृष्ट्वा हर्षनिर्भरमानसाः ॥ ५७ ॥
तत्रत्याः पुरुषव्याघ्रा भक्तिपूर्वं ववंदिरे ॥
मेनिरे चामुनाऽऽपत्तिर्दूरगा नु भवेदिति ॥ ५८ ॥
अथ कल्याणमूर्तिं तं भक्तिव्यानम्रमूर्तयः ॥
बद्धांजलिपुटाः संतः कारणं तद्व्याजिज्ञपन् ॥ ५९ ॥

---

५४ 'हे सर्व लोक कां रडताहेत? त्यांना काय झालें? तें त्यांना विचार.' असें कृपाळू मुनीनें गंभीर भाषणानें सांगितलें.

५५ कानांला अमृतप्राय असें तें भाषण ऐकून लोकांची दृष्टि तावडतोब त्या मुलीकडून निघून या मुनीवर-अनुकूल अशा दैवाच्या ठिकाणीं पडल्याप्रमाणें—पडली.

५६ शांताकार, ज्ञान व आनंद यांनीं प्रफुल्लित मुखाचा, जटाधारी, त्रिपुंड्र लावलेला, भगवीं वस्त्रें परिधान केलेला,

५७ आपणांवर कृपा करण्यास आलेला शंकरच कीं काय अशा त्या आचार्य श्रेष्ठास पाहून पूर्ण आनंदित होऊन,

५८ तेथें असलेल्या भक्तिवान् पुरुष श्रेष्ठांनीं भक्तिपूर्वक नमस्कार केला आणि या महात्म्यांचे योगानेंच आमचें हें संकट दूर होईल असेंही त्यांनीं जाणलें.

५९ नंतर कल्याणमूर्ति अशा गुरूत्तमाला भक्तीनें लीन शरीराचे होऊन, हात जोडून त्या मुलीच्या मरणाचें कारण सांगितलें.

श्रुत्वा तत्कारणं सम्यग्योगजज्ञानचक्षुषा ॥
समीक्ष्य शांतचित्तः सन्नूचिवांस्तान् गुरूत्तमः ॥ ६० ॥
भक्तिप्रियः शिवस्साक्षात्सांबः शर्वो हि नापदम् ॥
भक्तस्य सहते भूमौ पितेवात्मतनूभुवः ॥ ६१ ॥
अवश्यमेव कुरुते कल्याणं नु न संशयः ॥
स्नात्वा जलाशये कश्चिज्जलमानयतादिति ॥ ६२ ॥
आकर्ण्य मुनिमूर्धन्यवाणीं कल्याणकारिणीम् ॥
तत्क्षणं तरुणः कश्चिददूरस्थं सरो ययौ ॥ ६३ ॥
स्नात्वा तत्रार्द्रवस्त्रस्सन् जलमानयदंजसा ॥
ततो गुरूत्तमः पात्राद्भस्मादायाऽभिमंत्र्य च ॥ ६४ ॥
निधाय तत्करे प्राह भस्मना सजलेन च ॥
लिप्यतामंगमेतस्याः फलिष्यति मनोरथः ॥ ६५ ॥

---

६० तो शिवयोगी तें कारण ऐकून योगजन्य ज्ञान चक्षूनें उत्तम तऱ्हेनें निरीक्षण करून [ विचार करून ] गुरु श्रेष्ठांनीं शांत अंतःकरणानें त्यांस सांगितलें.

६१ शिव हा भक्तिप्रिय आहे. भक्तांना आलेलें संकट—पिता मुलाला आलेल्या संकटाप्रमाणें—सहन करीत नाहीं.

६२ शिव तुमचें जरूर कल्याण करील, यांत संशय नाहीं. कोणी तरी एक जण जलाशयांत स्नान करून [ सोंवळ्यानें ] पाणी घेऊन या.

६३ कल्याणकारक असें मुनिश्रेष्ठाचें भाषण ऐकून एक तरुण ताबडतोब उठून जवळ असलेल्या तळ्याकडे गेला.

६४ त्या तरुणानें तेथें स्नान करून ओलेत्यानें तेथील पाणी तीव्रतेनें आणलें. नंतर गुरूवर्यानें आपल्या कमंडलूंतील भस्म काढून अभिमंत्रून,

६५ त्या तरुणाच्या हातावर टाकून सांगितलें कीं, हें भस्म पाण्यांत कालवून त्या मुलीच्या सर्वांगास लेप कर. इच्छा पूर्ण होईल.

इत्युक्त्वा मुनिना दत्तां विभूतिं जलमिश्रितां ॥
लिलेप कन्यासर्वांगं तरुणः करुणार्द्रितः ॥ ६६ ॥
अल्पावधौ ततः कन्या निमीलितविलोचने ॥
उन्मील्योपाविशत्तत्र निद्रोद्बुद्धेव भासुरा ॥ ६७ ॥
प्रत्यागतासुमात्मानमावृत्य परितः स्थितान् ॥
ईक्षमाणां जनान् भ्रांत्या कन्यामैक्षंत बांधवाः ॥ ६८ ॥
तदाप्तानां मुखांभोजजालान्युत्फुल्लतां दधुः ॥
आदेश इव चानंदश्चिचे दुःखपदे ह्यभूत् ॥ ६९ ॥
शिवयोगिशिखारत्नशिवाचार्यमहाशयात् ॥
अकस्मादागताऽस्माकं विपच्चिर्विलयं गता ॥ ७० ॥
इति भक्तिभराक्रांता बांधवा भव्यविग्रहम् ॥
श्रीगुरुं समुपागत्य साष्टांगं प्रणिपत्य च ॥ ७१ ॥

---

६६ अशा प्रकारें सांगून मुनीकडून दिलें गेलेल्या जलमिश्रित भस्माचा, दयार्द्र अशा त्या तरुणानें त्या मुलीच्या सर्वांगास लेप केला.

६७ नंतर थोडे वेळांत ती मुलगी झांकलेले डोळे उघडून झोंपेंतून जागी झाल्याप्रमाणें तेथें उठून बसली.

६८ जीव आलेल्या–आपल्या सभोंवतीं जमलेल्या त्या आपल्या बांधवांना आश्चर्यानें पहात असलेल्या–अशा त्या मुलीला लोकांनीं पाहिलें.

६९ त्यावेळीं त्या आप्तेष्टांचीं मुखकमलें आनंदानें विकसित झालीं, व त्यांच्या दुःखी मनाचे ठिकाणीं आनंद आदेश रूपानें राहिला ( दुःख जाऊन आनंद झाला.

७० शिवयोगी शिखारत्न अशा चन्नबसव शिवाचार्यांकडून एकाएकीं आलेलें आमचें वरील हें संकट नाहींसें झालें.

७१ याप्रमाणें अतिशय भक्तियुक्त अंतःकरणानें ते आप्तलोक भव्य शरीरी अशा श्रीगुरूंच्या जवळ येऊन, त्यांना साष्टांग नमस्कार घालून,

बद्धांजलिपुटाः श्रद्धाभक्तिव्यानम्रमस्तकाः ॥
अनन्यमानसास्संतश्चक्रुस्तोत्राणि सादरम् ॥ ७२ ॥
श्रीमते श्रितपालाय तस्मै श्रीगुरवे नमः ॥
यत्कृपा चंद्रिका सांद्रा हृत्कैरवमुदमुदे नृणाम् ॥ ७३ ॥
दासीकृतांगजाताय भूषीकृतगुणालये ॥
काशीकृतस्ववासाय शिवरूपाय ते नमः ॥ ७४ ॥
तापत्रयाग्निदंदह्यमानमानवमानसम् ॥
वाक्सुधाधारया शांतं तन्वते महते नमः ॥ ७५ ॥
संसारसर्पदष्टानां संजीविन्यौषधायते ॥
यत्कृपादृष्टिसंपातस्तस्मै साधुहृदे नमः ॥ ७६ ॥

७२ हात जोडून, शुद्ध भक्तीनें नम्र मस्तकी होऊन, गुरूंच्याच ठिकाणीं मन दृढ करून स्तुति केली.

७३ ज्याची कृपारूपी निबिड चंद्रिका ( चांदणें ) मनुष्याच्या हृदयरूपी कुमुदां [ रात्रीं विकासणारीं कमळें ] च्या विकासास कारणीभूत होते व आश्रितांवर दया करणारा, अशा त्या श्रीमान् श्री गुरूंना नमस्कार असो.

७४ ज्यानें मदनाला आपला दास करून सोडलें आहे, गुण हे ज्यांचे अलंकार होऊन राहिले आहेत, ज्याच्या वसतीनें तें ठिकाण काशीप्रमाणें पुण्य क्षेत्र होऊन राहिलें आहे, व शिवस्वरूपीं अशा त्या गुरुवर्यांना आमचा नमस्कार असो.

७५ त्रितापरूपी अग्नीनें जाळलें जाणारे मनुष्यांचें मन, उपदेश वचनरूपी अमृतधारांनीं शांत करीत असलेले व महिमाशाली, अशा गुरूंना नमस्कार असो.

७६ हे गुरो, आपली कृपादृष्टी संसाररूपी सर्पानें दंश केलेल्या लोकांना संजीविनी औषधच झाली आहे. अशा सौम्य मनाच्या तुम्हांला नमस्कार असो.

आचारसाधुबीजानि चोप्त्वा भक्तमनोभुवि ॥
तेभ्यः स्वादुफलानां सुदात्रे तुभ्यं नमो नमः ॥ ७७ ॥

नमः श्रीचरवर्याय नमः श्रीगुरुमूर्तये ॥
नमो विरतिमद्वृंदशेखराय शिवात्मने ॥ ७८ ॥

पाहि पाहि पदांभोजभ्रमरान् भक्तिभावुकान् ॥
अस्मान्विस्मृतकर्तव्यान् शिवाचार्यशिरोमणे ॥ ७९ ॥

इति स्तुतिमुखा भक्तमुख्यास्ते गुरुपुंगवम् ॥
माध्यान्हिकीं क्रियां कर्तुं प्रार्थयामासुरादरात् ॥ ८० ॥

तेषामाग्रहपूर्वां तां विज्ञप्तिं विनयान्वितां ॥
अनुमेने मुनिश्रेष्ठो भक्तितंत्रा हि साधवः ॥ ८१ ॥

---

७७ भक्तांच्या मनरूपी भूमींत सदाचाररूपी उत्तम बीं पेरून त्यापासून उत्पन्न होणारीं उत्तम रुचकर अशीं फळें भक्तांना देणाऱ्या, अशा तुला नमस्कार असो.

७८ चरश्रेष्ठ, श्री गुरुमूर्ति, वैराग्य संपन्न लोकांत शिरोमणी, शिवस्वरूपीं, अशा आचार्यांना नमस्कार असो, आमचा नमस्कार असो.

७९ हे शिवाचार्य शिरोमणी, तुझ्या पदकमळीं भ्रमर झालेले, भक्तीनें मनोहर झालेले, इतर कार्यें विसरून गेलेले अशा आमचें रक्षण कर, रक्षण कर.

८० असें ह्मणून स्तुतीनें शब्दायमान् झालेले असे प्रमुख भक्त गुरुश्रेष्ठांना मध्यान्ह काळची शिवपूजा करण्यासंबंधीं मोठ्या आदरानें प्रार्थना करते झाले.

८१ नंतर त्या गुरुश्रेष्ठांनीं प्रेमानें भक्तीपूर्वक, आदरानें व आग्रहानें केलेली त्या भक्तांची प्रार्थना मान्य केली. बरोबर आहे कारण— सज्जन हे भक्त्याधीन आहेत.

ततो माध्यान्हिकं कर्म शिवपूजादिकं व्रती ॥
समाप्याखाद्य देवस्य प्रसादं तृप्तिमाययौ ॥ ८२ ॥
अत्रांतरे गुरोः पादपाथः पीत्वाऽथ ते जनाः ॥
विहिताभ्यवहाराश्च सायमायास्यतीति च ॥ ८३ ॥
युग्यैर्नियोजयामासुः शकटान् कटकस्थितान् ॥
इतो गुरूत्तमस्तावद्भृत्यमाहूय सत्वरम् ॥ ८४ ॥
पल्याणादिसमायुक्तं कारयामास वाहनम् ॥
गंतव्यस्य च मार्गस्य दूरत्वान्निरगान्मुनिः ॥ ८५ ॥
अस्ति कश्चिद्गुरौ भक्तियुक्तः श्रीमान् महायशाः ॥
दुर्गनामनि सद्ग्रामे महाराष्ट्रमुखाश्रिते ॥ ८६ ॥
आमंत्रितः शिवाचार्यस्तेन भक्तिमदात्मना ॥
दुहितृद्वाहहेत्वर्थं तत्राऽऽसीद्गंतुमानसः ॥ ८७ ॥

---

८२ नंतर शिवव्रती आचार्य मध्यान्हकाळची शिवपूजा वगैरे कर्मे उरकून शिवलिंगाचा प्रसाद ग्रहण करून संतुष्ट झाले.

८३ इतक्यांत श्री गुरूंचें पादोदक पान करून त्या लोकांनीं जेवण आटोपून संध्याकाळ होईल ह्मणून,

८४ उतरलेल्या ठिकाणीं असलेल्या गाड्यांना बैल जुंपले. इकडे गुरुश्रेष्ठांनीं ताबडतोब सेवकाला बोलावून,

८५ जाण्याचा रस्ता अद्याप बराच लांब आहे ह्मणून मुनिवर्यांनीं घोड्यावर जीन खोगीर वगैरे सेवकाकडून घालवून, त्या घोड्यावर बसून ते निघाले.

८६ महाराष्ट्राच्या सीमेवर असलेल्या दुर्ग नांवाच्या गांवांत सद्गुरुभक्त व कीर्तिमान् असा एक श्रीमंत गृहस्थ रहात असे.

८७ मुलीचे लग्नाकरितां भक्तिसंपन्न अशा त्या श्रीमंताकडून आमंत्रित झालेले शिवाचार्य हे दुर्गाला जाण्याकरितां निघाले होते.

अकस्मादागतापत्तेर्ध्वंसाद्गुरुकृपाबलात् ॥
अमंदानंदसंदष्टस्वांताश्शांतिसमन्विताः ॥ ८८ ॥
विवाहयात्रिकास्सर्वे गच्छंतं गुरुपुंगवम् ॥
अन्वायन् मुनिशार्दूलवचःपीयूषगृध्नवः ॥ ८९ ॥
वदतो व्रतिनस्तस्य हृदयग्राहिवाक्ततेः ॥
समाकर्णनसम्मग्नमानसा मनुजर्षभाः ॥ ९० ॥
सुदूरमप्यतिक्रांतं मार्गं नैव विदुः स्म ते ॥
गंतव्यग्रामभिन्नत्वात्पृथङ्मार्गो यदाऽऽगतः ॥ ९१ ॥
तदा गुरुपदांभोजवियोगोऽस्माकमागतः ॥
इति संखिद्यमानांतःकरणा यात्रिका जनाः ॥ ९२ ॥
गत्यभावात्समाधाय मनःशांतिं सुमेधसः ॥
मुहुर्मुहुर्नमस्कृत्य संस्तुत्य चरपुंगवम् ॥ ९३ ॥

---

८८–७९ आपणांवर अकस्मात् रीतीनें आलेलें संकट श्री गुरूंच्या कृपाबळानें नाहींसें झाल्यामुळें पूर्ण आनंदी व समाधान झालेले असे ते लग्नाकरितां निघालेले वऱ्हाडी ही त्या गुरुपुंगवाच्या उपदेशामृताचे ठिकाणीं आशायुक्त होऊन त्यांचे मागून जाऊं लागले.

९० उपदेश करीत असलेल्या शिवव्रती अशा शिवाचार्यांची हृदयंगम अशीं भाषणें ऐकण्यांत गुंग झालेल्या लोकांना

९१ बरेच लांबपर्यंत चालून गेले असतांही आपण इतकें लांब चालून आलों याचें त्यांना भानही राहिलें नाहीं. पुढें त्या वऱ्हाडी लोकांचा जाण्याचा गांव निराळा असल्यामुळें जेव्हां निराळा रस्ता फुटला,

९२ तेव्हां गुरुपदकमलांचा वियोग आह्मांला आतां प्राप्त झाला ह्मणून, अत्यंत दुःखित अंतःकरणाचे असे ते वऱ्हाडी लोक,

९३ उपाय नाहीं ह्मणून (निरुपायानें) बुद्धिमान् असे ते लोक मनाचें समाधान करून त्या चरश्रेष्ठ गुरूंना पुन्हां पुन्हां नमस्कार करून स्तुति गाऊन,

ध्यायंतश्चेतसि श्रीमद्गुरुपादांबुजद्वयम् ॥
जग्मुः स्वमार्गमाश्रित्य कन्यापित्रादिबांधवाः ॥ ९४ ॥
इतस्तु चरचक्रेशश्चन्ननंदी गुरूत्तमः ॥
गच्छन् क्रमेण दुर्गं तं चक्रे चाक्षुषमात्मनः ॥ ९५ ॥
प्रागेवागत्य तिष्ठंतो भृत्या ग्रामबहिर्भुवि ॥
आयांतं गुरुगण्यं तं नमस्कृत्य परिष्कृते ॥ ९६ ॥
भक्त्योपवेशयामासुः प्रदेशे तेषु कश्चन ॥
गत्वा निवेदयामास गुरोरागमनं प्रभोः ॥ ९७ ॥
भृत्योदितानि वाक्यानि सुधातिमधुराणि वै ॥
श्रुत्वा गृहाऽधिपो हर्षातिरेकात्फुल्लमानसः ॥ ९८ ॥
मिलित्वा पौरपुंव्याघ्रैः प्रत्युद्गम्य धराशिवम् ॥
अभिवंद्याऽऽनयामास वस्तव्यगृहमादरात् ॥ ९९ ॥

---

९४ त्या गुरूंच्या पदकमलांचें मनांत स्मरण करीत त्या मुलीचा बाप वगैरे आप्तलोक, आपल्या मार्गानें जाऊं लागले.

९५ इकडे चरचक्रेश अशा चन्नवसव गुरुश्रेष्ठांचे दृष्टीला बराच वेळ चालून गेल्यानंतर तें दुर्ग गांव दिसूं लागलें.

९६ प्रथमच गांवाबाहेर आलेले ते श्रीमंताचे नौकर लोक, आलेल्या गुरुश्रेष्ठ चन्नवसव स्वामींना नमस्कार करून स्वच्छ केलेल्या,

९७ ठिकाणीं मोठ्या भक्तीनें बसविलें. त्या नौकरांपैकीं एकानें गांवांत जाऊन गुरुवर्य आल्याची बातमी मालकाला दिली.

९८ चाकरानें सांगितलेलें अमृतापेक्षांही गोड असें तें भाषण ऐकून हर्षानें प्रफुल्लित मनाचे असे ते यजमान,

९९ गांवांतील मुख्य मुख्य माणसांसह त्या भूशिव अशा गुरूंना सामोरे जाऊन, नमस्कार करून, प्रेमानें ते उतरण्याचे घरीं त्यांना बोलावून आणते झाले

एवमेवागतान्नानाप्रदेशीयान् गुरूत्तमान् ॥
स्वामिवृंदानि तद्योग्यसुस्थले सन्यवेशयत् ॥ १०० ॥
तथैवामंत्रितांश्चान्यान् धनिकाग्रेसरान् बहून् ॥
स्वागतीकृत्य तद्योग्यनिकेतस्थान् चकार सः ॥ १०१ ॥
विवाहार्थं समायातान् नानाऽऽशाभ्यः सहस्रशः ॥
वीरमाहेश्वरान् भक्ष्यभोज्यैः सम्यगतर्पयत् ॥ १०२ ॥
पुण्याहादीनि कर्माणि कारयित्वा यथाविधि ॥
पूर्वादिदिक्षु संस्थाप्य कलशान्पंच नूतनान् ॥ १०३ ॥
आव्हानपूर्वकं तेषु रेणुकादीन् जगद्गुरून् ॥
पंचाचार्यान् यथाशास्त्रं समभ्यर्च्य च सादरम् ॥ १०४ ॥
कृत्वा षोडशदानांतर्भूतमार्यजनादृतम् ॥
कन्यादानं महादानं ततः पूतपुरोधसा ॥ १०५ ॥

---

१०० अशा प्रकारें निरनिराळ्या गांवांहून येणाऱ्या गुरुश्रेष्ठांना, व जंगमांच्या समुदायांना योग्य ठिकाणीं उतरविलें.

१०१ व तसेंच आमंत्रित अशा अनेक श्रीमान् लोकांचें स्वागत करून योग्य अशा घरीं त्यांना उतरविलें.

१०२ लग्न समारंभास निरनिराळ्या ठिकाणाहून आलेल्या हजारों वीर माहेश्वर मूर्तींना भक्ष्य भोज्यादि पदार्थांनीं उत्तम प्रकारें संतुष्ट केलें.

१०३ नंतर 'पुण्याह वाचन' इत्यादि विवाहांगभूत कर्में यथाशास्त्र करवून पूर्वादि दिशेच्याठिकाणीं नवीन अशा पंच कलशांची स्थापना करून,

१०४ त्या कलशांचेठिकाणीं जगद्गुरु असे रेणुकादि पंचाचार्यांची आह्वानपूर्वक प्रेमानें यथाशास्त्र पूजा करून.

१०५ पवित्र अशा पुरोहितांकडून– श्रेष्ठ लोकांकडून आंगिकारलें गेलेलें सोळा दानांपैकीं एक असें–'कन्यादान' नांवाचें मोटें दान करून, नंतर.

मांगल्यधारणाद्यं च कारयामास कर्म सः ॥
निर्विघ्नं निष्कलंकं च जातं वैवाहमंगलम् ॥
प्रशंसेयुर्यथाशिष्टजना गौरवपूर्वकम् ॥ १०६ ॥
ततो गृहाधिपस्तावदागतानां गरीयसाम् ॥
गुरूणामुपहारादिसपर्यां कर्तुमंजसा ॥ १०७ ॥
सभां सभ्यजनाकीर्णां साधुसंगीतवेदिभिः ॥
गायकैर्गणिकाभिश्च सेवितामकरोदयम् ॥ १०८ ॥
गायनैर्गायकानां च नर्तकीनां च नर्तनैः ॥
उपन्यासैश्च वक्तृणां ननंदुस्सभिकास्ततः ॥ १०९ ॥
तत्रोच्चासनसंविष्टंगुरूणां कस्य पूजनम् ॥
कर्तव्यमाद्यमित्येवं विचारो व्यचरत्तदा ॥ ११० ॥

---

१०६ मांगल्यधारणादि ( मंगळसूत्र बांधणें ) वैवाहिक कामें करविलीं. शिष्ट लोकांकडून गौरवपूर्वक प्रशंसिल्याप्रमाणें तें लग्नकार्य उत्तम रीतीनें कोणताही अपवाद न येतां निर्विघ्नपणें पार पडलें.

१०७ नंतर लग्नाकरितां आलेल्या पूज्य अशा गुरुवर्यांची काणिका वगैरेनीं योग्य संभावना करण्याचे हेतूनें त्या यजमानानें तावडतोब

१०८ उत्तम प्रकारचे गवई, व नायकिणी यांचेकडून सेविली जाणारी अशी सभ्य गृहस्थांची एक सभा बोलाविली.

१०९ गवयांच्या उत्तम गाण्यानें, नर्तकींच्या नाचकामानें, व उत्तम वक्त्यांच्या भाषणानें सर्व सभासद अतिशय आनंदित झाले.

११० नंतर, सभेंत उच्चासनावर बसलेल्या अनेक गुरुवर्यांपैकीं कोणत्या गुरूंची प्रथम पूजा करावी हा प्रश्न उपस्थित झाला.

ममाऽऽद्या हि ममाऽऽद्या हो भवेत्पूजेति संसदि ॥
अभूत्कलकलस्तत्र मानिमाहेशसंततौ ॥ १११ ॥
भक्तिमान् यजमानस्तु मुहूर्तं मुग्धमानसः ॥
स्थित्वाऽथ संजगादेत्थं पूजेयं श्वो भविष्यति ॥ ११२ ॥
ततः सभासदः सर्वे तत्कृतादरसत्क्रियाम् ॥
गंधमाल्यादिकां पूतां स्वीकृत्य निरगुर्गृहम् ॥ ११३ ॥
उपदेष्टमहेशानामन्योत्कर्षासहिष्णुताम् ॥
नालं द्रष्टुमिवोष्णांशुर्निमग्नः पश्चिमांबुधौ ॥ ११४ ॥
मोहेन वेष्टिता बुद्धिरिव माहेशसंततेः ॥
तमालनीलतमसा शर्वरी संवृताऽभवत् ॥
तस्यां निशायां संकल्पविकल्पविधुताशयाः ॥ ११५ ॥

---

१११ तेंव्हा उच्चासनावर बसलेल्या त्या सभेंतील मानधन माहेश्वर मूर्तींमध्यें 'माझी पूजा आधीं झाली पाहिजे, माझी पूजा आधीं झाली पाहिजे' अशा तऱ्हेचा गोंगाट सुरू झाला.

११२-११३ भक्तिमान् असा यजमान तो गोंगाट पाहून थोडा वेळ स्तब्ध राहिला, नंतर आपली संभावना उद्यां होईल असें सांगितलें. नंतर सर्व सभासद त्या यजमानाकडून हार गुच्छ, अत्तर गुलाब यांचा स्वीकार करून आपापल्या घरीं निघून गेले.

११४ स्वतां उपदेश करणाऱ्या माहेश्वर मूर्तींची, ती एकमेकांची उत्कर्षाची असहिष्णुता जणों न पाहवल्यामुळेंच कीं काय ? सूर्य पश्चिम समुद्रांत बुडाला [ सूर्यास्त झाला ]

११५ नंतर-तेंव्हा माहेश्वर मूर्तींची ( गुरु मूर्तींची ) बुद्धि अज्ञानानें आच्छादिल्याप्रमाणें ही रात्रींही तमाल वृक्षाप्रमाणें काळ्याकुट्ट अंधारानें झांकली गेली. त्या रात्रीं संकल्प विकल्पानें विव्हळ झालेल्या मनाचे,

निद्रां न लेभिरे किंचिद्गुरवो गुणवर्जिताः ॥
कस्याधिकारिणः श्वो वा भविष्यत्यग्रपूजनम् ॥
तत्स्याचेन्मे ततो लोके गौरवं हि भविष्यति ॥ ११६ ॥

ततो गृहाधिपः कृत्वाऽभ्यवहारं कथं चन ॥
चिंतासंतानसंस्यूतस्वांतः शांतिविवर्जितः ॥ ११७ ॥

उन्मत्त इव बभ्राम ततश्चेतश्च सर्वतः ॥
तथाप्यप्राप्तशांतिस्सन्नंतस्थशयनालयम् ॥ ११८ ॥

समभ्येत्य सुशय्यायां शयानः श्वः कथं भवेत् ॥
इति व्यसनविध्वस्तमनःशांतिसमन्वितः ॥ ११९ ॥

लुठत्युपविशत्याढ्यश्चोत्तिष्ठति मुहुर्मुहुः ॥
दीर्घं निश्वसति प्रज्ञो भ्रूभंगं वितनोति च ॥ १२० ॥

---

११६ सहनशीलता राहित अशा गुरूंना 'उद्यां कोणत्या अधिकाऱ्याची प्रथम पूजा होणार ? ती पूजा माझी झाल्यास त्या योगानें लोकांत माझा गौरव होईल इत्यादि चिंतेनें झोंप आली नाहीं.

११७ इकडे त्या यजमानानें मोठ्या कष्टानें जेवण करून, अतिशय चिंताग्रस्त होऊन त्यामुळें शांति नसल्यानें

११८ वेड्याप्रमाणें इकडे तिकडे असा चोहोंकडे भटकत असला तरी, समाधान रहित होऊन, आंत असलेल्या झोंपण्याच्या खोलीकडे.

११९ येऊन अंथरुणावर निजून उद्यां कसें होईल ? अशा या संकटानें मनाला शांतता नसलेला असा होऊन,

१२० तो यजमान अंथरुणावरून लोळतो आहे, बसतो आहे, उठतो आहे, तो बुद्धिमान् वारंवार दीर्घश्वास टाकतो आहे, कपाळास आठ्यां घालतो आहे,

गुरो मदीयहृच्चिंतां दूरीकुरु दयानिधे ॥
त्वमेव शरणं नान्यः कश्चिदस्ति ममानघ ॥ १२१ ॥
एवं यदा गुरुध्याननिमीलितविलोचनः ॥
तदा ददर्श सुस्वप्नमेकमेकांतपुण्यवान् ॥ १२२ ॥
तत्र तटिज्जटाजूटस्त्रिपुंड्रांकितमस्तकः ॥
भस्मोध्दूलितसर्वांगः काषायवसनांचितः ॥ १२३ ॥
पादपाथोजसंक्रांतोदारपाटीरपादुकः ॥
कमंडलुकरः कांतकांतिसंतानसंवृतः ॥ १२४ ॥
गुरुरूपधरः शंभुः समागत्य समब्रवीत् ॥
वत्सोत्तिष्ठ किमर्थं त्वं करोषि व्यसनं महत् ॥ १२५ ॥
त्यज चिंतां भव स्वस्थमनाः संकथयामि ते ॥
उपायमेकं तेनैव त्वत्कार्यं सुलभं भवेत् ॥ १२६ ॥

---

१२१ हे गुरू, माझ्या मनाची काळजी नाहींशी कर, हे दियानिधे तूंच माझा रक्षक आहेस, हे अनघा [ पापरहित ] तुझ्या शिवाय मला दुसरा कोणीही नाहीं,

१२२ याप्रमाणें ज्या वेळीं गुरुध्यानामुळें डोळे झांकले त्यावेळीं त्या पुण्यवान् यजमानानें एक उत्तम स्वप्न पाहिलें.

१२३ त्या स्वप्नांत— विजेप्रमाणें प्रकाशमान् जटाधारी, कपाळास त्रिपुंड्धारण केलेला, सर्वांगास भस्मोध्दूलन केलेला, भगवी वस्त्रें धारण केलेला

१२४ पदकमलांत खडाव घातलेला, हातांत कमंडलु असलेला, सौम्य व मनोहर अशा देह कांतियुक्त,

१२५ अशा प्रकारचे गुरुरुप धारण केलेला, शंभू येऊन त्यांनीं सांगितलें कीं:—' हे वत्स, ऊठ तूं कशाकारितां ही एवढी मोठी काळजी करीत आहेस ?

१२६ ही काळजी सोड, शांत मनाचा हो. तुला एक उत्तम असा उपाय सांगतों. त्या उपायानें तुझें कार्य सहज होईल.

विवाहाय समायाता ये ये माहेशपुंगवाः ॥
तेषामेकैककौपीनं समादाय सुचिन्हितम् ॥ १२७ ॥
एधःसम्यक्समिद्धाग्निकुंडे निक्षिप निर्भयम् ॥
यस्याधिकारिणः किंचिदपि कौपीनमग्निना ॥ १२८ ॥
दग्धं न हि भवेत्तस्य मर्यादां प्रथमां कुरु ॥
इत्युक्त्वान्तर्दधे शंभुस्ततो जागरितोऽभवत् ॥ १२९ ॥
गुरुर्भक्तानुकंपीति प्रोच्यते यद्बुधोत्तमैः ॥
तत्सत्यं वर्तते यस्मादीदृशोऽनुभवो मम ॥ १३० ॥
इति हृष्ट्वा समुत्थाय शयनाद्धनिकाग्रणीः ॥
स्नानाचमानपूजादिं दिनोदयकृतिं कृती ॥ १३१ ॥
समाप्य च समागत्य सभास्थानमतंद्रधीः ॥
सकलानां सदस्यानां पुरः प्रथमपूजनम् ॥ १३२ ॥

---

१२७ या लग्न कार्याकरितां ज्या ज्या माहेश्वर मूर्ति आल्या आहेत, त्या त्या माहेश्वर मूर्तींची त्यांच्या नांवाची खूण केलेली एकेक कौपिन [ लंगोटी ] घेऊन,

१२८–१२९ लाकडांनीं प्रदीप्त झालेल्या अग्निकुंडांत निर्भयपणें टाक. ज्या अधिकाऱ्यांची कौपीन अग्नीनें थोडीसुद्धां जळली जाणार नाहीं, त्या अधिकाऱ्यांची पूजा संभावना वगैरे कर, असें सांगून तो शिव अंतर्धान पावला, नंतर यजमान जागा झाला.

१३० ‘ गुरु भक्तांविषयीं प्रेमाळु ’ असें शहाणे लोक जें बोलतात, तें खरेंच आहे. कारण मला असा अनुभव नुकताच आला आहे.

१३१–१३२ असें ह्मणून तो यजमान् अंथरुणावरून उठून प्रातःकाळीं करावयाचीं स्नान, आचमन पूजा वगैरे कृत्यें करून, सभास्थानीं येऊन, आळस-रहित होऊन सर्व सभासदांच्या पुढें अग्र पूजा,

यदा विधातुमुद्युक्तस्तदा गुरुगणोदितम् ॥
पुनः कलकलं शृत्वा जगादोच्चैर्धनाधिपः ॥ १३३ ॥

भो भो गुरुवरा यूयमसाधुजनसेवितम् ॥
स्वस्वमात्सर्यमुत्सार्य शृणुतास्मद्वचो हितम् ॥ १३४ ॥

कलहेन कलंकः स्याद्युष्माकं न च गौरवम् ॥
अतः समाहितस्वांताः स्वीयं यच्छत वाग्यतः ॥ १३५ ॥

कौपीनमेकमेकं तदात्मचिन्हांकितं मम ॥
तानि सर्वाणि युष्माकं समक्षं सदसश्च वै ॥ १३६ ॥

एधोभिः प्रज्वलद्वन्हिकुंडमध्ये क्षिपाम्यहम् ॥
ज्वलज्ज्वालाग्निसंदग्धं कौपीनं यस्य नो भवेत् ॥ १३७ ॥

---

१३३ करण्यास जेव्हां तो यजमान् तयार झाला तेव्हां त्या गुरुसमूहांत उत्पन्न झालेला तो गोंधळ पुन्हां ऐकून त्यानें पुन्हां जोरानें सांगितलें.

१३४ ‘ हे गुरुश्रेष्ठ हो ’ सामान्य लोकांकडून आचरणांत येणारी ही आपापली मत्सरी वागणूक तुह्मी सोडून हितकारक असें माझें भाषण ऐका.

१३५–१३६ या गोंधळामुळें तुह्मांला काळिमाच लागेल, गौरव प्राप्त होणार नाहीं त्याकरितां शांत मनाचे होऊन मुकाट्यानें तुमच्या तुमच्या नांवाची खूण असलेली एकेक कौपिन [ लंगोटी ] मला द्या. त्या सर्व कौपिन तुमच्या व सर्व सभासदांचे समक्ष,

१३७ लाकडांनीं प्रदीप्त झालेल्या अग्निकुंडांत टाकतों. ज्या गुरूंची कौपिन प्रज्वलित अग्नीनें थोडीही जळली जाणार नाहीं,

स एवार्हो भवत्यग्रसपर्यायाः सभागृहे ॥
नान्यथेति वचस्तस्य विषमिश्रामृतोपमम् ॥ १३८ ॥
शृत्वा हित्वैकमुनिपं सर्वे गुरुवरास्तदा ॥
स्वर्भानुग्रस्तशीतांशु जिग्युरात्ममुखेंदुना ॥ १३९ ॥
ततः साध्वसमुद्भूतमनुद्भाव्य बहिर्धृतिम् ॥
प्रकटय्य पटीयांस इव ते तान्यथो ददुः ॥ १४० ॥
चन्ननंदी शिवाचार्योऽप्यदात्कौपीनमात्तमुत् ॥
अजिताक्षस्य या भीतिः सा कुतो नूर्ध्वरेतसः ॥ १४१ ॥
तैः प्रदत्तानि कौपीनान्यखिलानि गृहाधिपः ॥
सभ्यानां च गुरूणां च समक्षं वन्हिसाद्व्यधात् ॥ १४२ ॥

---

१३८ असा तोच गुरु या सभेंत अग्रपूजेला योग्य ठरणार. दुसरा ठरणार नाहीं. असें त्या यजमानाचें विषामिश्रित अशा अमृताप्रमाणें भाषण—

१३९ ऐकून, एका महर्षि चन्नबसवांना सोडून सर्व गुरुश्रेष्ठ त्या वेळीं आपल्या मुखचंद्रानें राहूनें ग्रस्त झालेल्या चंद्राला जिंकते झाले. ( त्या इतर गुरुवर्यांचीं तोंडें यजमानाच्या या भाषणानें काळीं पडलीं )

१४० तरीही भित्रेपणा उघड न करतां, मोठ्या नेटानें धैर्य प्रकट करून, त्या गुरुवर्यांनीं नंतर आपापल्या कौपिन चिन्हित करून दिल्या.

१४१ त्या चन्नबसव शिवाचार्यांनींही उत्तम अशी आपली कौपिन दिली. कारण इंद्रिय दमन न करणाऱ्या लोकांना जें भय असतें तें भय जितेंद्रियांना कोठून असणार ?

१४२ त्या यजमानानें सर्व गुरुवर्यांकडून दिल्या गेलेल्या कौपिन, त्यांच्या व सर्व सभासदांच्या समक्ष त्या प्रदीप्त अशा अग्निकुंडांत टाकल्या.

एधोभिर्वर्धितज्वालाजालकंदलतुंदिलः ॥
उषर्बुधस्तदा चात्मसात्कृतान्यखिलान्यपि ॥ १४३ ॥
हित्वा कौपीनमेकं तु बुभुजे सदसः पुरः ॥
क्षुधार्दितः पुमान् पिंडे पायसे विषखंडवत् ॥ १४४ ॥
दाह्याभावाद्भसनाऽग्निरवशिष्टो यदाऽभवत् ॥
तदा पश्यत्सु सभ्येषु शोधिताद्भस्मराशितः ॥ १४५ ॥
उज्जहार गृहाधीशश्चैकं कौपीनमंजसा ॥
अदग्धममलं स्निग्धं यथापूर्वं तथास्थितम् ॥ १४६ ॥
दृष्ट्वा कौपीनमत्रत्या जना विस्तृतविस्मयाः ॥
कस्येदं पुण्यमूर्तेः स्यादहो स तु धराशिवः ॥ १४७ ॥

---

१४३–१४४ लाकडे जास्त घातल्यामुळें अतिशय जोरानें पेटलेल्या ज्वालांनीं पुष्ट झालेल्या त्या प्रदीप्त अग्नीनें त्यावेळीं-भुकेलेला मनुष्य आपल्यापुढें असलेल्या खिरींतील विषाचा कण सोडून बाकी सर्व खीर खाऊन टाकतो त्या प्रमाणें— विषकणाप्रमाणें असलेली कोणा एका महात्म्याची कौपिन सोडून बाकीच्या सर्व कौपिन खाऊन भस्म केल्या ( जाळून टाकल्या. )

१४५ जळणारी लाकडे संपल्यानें अग्नी राख रूपानें राहिला, तेव्हां सर्व सभासद पहात असतां तपासल्या जाणाऱ्या भस्म राशींपासून.

१४६ त्या यजमानानें एक कौपिन बाहेर काढली. ती कौपिन थोडी-सुद्धां जळाली नव्हती, इतकेंच नव्हें पण नुसती मलीनही झालेली नव्हती, स्वच्छ होतीं, फार काय अग्नींत टाकण्यापूर्वी जशी होती तशीच होती.

१४७ तेथें असलेल्या सर्व लोकांनीं ती कौपिन पाहून अतिशय आश्चर्यचकित होऊन, ते ह्मणाले " ही कौपिन कोणत्या पुण्यवान् मूर्तीची असावी ! तो पृथ्वीतलावरील प्रत्यक्ष शिवच असला पाहिजे,

वयं भवेम तत्पादपांसुभिश्चाप्यपांसवः ॥
इति तस्येक्षणौत्सुक्यविशिष्टा अभवन्नितः ॥ १४८ ॥
ममेदं स्यादिति स्वांते जहर्षुर्गुरुपुंगवाः ॥
ततः परीक्षिते तस्मिन् कौपीने सदसि स्थितैः ॥ १४९ ॥
पूर्वं कृतेन चिन्हेन चाक्लिष्टेन महौजसः ॥
चन्नबसवशिवाचार्यस्यैवेदमिति निश्चितम् ॥ १५० ॥
प्रमोदो न ममौ तस्य सदसः कुक्षिकोटरे ॥
यजमानस्तु हर्षातिरेकान्नर्तनमातनोत् ॥ १५१ ॥
अहो तपःप्रभावोऽस्य शिवाचार्यशिखामणेः ॥
यत्कौपीनमपि स्प्रष्टुं नालमासीध्दुताशनः ॥ १५२ ॥

---

१४८ आह्मी त्या पुण्य मूर्तींच्या पदरजांनीं पापरहित होऊं" अशा प्रकारें ते लोक ती मूर्ति पाहण्यास अतिशय उत्सुक झाले.

१४९ इकडे ते सर्व गुरुश्रेष्ठ ती कौपिन ' माझीच असावी, माझीच असावी ' अशा भावनेनें मनांत आनंदित होत होते. तिकडे सर्व सभासद त्या कौपिनची परीक्षा करीत असतां.

१५० पूर्वी केलेल्या खुणेंत किंचितही वदल न होण्यानें ही कौपिन महा तेजस्वी अशा चन्नबसव शिवाचार्यांचीच आहे. असें निश्चित झालें.

१५१ त्यावेळीं तेथें असलेल्या सर्व सभासदांचें पोटांत हर्ष मावेनासा झाला. यजमान् तर अत्यानंदानें नाचूं लागला.

१५२ ज्या महात्म्याची कौपिनसुद्धां स्पर्श करण्यास ज्या कारणानें हुताशनी ( अग्नी ) असमर्थ झाला. अशा शिवाचार्य शिखामणी चन्नबसव स्वामींच्या अहो, हें तपश्चर्येचें सामर्थ्य,

अहो गांभीर्यमप्यस्य सागरादतिरिच्यते ॥
यं गौरवशशांकोऽपि विकारयितुमक्षमः ॥ १५३ ॥

ब्राह्मं तेजोऽस्य देवस्य पावकादपि पावकम् ॥
यस्य कौपीनसंस्पर्शात्पावकत्वमगादिव ॥ १५४ ॥

अस्य श्रीगुरुवर्यस्य पादपंकेजदर्शनम् ॥
देहभाजां पूर्वपुण्यं सुष्ठु सूचयति स्वकम् ॥ १५५ ॥

ईदृशोदारमहिमागाराणां गुणिनां सताम् ॥
पादस्पर्शनमात्रेण सत्क्षेत्रं भवति क्षितिः ॥ १५६ ॥

अवगाह्यजलं तीर्थं गंगादिसदृशं भुवि ॥
कल्मषापक्षयद्वारा जन्मिनां जन्ममुक्तये ॥ १५७ ॥

---

१५३ अहो, या तपोनिधि शिवाचार्यांचा गंभीरपणा समुद्रापेक्षां वरचढ आहे. कारण—गौरवरूपी चंद्रसुद्धां महिमाशाली गुरूत्तमाचें ठिकाणीं विकार उत्पन्न करण्यास असमर्थ झाला.

१५४ या महात्म्याचें ब्रह्मतेज अग्नीपेक्षांही पवित्र असें आहे, कारण या महात्म्याच्या कौपिनचा पवित्रपणा जणों स्पर्श करण्यानें अग्नीला प्राप्त झाला कीं काय ? असें दिसतें.

१५५ या श्रीगुरुवर्यांच्या पदकमलांचें दर्शन हें प्राण्यांचें आपापलें पूर्व पुण्यच सुचवीत आहे.

१५६ अशा उदार, महिमाशाली, व सद्गुणमंडित सज्जनांच्या केवळ पादस्पर्शानें पादस्पर्शितभूमि उत्तम क्षेत्र ह्मणविली जाते.

१५७ तपोनिधि अशा आचार्यांनीं स्नान केलेलें जलाशय गंगादि तीर्थांच्या बरोबरीचें तीर्थ होतें, इतकेंच नव्हे तर त्या जलाशयाचें स्नान, पान केलेल्या प्राण्यांना— पाप नाश करून— मोक्ष प्राप्त करून देतें.

ईदृशस्येक्षणादेव नरो देवत्वमश्नुते ॥
रससंस्पर्शमात्रेण यथा ताम्रः सुवर्णताम् ॥ १५८ ॥
आसीत्पुरा विज्ञवाडपुरे कृष्णानदीतटे ॥
पदवाक्यप्रमाणज्ञः श्रीमान् श्रीपतिपंडितः ॥ १५९ ॥
बादरायणसूत्राणां भाष्यं श्रीकरनामकम् ॥
ब्रह्मणः शक्तिवैशिष्ट्यबोधकम् योऽतनोत्सुधीः ॥ १६० ॥
श्रीमत्त्रिलिंगदेशेशोऽनंतपालाभिधो महान् ॥
राजा विपश्चितो यस्य शिष्योऽभूदमितौजसः ॥ १६१ ॥
एकदाऽनंतपालस्य भूपालस्य पुरः सुधीः ॥
प्रज्वलद्वन्हिसत्पिंडं मृत्पिंडमिव वाससा ॥ १६२ ॥
सम्यक् निबध्य वृक्षस्य शाखाग्रालंबिनं चिरम् ॥
विधाय वैष्णवादीनामन्येषां प्रतिवादिनाम् ॥ १६३ ॥

---

१५८ सिद्धरस स्पर्शानें तांब्याचें सोनें झाल्याप्रमाणें अमेय, [इतकेंच असें सांगण्यास कठीण] महिमावान् अशा सज्जनांच्या कटाक्षपातानें [पाहण्यानें] मनुष्य देवत्व पावतो.

१५९ पूर्वी कृष्णानदीच्या कांठीं विजवाड (बेझवाडा) नांवाचें शहरांत पदवाक्य प्रमाणज्ञ व श्रीमान् असा श्रीपति पंडित नांवाचा महापंडित होता.

१६० ज्या पंडितानें व्यासमहर्षिप्रणीत ब्रह्ममीमांसासूत्रांना ब्रह्माचें शक्तिवैशिष्ट्य बोधक असें श्रीकर नांवाचें भाष्य रचिलें आहे,

१६१ श्रीमान् तेलंग देशचा राजा अनंतपाल नांवाचा महाराज, ह्या महा तेजस्वी पंडिताचा शिष्य होता.

१६२ एके दिवशीं त्या अनंतपाल महाराजांच्या समोर तो श्रीपति पंडित मातीच्या गोळ्या प्रमाणें– जळत असलेला– अग्नीचा गोळा कापडानें

१६३ उत्तम तऱ्हेनें बांधून एका झाडाच्या फांदीच्या टोंकाला चिरकाल लोंबकळत सोडून प्रतिवादी असे इतर वैष्णवादिकांचा

कृत्वा तु मुखभंगं तान् शिष्यानप्यकरोदिति ॥
प्रज्ञोक्तं श्रुतमस्माभिरिदानीं चाक्षुषं कृतम् ॥ १६४ ॥

इत्यादिभिर्मनोल्हादैर्वचनैर्वचनातिगम् ॥
महिमानं महोदारचेतसः शिवयोगिनः ॥ १६५ ॥

श्रद्धाभक्तिलतायुग्मवेष्टितस्वांतभूरुहः ॥
स्तावं स्तावं मुदं प्रापुरसामान्यां सभासदः ॥ १६६ ॥

चरपट्टाधिपाश्चापि परोत्कर्षासहिष्णुताम् ॥
त्यक्त्वा बव्रतिरेऽत्यंतं भक्तिनम्रा मुनीश्वरे ॥ १६७ ॥

ततो निकेतनाधीशो भव्यभक्तिभरान्वितः ॥
बहुमूल्यानि दिव्यानि कौशेयान्यंबराणि च ॥ १६८ ॥

---

१६४ मुखभंग करून, त्यांना आपले शिष्य करून घेतलें, अशी शहाण्या लोकांकडून सांगण्यांत आलेली गोष्ट आह्मी ऐकली होती, परंतु आतां यावेळीं मात्र तें प्रत्यक्ष पाहण्यांत आलें.

१६५ इत्यादि मनोहर भाषणांनीं महातेजस्वी अशा शिवयोगी चन्नबसव गुरूचें वाचातीत अशा महत्त्वाची—

१६६ ते सभासद—श्रद्धा, भक्तिरूपी लताद्वंद्वानें वेष्टिले गेलेले मनरूपी वृक्ष होऊन, अनेकवार स्तुति करून, असाधारण [ आतिशय ] असा संतोष पावले.

१६७ इतर चरपट्टाधिकारीही दुसऱ्याच्या उत्कर्षाबद्दल हेवा करणें हें सोडून मुनीश्वर अशा चन्नबसव स्वामीविषयीं भक्तीनें अतिशय नम्रपणानें वागूं लागले.

१६८ नंतर त्या यजमानानें भक्तिभावानें फार मोठ्या किंमतीचीं, दिव्य अशीं रेशमी पीतांबरादि वस्त्रें

भूषणानि च भूशंभोरुपहारीचकार सः ॥
चरपट्टाधिपानां च समूहं सुसमाहितः ॥ १६९ ॥
नूत्नांबरैरलंकारैर्यथायोग्यमपूपुजत् ॥
अथैनं धनिम्रर्धन्यमितरैर्गुरुभिस्सह ॥ १७० ॥
आशिषा वेदमंत्रैः संभावयामास देशिकः ॥
यजमानो विवाहार्थमागतं गुरुपुंगवम् ॥ १७१ ॥
गुरुवर्गेणेतरेण प्रेषयामास सादरम् ॥
ततश्चन्नवृषाधीशो गच्छन् सन् स्वपुरं प्रति ॥ १७२ ॥
अकिंचनतयाऽऽर्तानां दृष्टानां पथि गच्छताम् ॥
जनानां धनिदत्तानि बहुमूल्यानि तानि सः ॥ १७३ ॥
दिव्यांबराण्यलंकारांश्चायच्छदनुकंपया ॥
स्रक्चंदनादिविषयान् लौकिकान् मलवत्सदा ॥ १७४ ॥

---

१६९ व भूषणेंही त्या भूशिंवाला [ चन्नबसवाला ] काणिकेच्या रूपानें अर्पण केलीं. इतर चरपट्टाधिकाऱ्यांनाही सुप्रसन्न व श्रद्धायुक्त मनानें,

१७०–१७१ नवीन वस्त्रें व भूषणें—त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें पूजा करून-त्यांना अर्पण केलीं. नंतर गुरूत्तम अशा चन्नबसव महर्षींनीं इतर गुरुवर्गांसह वेदमंत्रांनीं धनिक व श्रेष्ठ अशा यजमानाला आशीर्वाद दिला. यजमानानेंसुद्धां विवाहास आलेल्या श्रीगुरुपुंगव अशा चन्नबसव स्वामींना,

१७२ इतर गुरुवर्गांसह मोठ्या प्रेमानें पाठविलें. नंतर चन्नबसव शिवाचार्य हे आपल्या गांवाकडे जात असतां,

१७३ वाटेनें जाणाऱ्या, गरिबीनें गांजलेले दिसलेल्या अशा लोकांना त्या श्रीमान् यजमानांनीं दिलेलीं मुल्यवान्.

१७४ अशीं उंची वस्त्रें, भूषणें त्या आचार्यांनीं देऊन टाकिलीं लौकिक असे स्रक्चंदनादि विषयांना मलाप्रमाणें नेहमीं

मन्यमाना महात्मानः संग्रहिष्यंति तान्न हि ॥
गच्छंतं चन्नबसवं पश्चात्कृत्य हठात्पथि ॥ १७५ ॥
तत्कीर्तिः पुरतोऽगच्छद्वदंतीव तदागमम् ॥
सुखेनागत्य भूशंभुः स्वमठे सुखसंपुटे ॥
तस्थौ यथा पुरा लिंगपूजासक्तहृदंबुजः ॥ १७६ ॥
रक्षताद्गिरिजा देवी महादेवी महेश्वरी ॥
दयाघनकटाक्षेण मां सदा शरणागतम् ॥ १७७ ॥

—❁ इति षष्ठोऽध्यायः ❁—

---

१७५ जाणणारे महात्मे सज्जन लोक लौकिक विषयांचा केव्हांही संग्रह करीत नाहींत. वाटेनें जाणाऱ्या त्या चन्नबसव शिवाचार्यांना बळात्कारानें मागें सारून,

१७६ त्या यतिश्रेष्ठांची कीर्ति जणों त्यांचें आगमन लोकांना सुचविण्या करितांच कीं काय पुढें गेली. भूशंभू असे ते महर्षि आपल्या गांवीं येऊन सुखाचें स्थान अशा आपल्या त्या बृहन्मठांत पूर्वीप्रमाणें लिंगपूजेंत मग्न होऊन राहिले.

१७७ महादेवी, पर्वतकन्या, परमेश्वरी अशी पार्वती शरणागत अशा माझें– कृपादृष्टीनें– नेहमीं रक्षण करो.

— ० अध्याय सहावा समाप्त. ०—

॥ श्रीरस्तु ॥

ॐनमः पंचजगद्गुरुभ्यः

## श्री. ष. ब्र. चन्नबसव विजय पुराणम्



## श्रीरस्तु अथ सप्तमोऽध्यायः शिवमस्तु

इंद्रादयः सुरा यस्य शाटीपालनतत्पराः ॥
देवतासार्वभौमं तं प्रणमामि सदाशिवम् ॥ १ ॥
होट्गिगीस्थमठस्यास्य बोरामण्यादिपल्लिषु ॥
शाखामठाः शरीरस्य द्वाराणीव नवाबभुः ॥ २ ॥
तत्र तत्रस्थशिष्याणां योगक्षेमविमर्शनम् ॥
सद्धर्मबोधनद्वारा कुर्वन् प्रीत्या तदा तदा ॥ ३ ॥

---

१ इंद्रादि देव ज्या परमेश्वराचे वस्त्र रक्षणाचेंठिकाणीं आसक्त झालेले असतात अशा त्या देवतासार्वभौम शिवाला माझा नेहमीं नमस्कार असो.

२ शरिराला जशीं नऊ द्वारें आहेत त्याप्रमाणें या होटगी बृहन्मठालासुद्धां बोरामणी वगैरे गांवांत नऊ ( पोट शाखा ) मठ आहेत.

३ त्या त्या गांवांत राहणाऱ्या शिष्यांचे योगक्षेमासंबंधीं विचारपूस, त्या त्या वेळीं प्रेमानें सद्धर्म बोधनद्वारा करीत,

भक्तानां यत्सुखं तत्तु सुखं स्वस्येति भावयन् ॥
भक्तात्मा भक्तकल्पद्रुश्चन्नबसवनंदी व्यराजत ॥ ४ ॥
जातु चिन्माघमासे स्वभक्तानामभिलाषतः ॥
स्वीये बृहन्मठे श्रीमान् शिवाचार्यः शिवव्रती ॥ ५ ॥
रेणुकागस्त्यसंवादं शैवसिद्धांतबोधकम् ॥
शिवयोगिशिवाचार्यप्रणीतं ग्रंथमुत्तमम् ॥ ६ ॥
प्रारभ्य प्रत्यहं तेजस्व्यमृतस्यंदसुंदरैः ॥
वचनैर्बोधयन्नासीच्छ्रोतृश्रुतिसुखंकरैः ॥ ७ ॥
तदानीमागमन्माघकृष्णपक्षचतुर्दशी ॥
तद्रात्रिः शिवरात्रिश्चेत्याख्याताऽखिलभारते ॥ ८ ॥
अहन्युपोष्य चासायमाप्रभातं कृतव्रती ॥
सुस्नातः शुद्धवस्त्रः सन्नुध्दूलनपुरःसरम् ॥ ९ ॥

---

४ 'भक्तांचें जें सुख तेंच आपलें सुख' अशा भावनेनेंयुक्त, भक्तात्मा, भक्तांना कल्पवृक्ष झालेला असा चन्नबसव स्वामी विराजमान् होता.

५ एके काळीं माघ मासांत आपल्या भक्तांच्या इच्छेनुसार आपल्या बृहन्मठांत, श्रीमान् शिवव्रती अशा शिवाचार्य,

६ शिव सिद्धांताचा उपदेश करणारा श्री शिवयोगी शिवाचार्यांकडून रचला गेलेला, असा 'रेणुक अगस्ति संवाद' नांवाचा उत्तम ग्रंथ.

७ सांगण्यास आरंभ करून, दररोज तेजस्वी असा चन्नबसव गुरु अमृताचा वर्षाव करणाऱ्या व सुंदर अशा वाक्यांनीं उपदेश करीत होता.

८ त्यावेळीं माघ मासाच्या कृष्ण पक्षांतील चतुर्दशी [ १४ ] तिथि आली. या चतुर्दशीची रात्र महाशिवरात्र म्हणून सर्व भरतखंडांत प्रसिद्ध होऊन राहिली आहे.

९ त्या दिवशीं दिवसा उपवासी राहून, संध्याकाळपासून सकाळपर्यंत व्रतस्थ राहून, स्नान करून, शुद्ध वस्त्र नेसून, भस्मोध्दूलनपूर्वक.

जलार्द्रभस्मना भाले ऋजुदीर्घत्रिपुंड्रकैः ॥
भूषितो धृतरुद्राक्षः पूजोपकरणैर्युतः ॥ १० ॥
पंचब्रह्ममयैर्मंत्रैः शतरुद्रीयमंत्रकैः ॥
गोक्षीरस्याथवा शुद्धतोयस्याच्छिन्नधारया ॥ ११ ॥
अभिषिच्य शिवं सांबं लिंगमूर्तिमतंद्रितः ॥
भस्मगंधाक्षतैर्बिल्वैरच्छिद्रैः कोमलैः शुभैः ॥ १२ ॥
कर्णिकारादिभिः पुष्पैर्नवैर्गंधमनोहरैः ॥
धूपैर्दीपैश्च नैवेद्यतांबूलांतैश्च पूजनैः ॥ १३ ॥
पूजयेत्परया भक्त्या स शिवत्वं समश्नुते ॥
इत्याप्तवचनेष्वाप्तश्रद्धाः शैवा अतंद्रिताः ॥ १४ ॥
आचरंत्यखिले देशे शिवरात्रिमहाव्रतम् ॥
तथैव होट्टिगिग्रामे तद्व्रताचारतत्परैः ॥ १५ ॥

---

१० जलमिश्र भस्मानें लांब व सरळ असें त्रिपुंड्र कपाळावर लावून, रुद्राक्ष धारण करून, पूजासामग्रीसह.

११ पंचब्रह्म मंत्रांनीं, शतरुद्रीय मंत्रांनीं, गाईचें दूध अथवा शुद्ध पाणी यांच्या अखंड धारेनें.

१२ लिंगमूर्ति अशा सांबशिवाला निरालसपणें अभिषेक करून; भस्म, गंध, अक्षतांनीं अच्छिद्र, कोमळ, शुभ अशीं बिल्वदळें,

१३–१४ सुवासांनींयुक्त व नवीन अशीं कर्णिकारादि फुलें, धूप, दीप, नैवेद्य, तांबूल वगैरे उपचारांनीं, अतिशय भक्तिपूर्वक पूजा करावी. अशी पूजा करणारा तो शिवस्वरूपी होतो. असें आप्तवचनावर [शास्त्रांवर] श्रद्धा असणारे व आलस्यरहित असे शैव,

१५ सर्व भरत खंडांत हें शिवरात्री महाव्रताचें आचरण करितात. त्याप्रमाणें होटगी गांवांत त्या महाशिवरात्रीव्रताविषयीं तत्पर,

स्वस्वगेहे यथाशास्त्रमिष्टलिंगप्रपूजनम् ॥
वीरमाहेश्वरार्चां च विधायोपोषणान्वितैः ॥ १६ ॥
त्रियामायां समायातैः पुराणश्रवणेच्छया ॥
भस्मना सजलेनाच्छत्रिपुंड्रोद्भासिताननैः ॥ १७ ॥
गुरुध्यानजलोध्दूतस्वांतकल्मषकज्जलैः ॥
पौरैराबालवृद्धैश्च नरनारीजनैर्भृशम् ॥ १८ ॥
सुदंतुरे सभास्थाने व्यासपीठे महोन्नते ॥
सायमाराधितस्वेष्टलिंगो लिंगार्चनागृहात् ॥ १९ ॥
उत्थितान् जयशब्दांकमुखपद्मान् सभासदः ॥
समंदहासमधुरैर्वचनैरानयन्मुदम् ॥ २० ॥
समागत्य समासीनः शमवद्यमिशेखरः ॥
प्राच्यां महेंद्रशैलेंद्रशृंगे चंद्र इवाबभौ ॥ २१ ॥

---

१६ आपापल्या घरीं यथाशास्त्र इष्टलिंग पूजा व वीर माहेश्वरांची ( जंगमांची ) पूजा करून उपोषित राहिलेले,

१७ पुराण ऐकण्याच्या इच्छेनें रात्रीं आलेले जलमिश्रित भस्मानें लावलेल्या त्रिपुंड्रयुक्त मुखाचे,

१८ गुरूंचे ध्यानरूपी जलानें धुतल्यानें मनाचे सर्व किल्मिशरूपी कज्जल ( काजळी ) नाहींसें झालेलें, आबाल-वृद्ध अशा गांवांतील स्त्री-पुरुषांनीं अत्यंत,

१९ चिक्कार भरलेल्या सभेंत उच्च अशा व्यास पीठावर, संध्याकाळीं श्रेष्ठ अशीं लिंगपूजा उरकून, शिवपूजा गृहांतून,

२० येणाऱ्या त्या आचार्यांना पाहून उठून उभे राहिलेले व जयघोष करणाऱ्या सभासदांना मंदहास्ययुक्त, मधुर भाषणांनीं आनंदित करीत, येऊन

२१ बसलेले जितेंद्रिय श्रेष्ठ असे ते शिवाचार्य पूर्वेकडील महेंद्र पर्वताचें शिखराचा अवलंब केलेल्या चंद्राप्रमाणें शोभायमान् झाले.

ध्यात्वा सांबं हृदंभोजे कृत्वा गुरुनमस्कृतिम् ॥
प्रागुक्तमुक्तविषयं पुनर्वक्तुमुपाक्रमत् ॥ २२ ॥
अनेकजन्मसंभूतैर्धर्मैर्विध्वस्तकल्मषः ॥
निर्मलस्वांत आत्माऽयं पिंड इत्यभिधीयते ॥ २३ ॥
शिवशक्तिसमुद्भूते विश्वेऽस्मिन् स विशिष्यते ॥
शुद्धत्वात्क्षीणपापत्वात्पात्रत्वादात्मसंविदः ॥ २४ ॥
जीवानां चोदकः सांबो यंतेव रथवाजिनाम् ॥
विज्ञानाद्वा तथा योगाद्भोगाद्वा ध्वस्तवासनः ॥ २५ ॥
सांबस्यानुग्रहाद्देही शुद्धस्वांतो भविष्यति ॥
परिशुद्धांतरंगेऽस्मिन् शैवी भक्तिः प्रजायते ॥ २६ ॥

---

२२ अंतःकरणांत शिवाचें ध्यान करून, गुरूंना नमस्कार करून, काल संपलेल्या विषयाच्यापुढील विषय सांगण्यास सुरवात केली.

२३ अनेक जन्मांतील सद्धर्माचरणांनीं पापाचा नाश झालेली, निर्मळ अंतःकरणी अशा आत्म्याला ' पिंड ' असें ह्मणतात.

२४ शिव आणि शक्ति उत्पन्न झालेल्या या जगांत पिंड नांवाचा जीव शुद्धपणा, पापाचा नाश, व आत्मज्ञानास योग्य या गुणांमुळें सर्वश्रेष्ठ ह्मणविला जातो.

२५ रथ व घोडे यांना हाकणारा जसा प्रेरक होता त्याप्रमाणें सर्व जीवांना ईश्वर हा प्रेरक आहे. ज्ञान, योग, भोग यांपैकीं कोणत्याही एकानें, वासनांचा नाश झालेला

२६ असा प्राणी शिवाच्या अनुग्रहानें निर्मळ अंतःकरणाचा होतो. या निर्मळ अंतःकरणांत शिवासंबंधीं भक्ति उत्पन्न होतें.

सोऽयं जीवो भवेदंत्यशरीरः पिंडसंज्ञकः ॥
शरीरात्मविवेकेन पिंडज्ञानी स उच्यते ॥ २७ ॥
नात्मा देहो न चाक्षाणि नाहंकारो न धीरपि ॥
द्रष्टृत्वादपि साक्षित्वादात्मा तेभ्योऽतिरिच्यते ॥ २८ ॥
इत्यनात्मात्मभेदस्तु सुदृढो यस्य वर्तते ॥
निगमागमशास्त्रज्ञैः पिंडज्ञानी स ईर्यते ॥ २९ ॥
कर्मणाऽनेकरूपाणि शरीराण्यस्थिराणि च ॥
आत्माऽसावाश्रितो नित्यमिति विद्वद्विनिश्चयः ॥ ३० ॥
देहाद्भिन्नोऽयमात्मेति चात्मनो भिन्न ईश्वरः ॥
चोदकश्चेति यो वेत्ति पिंडज्ञानी स उच्यते ॥ ३१ ॥

---

२७ तो हा पिंड नांवाचा जीव अंत्य शरीरी ( यापुढें त्याला शरीर राहणार नाहीं असा-मुक्त ] होतो. तो ज़ीव, शरीर व आत्मा यांच्या विचारानेंच ' पिंडज्ञानी ' ह्मणवितो.

२८ देह हा आत्मा नव्हे, तसेच इंद्रियें हीं हीं आत्मा नव्हेत, अहंकार-आत्मानव्हे, बुद्धी-आत्मानव्हे आत्मा हा द्रष्टा व साक्षी असल्यामुळें तो शरीर व़ अवयव़ यांहून भिन्न आहे.

२९ याप्रमाणें आत्मा, अनात्मा यांतील फरक ज्यानें पूर्णपणें जाणला आहे तोच निगमागम शास्त्रज्ञांकडून पिंडज्ञानी ह्मणविला जातो.

३० " कर्मानें आत्मा हा अस्थिर ( नाशवंत ) अशीं अनेक शरीरें नेहमीं धारण करीत असतो," असें विद्वानांचें ठाम ह्मणणें आहे.

३१ हा जीवात्मा शरिराहून भिन्न आहे. ईश्वर जीवाहून निराळा असून तो प्रेरक आहे. असें जो जाणतो तोच पिंडज्ञानी ह्मणाविला जातो.

बहुजन्मार्जितैः पुण्यैः प्रक्षीणमलसंततेः ॥
पुंसः संसारहेयत्वबुद्धिरुत्पद्यते किल ॥ ३२ ॥

क्षेत्रपुत्रादिसंभूते नश्वरे चैहिके सुखे ॥
स्वसौख्ये चापि धीरस्य कस्येच्छा स्यान्महीतले ॥ ३३ ॥

जातस्य मरणं जंतोर्मृतस्य नियता जनिः ॥
जन्ममृत्युद्वयेनासौ नित्यं भ्रमति चक्रवत् ॥ ३४ ॥

कर्मणां वशगो जीवो वर्णेषु ब्राह्मणादिषु ॥
जातस्तापत्रयारण्यवन्हिना परितप्यते ॥ ३५ ॥

कर्माश्रयं शरीरं तद्विना कर्म न तिष्ठति ॥
शरीरोपाधिजुष्टस्य कर्मबद्धस्य चात्मनः ॥ ३६ ॥

---

३२ अनेक जन्मांतून संपादन केलेल्या पुण्यापासून, पापांचा समूह नाश होत असतां पुरुषाला संसारांत हेय [ वैराग्य ] बुद्धि उत्पन्न होते.

३३ कारण-बायको, मुलें, बाळें वगैरे पासून उत्पन्न झालेल्या नश्वर [ नाशवंत ] अशा ऐहिक ( या लोकच्या ) सुखांविषयीं व स्वसुखांविषयीं या पृथ्वीतलावर कोणत्या बुद्धिमान् माणसाला इच्छा उत्पन्न होईल ? ( कोणालाहीं-होणार नाहीं. )

३४ उत्पन्न झालेल्या प्राण्याला मरण व मेलेल्याला पुनर्जन्म हीं निश्चित आहेत. हा जीव, जन्म व मृत्यु या द्वंद्वानें चक्राप्रमाणें भ्रमण करीत असतो.

३५ कर्माधीन झालेला जीव ब्राह्मणादि वर्णांमध्यें उत्पन्न होऊन आध्यात्मिक, आधिदैविक, आधिभौतिक, या तापत्रयरूपी अरण्याग्नीनें संतापला जातो.

३६ शरीर हें कर्माचें [ व्यवहाराचें ] आश्रयस्थान आहे. शरिरावांचून कर्म असूं शकत नाहीं. शरीररूपी उपाधीयुक्त व कर्मबद्ध अशा जीवात्म्याला,

स्वर्गे वा मर्त्यलोके वा विना दुःखं कुतः सुखम् ॥
सरःपंकावसक्तस्य करींद्रस्येव चापलात् ॥ ३७ ॥
स्वदंतौष्ण्यसमुद्भूतलालाक्लिन्नास्थिखंडतः ॥
सुखबुध्या यथा श्वाऽसौ विषयान्न निवर्तते ॥ ३८ ॥
विषयाः सुखदाश्चादावंते संतापहेतवः ॥
रोगार्तस्य यथाऽपत्थ्यपदार्था देहिनस्तथा ॥ ३९ ॥
यैर्नष्टान्मानवान् पश्यन्नपि तान्विषयानहो ॥
संसेव्य नश्यति प्राणी पतंग इव पावकम् ॥ ४० ॥

---

३७ अरण्यांत डवक्यांतील चिखलावर उगवलेलें गवत खाण्याकरितां जाऊन आंत ( चिखलांत ) फसलेल्या हत्तीप्रमाणें— या मृत्यूलोकांत किंवा स्वर्गलोकांतही दुःखाशिवाय सुख कोठून मिळणार ?

३८ हाडाच्या ठिकाणीं कोणत्याही प्रकारचा रस नसतांही– तें हाड चघळीत असतां स्वतांच्या तोंडांत उत्पन्न झालेली लाळ त्या हाडावर पडून जणों त्या हाडापासूनच हा [ लाळ ] रस उत्पन्न झाला आहे असें मानून तें हाड चघळण्याचें न सोडणाऱ्या कुत्र्याप्रमाणें जीवात्मा आपल्या जवळ असलेलें सुख हें संसारापासून उत्पन्न झालें आहे असें समजून संसारापासून निवृत्त होत नाहीं.

३९ रोगग्रस्ताला अपथ्य [ अयोग्य ] पदार्थ खातांना प्रथम ते सुखावह होतात परंतु तेच परिणामीं दुःखद ठरतात त्याप्रमाणें हे सर्व विषय संसारी माणसाला प्रथम सुखकारी वाटत असले तरी ते परिणामीं दुःखास कारणीभूत होतात.

४० अग्नीवर झडप घालण्यानें त्यांत जळून नाश होतो हें पहात असतांही पुन्हां त्या अग्नीवर झडप घालून नाश पावणाऱ्या इतर पतंगाप्रमाणें हा मनुष्य प्राणी-ज्या विषय सेवनापासून अनेक प्राणी नाशाप्रत गेलेले पाहून सुद्धां त्या विषयांचें सेवन करीत– आपणही नाशाप्रत जातो. अहो !

विण्मूत्रादिमलाकीर्णे पूर्णे दुःखैर्दुरासदैः ॥
तटिदीवास्थिरे देहे का रुचिस्तु विवेकिनः ॥ ४१ ॥

त्यक्त्वाऽनपायमानंदमात्मतत्त्वं चिदात्मकम् ॥
को वा रमेत देहेऽस्मिन् नश्वरे दुःखदूषिते ॥ ४२ ॥

बुद्धिमान् निर्मलस्वांतो निर्णीतात्मसुखोदयः ॥
कलत्रपुत्रमित्रेषु बांधवेषु धनेषु च । ४३ ॥

वर्णाश्रमेषु देहे च दुःखस्यात्यंतहेतुषु ॥
विनश्वरधियैतेषु वैराग्यं भजते बुधः ॥ ४४ ॥

विषयेष्वपरक्तस्य रक्तस्यात्मसुखोदये ॥
उत्साहो वर्धतेऽसारसंसारापनुदध्वनि ॥ ४५ ॥

---

४१ मलमूत्रादि घाणीनें व दुःसह अशा दुःखांनीं पूर्ण भरलेलें, व विजेप्रमाणें अस्थिर [ नाश पावणारें ] अशा शरिराविषयीं विचारी माणसाला कोणतें प्रेम असणार? ( कोणतेंही नाहीं )

४२ नाशरहित, आनंदरूपी, ज्ञानस्वरूपी असें आत्मतत्त्व सोडून दुःखानें दूषित झालेलें व नश्वर अशा या शरिराचेठिकाणीं कोणता बुद्धिमान् मनुष्य रममाण होतो? [ कोणीही नाहीं ]

४३-४४ शुद्ध अंतःकरणाचा, आत्मसुखाच्या उत्पत्ती-विषयीं निश्चित, अशा विचक्षण पंडिताला दुःखाला अतिशय कारणभूत असलेलीं बायका मुलें व मित्र इत्यादि बांधव, धन, वर्ण, आश्रम यांचे ठिकाणीं विनश्वर (नाशवंत) बुद्धीनें वैराग्यप्राप्त होतें.

४५ विषयांपासून परावृत्त झालेला व आत्मसुखोत्पत्तीचे ठिकाणीं श्रद्धा असलेला, अशा पुरुषाचे ठिकाणीं निःसार (नाशवंत) अशा संसाराला दूर करणाऱ्या मार्गाविषयीं उत्साह वाढत असतो.

निदाघे निर्जले मार्गे गच्छन् तृड्पीडितः पुमान् ॥
जलाशयमिवाशेषवेदिनं गुरुपुंगवम् ॥ ४६ ॥
सनातनसमायातवैदिकाचारवर्धकम् ॥
संजातसंशयग्रंथिसंभेदनबलावहम् ॥ ४७ ॥
सत्यादिसात्विकानेकधर्मोत्तरमघापहम् ॥
लिंगांगैक्यमहाज्ञानसुधांभोधिसुधाकरम् ॥ ४८ ॥
वीरमाहेश्वरं लिंगधारिणं भस्मभूषितम् ॥
समुपेत्य च साष्टांगं प्रणिपत्य च भृत्यवत् ॥ ४९ ॥
सेवेत परया भक्त्या गुरोर्यावत्कृपोदयम् ॥
गुरुणा सुप्रसन्नेन दीक्षासंस्कारपूर्वकम् ॥ ५० ॥
उपदिष्टो लिंगधारी पंचाक्षरजपोद्यमः ॥
भूतिरुद्राक्षसंयुक्तश्शिवभक्त इति स्मृतः ॥ ५१ ॥

---

४६-४७ उन्हाळ्यांत, निर्जल प्रदेशांतून जाणारा पुरुष तहानेनें व्याकूळ होऊन तळावाकडे जातो त्याप्रमाणें सर्वज्ञ, सनातन अशा वैदिक आचारांची वृद्धि करणारा, शिष्यांची संशय रूपी गांठ सोडण्याविशयीं समर्थ,

४८ सत्यादि अनेक सात्विक गुणांनीं श्रेष्ठ, अनुपम, लिंगांग सामरस्य ज्ञानरूपी समुद्राला चंद्राप्रमाणें,

४९ वीर माहेश्वर, लिंगधारी, भस्मभूषित अशा श्री गुरूंकडे जाऊन, सेवका प्रमाणें साष्टांग घालून.

५० गुरूंचे ठिकाणीं आपल्या विषयीं दया उत्पन्न होईपर्यंत त्यांची सेवा करावी. प्रसन्न झालेल्या गुरूंकडून दीक्षासंस्कारपूर्वक,

५१ उपदेश केला गेलेला, लिंगधारी, पंचाक्षरी मंत्राचा जप हाच उद्योग असलेला, विभूति, रुद्राक्ष धारण-करणारा असा पुरुष शिवभक्त म्हणविला जातो.

श्रवणं कीर्तनं शंभोः स्मरणं पादसेवनम् ॥
अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ ५२ ॥
एवं नवविधा भक्तिः प्रोक्ता देवेन शंभुना ॥
सुलभा कृतपुण्यानामपुण्यानां तु दुर्लभा ॥ ५३ ॥
विना भक्तिं नरो मुक्तिं ज्ञानेनाप्तुं य इच्छति ॥
कौपीरपोऽगुणात्कुंभादुद्धर्तुं स व्यवस्यति । ५४ ॥
शैवी भक्तिः स्थिरा यस्मिन् चंडाले वा द्विजोत्तमे ॥
प्रेयान् स एव सांबस्य नान्यो विप्रोऽथ वेतरः ॥ ५५ ॥
सा भक्तिर्भिद्यते द्वेधा बाह्याभ्यंतरभेदतः ॥
बाह्या स्थूलांऽऽतरा सूक्ष्मा शास्त्रज्ञैरुररीकृता ॥ ५६ ॥

---

५२ श्रवण, कीर्तन, शिवस्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य ( मैत्री ), आत्मनिवेदन,

५३ अशा प्रकारची नवविधा भक्ति, तेजस्वी शिवाकडून सांगतली आहे. ती पुण्यवंतांना अतिसुलभ असून पाप्यांना दुर्लभ आहे.

५४ भक्तिशिवाय जो केवळ ज्ञानानेंच मुक्ति मिळण्याची अपेक्षा करतो, तो दोरा-शिवाय नुसत्या घागरीनेंच आडांतील पाणी बाहेर काढण्याचा प्रयत्न करतो. असें होतें.

५५ ज्याच्या ठिकाणीं शिवभक्ति अतिशय स्थिर होऊन राहतें, तो चांडाळ असो अथवा ब्राह्मण असो शिवाला प्रिय होतो. भक्ति नसलेला चांडाळ असो अथवा ब्राह्मण अगर इतर कोणीही असो तो प्रिय होत नाहीं.

५६ ही भक्ति—‘ बाह्य व अभ्यंतर ’ अशी-दोन प्रकारची आहे. बाह्य भक्ति ही स्थूल भक्ति, व अंतर भक्ति ही सूक्ष्म भक्ति होय. असें शास्त्रज्ञांनीं अंगिकारिलें आहे.

सिंहासने सुरम्ये वा करकंजतलेऽथ वा ॥
या पूजा शिवलिंगस्य सा बाह्या भक्तिरीर्यते ॥ ५७ ॥
शिवलिंगे समाधाय प्राणं प्राणे च लिंगकम् ॥
निर्वातदीपवच्चित्तं स्थिरं कृत्वा न किंचन ॥ ५८ ॥
चिंतयेद्यदि सा भक्तिरांतरेति निगद्यते ॥
तादृग्भक्त्युपपन्नस्य जीवनम् भ्रष्टबीजवत् ॥ ५९ ॥
बहूक्तेनात्र किं देही शिवभक्तिं समेयिवान् ॥
यो भवेत्स हि मुच्येत भवपाशान्न संशयः ॥ ६० ॥
प्रसादादेव सा भक्तिः प्रसादो भक्तिसंभवः ॥
यथैवांकुरतो बीजं बीजतो वा यथांऽकुरः ॥ ६१ ॥

---

५७ मनोहर अशा सिंहासनावर अथवा तळहातावर शिवलिंगाची जी पूजा ती बाह्यभक्ति म्हणविली जाते.

५८–५९ शिवलिंगाचेठायीं प्राण ( मन ) ठेवून व प्राणाचेठायीं शिवलिंग ठेवून निर्वात प्रदेशांतील दिव्याप्रमाणें मन स्थिर करून दुसऱ्या कशाचेंही चिंतन करूं नये. अशा भक्तीला अंतरभक्ति म्हणतात-अशा भक्तियुक्त पुरुषांचें जीवन, भाजलेल्या बियांप्रमाणें होतें. (भाजलेलें बीं पेरल्यास तें जसें उगवत नाहीं त्याप्रमाणें अशा भक्तांचे व्यवहारानें पुनर्जन्म होत नाहीं.)

६० फार सांगण्याचें काय प्रयोजन आहे. जो मनुष्य अशा शिवभक्तीचा स्वीकार करतो तो भवपाशांतून मुक्त होतो; यांत मुळींच संशय नाहीं.

६१ शिवाचे अनुग्रहानेंच तशी भक्ति मनुष्याचेठिकाणीं उत्पन्न होते. व शिवप्रसाद हा भक्तीनें उत्पन्न होतो. जसें बीजापासून अंकुराची व अंकुरापासून बीजाची उत्पत्ति आहे. तसें.

शिवप्रसादपूर्वा या सद्यो मुक्तिप्रदायिनी ॥
नरेणैकेन जनुषा प्राप्तुं सा नहि शक्यते ॥ ६२ ॥

बहुजन्मविशुद्धानां शिवपूजादिकर्मभिः ॥
विरक्तानां विशिष्टानां प्रसीदति महेश्वरः ॥ ६३ ॥

शिवे प्रसन्ने मुक्तः स्यान्मुक्तः शिवसमो भवेत् ॥
अल्पभक्तिविशिष्टस्य मुक्तिर्जन्मत्रयात्परम् ॥ ६४ ॥

या सेवा सैव भक्तिः स्यात्सांगा न्यूनेत्यपि द्विधा ॥
श्रवणादिनवांगैस्तैर्युक्ता सांगेति गीयते ॥ ६५ ॥

किंचिदुक्तांगहीना या सा न्यूनेति विभाव्यते ॥
सा भक्तिस्त्रिविधा भूयो मनो वाक्कायसाधनैः ॥ ६६ ॥

---

६२ शिवप्रसादानें उत्पन्न झालेल्या भक्तीपासून तावडतोब ( एकाच जन्मांत ) मुक्ति प्राप्त होते ती भक्ति मनुष्याला एकाच जन्मापासून मिळणें शक्य नाहीं.

६३ अनेक जन्मांत केलेल्या शिवपूजादिकर्मांनीं परिशुद्ध झालेल्या व विरक्त, अशा विशिष्ट पुरुषांना शिव प्रसन्न होतो..

६४ शिव प्रसन्न झाल्यास मनुष्य मुक्त होतो, व मुक्त झालेला तो शिवसमान होतो. वरील भक्तीपेक्षां किंचित् कमी अशा भक्तीपासून तीन जन्मानंतर मुक्ति मिळते.

६५-६६ जी सेवा, तीच भक्ति होय ती भक्ति सांग, व न्यून अशा दोन प्रकारची आहे. श्रवणादिनवविध अंगांनीं युक्त अशा भक्तीस सांगभक्ति म्हणतात. नवांगापेक्षां किंचित् कमी अशा भक्तीस न्यून भक्ति असें म्हणतात. ती भक्ति पुन्हा– मन, वाक्, काय- -या साधनांनीं तीन प्रकारची म्हणविली जाते.

शिवरूपादिचिंतायां विश्रांता मानसी च सा ॥
जपादिर्वाचकी ज्ञेया कर्मपूजा च कायकी ॥ ६७ ॥
शिवध्यानानुसक्तं यच्चित्तं चित्तं न चेतरत् ॥
शिवनामजपासक्ता या सा वाणी नचेतरा ॥ ६८ ॥
भस्मोपात्तत्रिपुंड्रादिशिवचिन्हैः सुचिन्हितः ॥
शिवोपचारसंयुक्तः कायः कायो नचापरः ॥ ६९ ॥
स्वेतरेणेक्षितं बाह्यं शिवपूजादिकं स्मृतम् ॥
स्वसंवेद्यं यदेव स्यादांतरं तद्धि गद्यते ॥ ७० ॥
तदेव भजनं सद्भिरुच्यते पंचधा पुनः ॥
तपः कर्म जपो ध्यानं ज्ञानं चेति क्रमेण च ॥ ७१ ॥

---

६७ शिवरूपध्यानांत गढून गेलेल्या भक्तीस मानसिक भक्ति म्हणतात. कर्मपूजेला कायिक ( शारीरिक ) भक्ति म्हणतात.

६८ शिवध्यानामध्यें आसक्त [ गढून ] झालेल्या मनालाच मन असें म्हणावें. इतर ठिकाणीं आसक्त झालेलें मन तें मन म्हणवलें जात नाहीं; शिवनाम जपाचे ठिकाणीं आसक्त झालेल्या वाणीलाच वाणी म्हणतात इतर नाम जपाचे ठिकाणीं आसक्त झालेली वाणी, वाणी म्हणवू शकत नाहीं.

६९–७० भस्म लावलेल्या त्रिपुंड्रादि चिन्हांनीं युक्त व शिवाचे उपचारांमध्यें आसक्त असलेल्या शरीरालाच शरीर म्हणावें इतराला म्हणूं नये. दुसऱ्यांकडून पाहिल्या जाणाऱ्या पूजेस बाह्य शिवपूजा म्हणतात, व ज्याची त्यासच समजणाऱ्या [ मानसिक ] शिवपूजेस अंतर शिवपूजा म्हणतात.

७१ तीच पूजा साधू लोकांकडून-तप, कर्म, जप, ध्यान, ज्ञान-अशा पांच प्रकारची असल्याचें सांगण्यांत येतें.

शिवार्थे देहसंशोषस्तपः कृच्छ्रादि नो मतम् ॥
शिवार्चा कर्म विज्ञेयं बाह्यं यागादि नोच्यते ॥ ७२ ॥

जपः पंचाक्षराभ्यासः प्रणवाभ्यास एव वा ॥
रुद्राध्यायादिकाभ्यासो न वेदाध्ययनादिकम् ॥ ७३ ॥

ध्यानं शिवस्य रूपादिचिंता नात्मादिचिंतनम् ॥
शिवागमार्थविज्ञानं ज्ञानं नान्यार्थवेदनम् ॥ ७४ ॥

इति पंचप्रकारोऽयं शिवयज्ञः प्रकीर्तितः ॥
अनेन पंचधोक्तेन यज्ञेन परमेश्वरम् ॥ ७५ ॥

यजेत परया भक्त्या शिवभक्तः स उच्यते ॥
सर्वोत्तमा गतिर्ज्ञेया शिवभक्तस्य पूजनात् ॥ ७६ ॥

---

७२ [ १ ] शिवाकरितां--उपवासादिकानें--देह संशोषण करणें हें तप होय. कृच्छ्र चांद्रायणादिकांना तप म्हणत नाहींत. ( २ ) शिवपूजनच कर्म समजावें. इतर याग वगैरे हें कर्म म्हणविलें जात नाहींत.

७३ ( ३ ) पंचाक्षर मंत्राचा अभ्यास ( वारंवार उच्चार करणें ) अथवा प्रणव मंत्राचा अभ्यास, अथवा श्री रुद्राचा अभ्यास यालाच जप म्हणतात. वेदाध्ययनादिक जप म्हणवले जात नाहींत.

७४ [ ४ ] शिवाच्या रूपादिकांचें चिंतन करणें याला ध्यान म्हणतात. जीवादिकांच्या चिंतनाला ध्यान म्हणत नाहींत. ( ५ ) शिवागमांच्या अर्थ ज्ञानालाच ज्ञान म्हणातात, इतर शास्त्रार्थ ज्ञानाला ज्ञान म्हणत नाहींत.

७५ अशा रीतीनें शिवयज्ञ पांच प्रकारचा सांगितला आहे. या पांच प्रकारच्या सांगितलेल्या यज्ञांनीं परमेश्वराला अर्थात् शिवलिंगाला, जो

७६ अतिशय भक्तिपूर्वक पूजतो तोच शिवभक्त म्हणविला जातो अशा शिवभक्ताच्या पूजेनें मनुष्याला सर्वोत्तम अशी गति--मोक्ष-- प्राप्त होते.

गतिर्घोरतरा भाव्या शिवभक्तावमाननात् ॥
भक्तावमानं मेधावी चित्तेनापि न चिंतयेत् ॥ ७७ ॥

तेजस्वी शिवभक्तस्तु शिवभक्तिविवर्जितान् ॥
नेच्छेन्नैव स्पृशेन्नापि पश्येत्तैर्नहि संविशेत् ॥ ७८ ॥

यदा गुरुवरप्राप्तदीक्षासंस्कारसंस्कृतः ॥
तदादि शिवभक्तोऽयं यजेदागमसंस्थितान् ॥ ७९ ॥

स्वमताचारसंनिष्ठा स्वजातीया द्विजातयः ॥
तेषां निकेतनेष्वेव भुंजीयादितरेषु न ॥ ८० ॥

संत्यक्तस्वमताचारैरितरैः प्राकृताध्वगैः ॥
प्रेषितं सकलं द्रव्यमात्मनिष्ठमपि त्यजेत् ॥ ८१ ॥

---

७७ शिवभक्ताचा अपमान करण्यानें घोरगति ( नरक ) प्राप्त होते. ह्मणून बुद्धिमान् मनुष्यानें मनांतसुद्धां शिवभक्ताच्या अपमानाचें चिंतन करूं नये.

७८ तेजस्वी शिवभक्तानें शिवभक्ती नसलेल्या लोकांची कसलीही अपेक्षा करूं नये, त्यांना पाहूं नये, शिवूं नये, त्यांच्यांत बसूं नये, त्यांच्यासह कोठेंही जाऊं नये,

७९–८० गुरूंकडून दीक्षा संस्कार प्राप्त झाल्यापासून आगमांत सांगितलेल्या वस्तूंची ( शिव, पार्वती गणपति इत्यादि ) पूजा करावी. आपल्या मत व आचार [ वागणूक ] यांचेठिकाणीं असलेल्या (त्याप्रमाणें वागणाऱ्या) व आपल्या जातीचे जे दीक्षवंत असतील, त्यांच्याच घरीं जेवण करावें इतरांच्या घरीं करूं नये.

८१ आपला मताचार सोडलेले, प्राकृतमार्गांत असलेले [दीक्षारहित] अशा लोकांकडून आलेल्या सर्व पदार्थांचा त्याग करावा. आपणांस नकळत आलेल्या पदार्थांचासुद्धां त्याग करावा.

प्रमादादपि न स्तूयान्नार्चयेदन्यदेवताः ॥
नाश्नीयात्तन्निवेद्यं च शिवभक्तो दृढव्रतः ॥ ८२ ॥

यद्गृहेष्वन्यदेवोऽस्ति तद्गृहाणि परित्यजेत् ॥
नान्यदेवार्चकान्मर्त्यान्पूजाकाले निरीक्षयेत् ॥ ८३ ॥

शिवनिष्ठागरिष्ठानां प्राणलिंगांगसंगिनाम् ॥
नहि स्थावरलिंगानां नैवेद्यादिकसेवनम् ॥ ८४ ॥

यत्र स्थावरलिंगानां शिवलांछनधारिणाम् ॥
अथ वा शिवभक्तानामपायोऽन्यकृतो भवेत् ॥ ८५ ॥

तत्र तत्परिहारं च कुर्याद्त्वाप्यसूंस्तदा ॥
शिवार्थे शिवभक्तार्थे त्यक्तासुः शिवतामियात् ॥ ८६ ॥

---

८२ दृढव्रती अशा शिवभक्तानें चुकूनसुद्धां इतर देवतांची पूजा, स्तुति वगैरे कांहीं करूं नये, इतर देवतांना अर्पण केलेला नैवेद्यही ग्रहण करूं नये.

८३ ज्यांच्या घरीं शिवाखेरीज इतर देवता असतील त्यांचें घर वर्ज्य करावें, इतर देवताची पूजा करणाऱ्या लोकांना आपण शिवपूजा करण्याचे-वेळीं पाहूं नये.

८४ उत्तम शिवनिष्ठा असणारे, व प्राणलिंगांगसंबंध असणारे, अशा शिवभक्तांनीं स्थावर लिंगांच्या नैवेद्याचें सेवन करूं नये.

८५ ज्या ठिकाणीं स्थावरलिंग, शिवलांछनधारी, अथवा शिवभक्त यांचा इतरांकडून हानि होत असेल

८६ त्या ठिकाणीं आपला प्राणही देऊन त्यांचा अपाय परिहार [दूर] करावा. कारण 'शिवाकरितां व शिवभक्तांकरितां प्राण देणारा मनुष्य मोक्षाप्रत जातो.'

शिवस्य शिवभक्तस्य निंदकं मनुजाधमम् ॥
हन्यादुत शपेद्यद्यप्यशक्तः स्थानतश्चलेत् ॥ ८७ ॥
गुरोश्चरस्य लिंगस्य यत्र निंदा प्रवर्तते ॥
विस्मृत्यापि न लिंगांगी यायात्तत्र कदाचन ॥ ८८ ॥
जनकं सर्वविद्यानां सर्वभूताधिपं शिवम् ॥
यो निंदति न तस्यास्ति निरयेभ्यो विमोचनम् ॥ ८९ ॥
शिवपूजासक्तहृदयः पूर्वकर्माणि संत्यजेत् ॥
यदि मोहेन कुर्वीत निष्फलं शिवपूजनम् ॥ ९० ॥
सर्वोत्तरां गतिं श्रित्वा नीचवृत्तिं करोति चेत् ॥
आरूढपतितो भूत्वा भवेत्कर्मबहिष्कृतः ॥ ९१ ॥

---

८७ शिवाची व शिवभक्तांची निंदा करणाऱ्या अधम मनुष्याला मारावें अथवा शाप द्यावा. असमर्थ माणसानें तें स्थान सोडून निघून जावें.

८८ गुरु, लिंग, जंगम यांची निंदा ज्याठिकाणीं होत असते तेथें लिंगधारी वीरशैवांनीं एकादेवेळींही चुकूनसुद्धां जाऊं नये.

८९ सर्व विद्यांचें उगमस्थान व भूतांचे स्वामी अशा शिवाची निंदा जो करतो त्याची नरकांतून सुटका कधींही होऊं शकत नाहीं.

९० शिवपूजेच्या ठिकाणीं आसक्त मनाच्या वीरशैवानें आपलीं पूर्वीचीं कर्में सोडावींत. जर अज्ञानानें तीं घडल्यास त्याच्या शिवपूजेचें फल व्यर्थ होतें.

९१ वीरशैवानें सर्वांत श्रेष्ठ असें स्थान मिळवून पुन्हा नीच [अयोग्य] कर्म केल्यास तो त्या ठिकाणाहून पतित होऊन सर्व कर्म करण्यास बहिष्कृत असा होतो.

गुरूपदिष्टमार्गेण जपन् पंचाक्षरं मनुम् ॥
मानवस्तुतिमग्नश्चेत् सोऽलिंगी कुकविः स्मृतः ॥ ९२ ॥
चर्मपात्रे घृतं तैलं नादद्यात्सलिलादिकम् ॥
यद्यादद्याल्लिंगदेही घोरं नरकमाप्नुयात् ॥ ९३ ॥
जननोत्थं मृतोत्थं च प्राणलिंगांगसंगिनः ॥
शिवाराधननिष्ठस्य शरीरे नास्ति सूतकम् ॥ ९४ ॥
शिवलिंगार्चनासक्तचित्ता या मत्तकाशिनी ॥
ऋतौ प्रसूतौ तस्याश्च सूतकं नैव विद्यते ॥ ९५ ॥
शिवक्षेत्राणि तीर्थानि विशिष्टानि शिवार्चकः ॥
शिवयात्रोत्सवं नित्यं सेवेत परया मुदा ॥ ९६ ॥
तीर्थक्षेत्रदिदृक्षूणां गच्छतामध्वनि ध्रुवम् ॥
जलान्नदानमातन्याद्वीरशैवः शिवव्रती ॥ ९७ ॥

---

९२ गुरूंकडून उपदेशिलेल्या मार्गानें शिवपंचाक्षर मंत्राचा जप करणारा वीरशैव, मानवांच्या ( शिवभक्ति विरहित अशा ) स्तुतींत मग्न झाला असल्यास तो अलिंगी व नीच कवि असा म्हणविला जातो.

९३ कातड्याच्या भांड्यांतून तूप, तेल, पाणी वगैरे पदार्थ घेऊं नये. लिंगधारियानें जर त्यांतून पदार्थ घेतले तर तो महानरकांत जाऊन पडतो.

९४ शिवपूजा तत्पर व लिंगांगसंबंधीं अशा वीरशैवाला जनन मरण यापासून उत्पन्न होणारें सुतक शिवपूजावेळीं नाहीं.

९५ शिवपूजाव्रती अशा स्त्रीला, ऋतु प्राप्त कालीं व प्रसूतीच्यावेळीं सुतक शिवपूजावेळीं असूं शकत नाहीं.

९६ शिवपूजा करणारानें विशेष अशीं शिवक्षेत्रें व तीर्थें, शिवयात्रोत्सव यांचें सेवन अत्यंत संतोषानें करावें

९७ शिवक्षेत्र पाहण्याच्या इच्छेनें जाणाऱ्या लोकांना वाटेंत शिवव्रती वीरशैवानें जलदान, अन्नदान हीं करावींत.

अन्नदानसमं दानमहिंसासदृशं तपः ॥
सत्येन तुल्यो धर्मश्च नास्त्यतो दानमाचरेत् ॥ ९८ ॥

स्वमार्गाचारवर्तिभ्यः स्वजातिभ्यः सदा व्रती ॥
दद्यात्तेभ्यः समादद्यात्कन्यां कुलसमुद्भवाम् ॥ ९९ ॥

सामान्याचारसंयुक्तो विशिष्टाचारतत्परः ॥
अर्चयेदविनाभावभक्त्या लिंगं गुरुं व्रती ॥ १०० ॥

गुरोराराधनात्साक्षाच्छंभुराराधितो भवेत् ॥
भेदस्तयोर्नास्ति किंचिदेकत्वात्तत्त्वतस्तथा ॥ १०१ ॥

यथा शिवे चिदानंदे जगज्जन्मादिकारणे ॥
तथा गुरौ विदध्यात्तानुपचारानतंद्रितः ॥ १०२ ॥

---

९८ अन्नदानाच्या बरोबरीचें दान, अहिंसेच्या बरोबरीची तपश्चर्या, सत्याशी समान असा धर्म असूं शकत नाहीं; त्यामुळें दान करावें.

९९ शिवव्रती वीरशैवानें सत्कुलोत्पन्न अशी कन्या आपल्या आचार व मार्ग या प्रमाणें वागणारे व आपल्या जातीचे अशांचेच घरीं द्यावी व अशांच्याकडूनच ती घ्यावी.

१०० शिवव्रती अशा वीरशैवानें सामान्य व विशिष्ट आचार यांनीं युक्त होऊन अनन्य भक्तिभावानें गुरु व लिंग यांची पूजा करावी.

१०१ गुरूंची पूजा करण्यानें प्रत्यक्ष शंकराची पूजा केली असें होतें. कारण—खरोखर दोघे [ गुरु, लिंग ] एकच असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं किंचितही फरक नाहीं.

१०२ वीरशैवानें निरालस होऊन जगाचे— उत्पत्त्यादिकांना मुख्य कारण, ज्ञानानंदरूप अशा शंकराची पूजा जशी केली जाते तशी—गुरूंचीही पूजा करावी.

स्वमायया महेशानोऽप्रत्यक्षः सर्वदेहिनाम् ॥
प्रत्यक्षो गुरुरूपेण वर्तते भक्तिसिद्धये ॥ १०३ ॥
घोरसंसारपाथोधेराश्रयायाऽऽगतो जनः ॥
सर्वः संतार्यते येन न वंद्यः कस्य सद्गुरुः ॥ १०४ ॥
यत्कृपादृष्टिपातेन सच्चिदानंदलक्षणम् ॥
देही शिवत्वमायाति नार्च्यते केन सद्गुरुः ॥ १०५ ॥
न लंघेत गुरोराज्ञामात्मनो हितमिच्छता ॥
तदाज्ञोल्लंघनाच्छंभोराज्ञाभंगकरो भवेत् ॥ १०६ ॥
शिवत्गुरुवद्भक्तिं चरे कुर्याद्विचक्षणः ॥
गुरुलिंगचरात्मा सन्वर्तते मुक्तिदः शिवः ॥ १०७ ॥
एवमाचारसंपन्नो भक्तस्थलमुपाश्रितः ॥
शिवागमोक्तमार्गेण यो वर्तेत समाहितः ॥ १०८ ॥

---

१०३ आपल्या मायाशक्तीच्यायेगानें, अप्रत्यक्ष असणारा असा ईश्वर सर्व प्राण्यांच्या भक्तीच्या सिद्धीकरितां, गुरुरूपानें प्रत्यक्ष वास करीत आहे.

१०४ आपल्यावर अवलंबून असणाऱ्या सर्व लोकांना ज्या गुरूंकडून भयंकर संसाररूपी समुद्रांतून ओलांडविलें जातें असा सद्गुरु कोणाला वंद्य नाहीं.

१०५ ज्या गुरूंच्या कृपादृष्टिपातानें (पडल्यानें) प्राणी, सच्चिदानंद अशा शिवस्वरूपाप्रत जातो असा गुरु कोणाला पूज्य होणार नाहीं.

१०६ आपलें हित [कल्याण] इच्छिणाऱ्या मनुष्यानें गुरूंच्या आज्ञेचें उल्लंघन मुळींच करूं नये, केल्यास तो शिवाची आज्ञा उल्लंघणारा होईल.

१०७ शिव व गुरु यांच्याप्रमाणेंच विचक्षण माणसानें जंगमांचीसुद्धां पूजा करावी. कारण मुक्ति देणारा शिव गुरु, लिंग, जंगम रूपानें असतो.

१०८ अशा प्रकारच्या आचरणांनींयुक्त; भक्तस्थानाचा आश्रय केलेला व निश्चल (दृढ) मनाचा अशा वीरशैव शिवांकडून सांगण्यांत आलेल्या आगममार्गानें चालणारा,

गुरुलिंगचराणां च पादवारि प्रसादकम् ॥
नित्यं भक्त्या सेवमानो भक्त इत्युच्यते बुधैः ॥ १०९ ॥

इत्थं सुधास्रुचा वाचा विषयप्रतिपादनात् ॥
श्रोतॄनानंदपाथोधौ मज्जयन्मुनिपुंगवः ॥ ११० ॥

अकस्मादर्गलादीर्घं बाहुमुद्यम्य सत्वरम् ॥
मा बिभेतु भवान् भक्त मा बिभेतु मनागपि ॥ १११ ॥

इत्युच्चैः सानुकंपः सन्नुच्चार्याचार्यपुंगवः ॥
क्षणं तूष्णीं समास्थाय पुनर्वक्तुमुपाक्रमत् ॥ ११२ ॥

श्रोतारो भक्तवर्गाश्च गुरोराकस्मिकं वचः ॥
आकर्ण्याश्चर्यपाथोधेर्भ्रांत्यावर्ते च बभ्रमुः ॥ ११३ ॥

---

१०९ गुरु, लिंग, जंगम यांचें पादोदक व प्रसाद सेवन करणारा अशालाच पंडित लोक भक्त असें म्हणतात.

११० अशा प्रकारें अमृताचा पाझर फुटलेल्या वचनानें विषय प्रतिपादन करून श्रोतृ जनांना आनंद समुद्रांत बुडविणारा, महर्षि अशा चन्नबसव स्वामींनी

१११ एकाएकी आगळीप्रमाणें [ दरवाज्याला आंतून आडवें लावलें जाणारें लाकूड ] लांब असा हात वर उचलून सत्वर 'अरे भक्ता तूं भिऊं नकोस, किंचितसुद्धां भिऊं नकोस,'

११२ अशा प्रकारें आचार्य श्रेष्ठानें दयाळु अंतःकरणानें मोठ्यानें म्हणून, थोडावेळ स्तब्ध राहून, पुन्हा प्रवचनाला ( पुराण सांगण्याला ) सुरवात केली.

११३ पुराण ऐकणारे लोक गुरूंचें एकाएकी झालेलें भाषण ऐकून आश्चर्यरूपी समुद्रांतील भ्रांतिरूपी भोंवऱ्यांत सांपडून भ्रमित झाले.

सभ्याः प्रवचनस्यांते मंगलानि विधाय ते ॥
तत्कौतूहलकल्लोलकवलीकृतमानसाः ॥ ११४ ॥
विनयावनमच्छीर्षाः पप्रच्छुः प्रथितं गुरुम् ॥
भो महाभाग योगीश निगमागमपारग ॥ ११५ ॥
कस्मै किमर्थमुद्यम्य बाहुं चाभयमीरितम् ॥
श्रुत्वाऽस्माकं समायातां छिंधि संदेहसंततिम् ॥ ११६ ॥
इत्थं संप्रार्थितान्सभ्यान् प्राह भूपरमेश्वरः ॥
अस्ति कश्चिद्दर्गनाख्यग्रामे गण्यजनाग्रिमः ॥ ११७ ॥
रुद्राख्यः शिवभक्ताढ्यो धनाढ्यो लिंगधारकः ॥
गुरुजंगमलिंगानां सेवातत्परमानसः ॥ ११८ ॥
शिवनामजपासक्तः शिवलिंगार्चनव्रतः ॥
असमच्छिष्यान्वयोद्भूतो गुरुपादाब्जषट्पदः ॥ ११९ ॥

---

११४ त्या श्रोतृगणांनीं प्रवचनाचे शेवटीं मंगलार्ती करून 'तें आम्ही केव्हां विचारूं' या उत्कट इच्छेनेंयुक्त व

११५ विनयानें नम्र होऊन, प्रसिद्ध अशा गुरूंना विचारिलें. हे महाभाग, हे योगीश, हे निगमागमपारग,

११६ हात वर उचलून कोणाला व कशाकरितां तुम्हीं अभय दिलें? तें सांगून आम्हांला उत्पन्न झालेल्या संशयाचें निवारण करा.

११७–११८ अशा प्रकारें प्रार्थना करणाऱ्या भक्त लोकांना भूपरमेश्वर असे मुनि सांगतातः—"दर्गनहळ्ळी नांवाच्या गांवांत–प्रमुख लोकांत श्रेष्ठ, शिवभक्त, धनिक व गुरु, लिंग, जंगम यांच्या सेवेंत तत्पर असलेला असा– रुद्रप्पा नांवाचा वीरशैव राहतो.

११९ शिवनामाचा जप करणारा, शिवपूजेचें व्रत असलेला, आमच्या शिष्यांच्या वंशांत जन्मलेला, गुरुपदकमलांच्या ठिकाणीं भ्रमर झालेला,

सदासत्कर्मसंसक्तः पुण्यात्मा पुरुषर्षभः ॥
जन्मांतरकृताऽस्तुत्यकर्मणां च विपाकतः ॥ १२० ॥
जन्मन्यस्मिन् महारोगग्रस्तः सन् किल वर्तते ॥
विना भोगं कृतं कर्म प्राणिनं न विमुंचति ॥ १२१ ॥
इंद्रचंद्रादयो देवा बलिराजादिदानवाः ॥
भुंजते हि क्षयाद्युग्रफलं स्वकृतकर्मजम् ॥ १२२ ॥
समुद्भूतमहारोगं मामालोक्य पुरौकसः ॥
संकुचेयुर्जुगुप्सेयुरिति संतर्क्य चेतसि ॥ १२३ ॥
स्वयमेवात्मकेदारे कुटीरं तार्णकं दृढम् ॥
बंधुभिः कारयित्वाऽथ तत्राऽऽवासं चकार सः ॥ १२४ ॥
स्वाहृतैर्बिल्वमुख्यैश्च पत्रैः पुष्पैः सुगंधिभिः ॥
संध्यासु तिसृषु प्रीत्या शिवलिंगसमर्चनम् ॥ १२५ ॥

---

१२० नेहमीं सत्कर्मांविषयीं आसक्त, पुण्यवान् पुरुषश्रेष्ठ असा रुद्रप्पा पूर्वजन्मीं केलेल्या वाईट कर्मांच्या परिणामामुळें

१२१ या जन्मांत महारोगानें पीडित होऊन राहिला आहे. प्रत्यक्ष भोगल्याशिवाय तें कर्म प्राण्यास सोडून जात नाहीं.

१२२ इंद्रचंद्रादि देवता, बलिराजादि राक्षस, हे त्यांनीं केलेल्या कर्मांपासून उत्पन्न झालेलें क्षय वगैरे भयंकर फल अद्यापही भोगताहेत.

१२३ स्वतांला जडलेला महारोग पाहून गांवांतील लोक संकोच पावतील व किळसतील असा मनांत विचार करून

१२४ तो रुद्रप्पा आपल्या शेतांत मजबूत अशी गवताची झोंपडी स्वतां त्या आप्तेष्टांकडून करवून तेथें रहात आहे.

१२५ आपण स्वतां आणलेल्या बेल वगैरे पत्रांनीं, सुगंधी फुलांनीं, प्रेमानें शिवलिंगाची त्रिकालपूजा,

कृत्वा गृहादुपानीतं भोज्यं पेयादिकं मुदा ॥
भुक्त्वैकवारमेवासींच्छिवनामपरायणः ॥ १२६ ॥

रुग्बाधासन्नदेहांतमुत्प्रेक्ष्यार्तस्वरेण माम् ॥
सस्मारेति मया तस्य त्राणार्थं हस्त उध्दृतः ॥ १२७ ॥

एवं वादिनि शैवर्षौ विस्मयानंदवर्तिषु ॥
सभ्येषु तरुणाः केचित्प्रत्यक्षीकर्तुमुत्सुकाः ॥ १२८ ॥

तस्यामेव त्रियामायां जग्मुर्यत्र स वर्तते ॥
कुत्रत्या यूयमेतस्यां रजन्यामागताः कुतः १२९ ॥

इत्यागता युवानस्ते पृष्टा रुद्रस्य बंधुभिः ॥
वयं होट्टिगिपल्लिस्था रुग्णं रुद्रं समीक्षितुम् ॥ १३० ॥

---

१२६ करून, घरून खाण्यापिण्याकरितां आणलेल्या पदार्थांचें दररोज एकवेळ सेवन करून, शिवनामपरायण होऊन, रहात होता.

१२७ त्या रुद्रप्पानें रोगाची पीडा ( दिवसेंदिवस वाढत गेल्यानें ) अति जास्त झाल्यामुळें आपला अंतकाल समीप आला असें वाटून दुःखित स्वरानें माझी आठवण केली, हें जाणून त्याच्या संरक्षणार्थ मी हात वर उचलला."

१२८ अशा प्रकारें शैवर्षि चन्नबसवस्वामी सांगत असतां विस्मय व आनंद यांनीं युक्त असे सभेंतील कांहीं तरुण ही गोष्ट प्रत्यक्ष पाहण्यास उत्सुक होऊन

१२९-१३० त्याच रात्रीं तावडतोब ज्या ठिकाणीं रुद्रप्पा रहात होता तेथें ते गेले तेव्हां रुद्रप्पाचे आप्तेष्ट त्यांना पाहून तुम्ही कोठले? अशा रात्रीच्या वेळीं कशाला आलांत? म्हणून विचारीत असतां, आलेल्या त्या तरुणांनीं 'आम्ही होटगी नांवाच्या खेड्याचे, महारोगानें पीडिलेल्या रुद्रप्पाला पाहाण्याकरितां

आगच्छामेति सर्वं तद्गुरोर्वचनमब्रुवन् ॥
श्रुत्वा तद्वचनं हर्षादाहूयांतिकमादरात् ॥ १३१ ॥
उपवेश्य च तान्रुद्रो जगादेदं वचस्तदा ॥
भवतां दर्शनं मेऽद्य गुरुदर्शनवन्मुदे ॥ १३२ ॥
यस्मादाचार्यपादाब्जसकाशादागता इह ॥
पुण्यवंतो नरश्रेष्ठा ब्रवीमि शृणुताऽऽदरात् ॥ १३३ ॥
मद्गुरुश्चन्ननंदीशः शिवाचार्यो महामुनिः ॥
वशीकृतेंद्रियत्वेन यस्मिन् भीतो मनोभवः ॥ १३४ ॥
यस्य पादांबुजातांबु जान्हवीसलिलायते ॥
यत्पादस्पृष्टभूदेशः काशीक्षेत्रायते नृणाम् ॥ १३५ ॥
यत्कृपा भवरुग्णानां संजीविन्यौषधायते ॥
योऽभाललोचनः साक्षाच्छंभुरित्यवगम्यते ॥ १३६ ॥

---

१३१ आलों आहोंत' असें ह्मणून गुरुमुखानें ऐकिलेली सर्व हकिकत सांगितली. त्या तरुणांचें भाषण ऐकून आनंदानें त्यांना जवळ बोलावून

१३२ बसवून, रुद्रप्पानें त्यांना पुढीलप्रमाणें सांगितलें. "आपल्या दर्शनानें मला आज प्रत्यक्ष गुरूंचेच दर्शनाप्रमाणें आनंद होत आहे.

१३३ कारण-आचार्य अशा गुरूंच्या पदकमलापासून आज तुह्मी एथें आलां आहांत. हे पुण्यवान् पुरुष हो, तें मी सांगतों, तुह्मी प्रेमानें श्रवण करा.

१३४ शिवाचार्य, महामुनि, चन्नबसवस्वामी हे माझे गुरु आहेत, जितेंद्रिय असल्यामुळें मन्मथसुद्धां ज्याला भीत आहे,

१३५ ज्यांच्या पदकमलांचें पाणी गंगेप्रमाणें पवित्र आहे, ज्यांच्या पादसेवनानें भूमि लोकांना काशीक्षेत्राप्रमाणें होऊन राहते,

१३६ ज्यांची कृपा, भव रोग्यांना संजीविनी औषधच होऊन राहते, जो भाललोचन रहित असा साक्षात् परमेश्वरच असें लोकांकडून जाणला जातो,

गुरोस्तस्यांघ्रिपाथोजदासदासानुसेवकः ॥
अहं जन्मांतरोपात्तकर्मणा रोगपीडितः ॥ १३७ ॥
आसं यदा तदा दैवहतस्य मम चेतसि ॥
नासीद्देशिकवर्यानुकंपासंपादनस्पृहा ॥ १३८ ॥
येनानुभवितव्याऽऽस्ते विपत्तिर्महती मया ॥
कर्मानुसारिणी बुद्धिरित्युक्तिर्वितथा कथम् ॥ १३९ ॥
पूज्यपादो गुरुश्रेष्ठः शिष्यामंत्रणपूर्तये ॥
द्विस्त्रिधाऽऽगत्य गतवानिमं ग्रामं कृपामनाः ॥ १४० ॥
मया जडधिया तात्र तदंघ्रिवनजद्वयम् ॥
उपाश्रित्य यथाभक्ति न कृता प्रार्थना तदा ॥ १४१ ॥
नोचेत्तेन तदैवाऽऽसं कृतरोगविमोचनः ॥
अंतकांतकभक्तस्य कुतो भीरंतकान्मम ॥ १४२ ॥

१३७–१३८ अशा गुरूत्तम चन्नबसवस्वामींच्या पदकमलांच्या सेवकांच्या सेवकांचा सेवक असा मी अनेक जन्मांत केलेल्या वाईट कृत्यामुळें या जन्मीं जेव्हां मी रोगपीडित झालों तेव्हांही दुर्दैवी अशा माझे मनांत गुरुवर्यांची कृपा मिळविण्याची इच्छा उत्पन्न झाली नाहीं.

१३९ त्या कारणानें अशा प्रकारचें खडतर दुःख मला भोगावें लागत आहे, म्हणून 'बुद्धि ही कर्मानु सारिणी आहे' असें मोठ्याचें वचन तें खोटें कसें होईल ?

१४० पूज्यपद असे गुरुश्रेष्ठ, शिष्यांच्या आमंत्रणावरून पूर्ण कृपादृष्टी होऊन या गांवाला २-३ वेळां येऊन गेले.

१४१ मूढ बुद्धीच्या अशा मी, त्यावेळीं गुरूंच्या पदकमलांच्या जोडीचा आश्रय करून भक्तीनें प्रार्थना केली नाहीं.

१४२ जर मीं प्रार्थना केली असती तर त्याच वेळीं गुरूंनीं मला रोगमुक्त केलें असतें. यमाला यम झालेल्या शिवाचा भक्त अशा मला यमाची भीति कोठून ?

सर्वज्ञः सर्वसाक्षी च सर्वव्याप्यपि शंकरः ॥
भक्तस्य प्रार्थनां हित्वा हितं कर्तुं न हीहते ॥ १४३ ॥
अत्यसह्यमभूद्दुःखं रोगोद्रेकाद्बलादिव ॥
बहिर्यियासवः प्राणा यदा जातास्तदा त्वहम् ॥ १४४ ॥
दीनबंधो दयासिंधो सद्गुरो मद्गुरो मुने ॥
अनन्यशरणं दीनं रक्ष रक्षाऽनुकंपया ॥ १४५ ॥
पापोऽहं पापकर्माऽहं पापात्मा पापसंभवः ॥
दूरीकृत्य गुरो दुःखं कृपया त्वं पुनीहि माम् ॥ १४६ ॥
शोधयत्यनलः स्वर्णं पाथःपंकं रजोऽपि च ॥
गुरुरंतेवासिपापमिति नैसर्गिकी स्थितिः ॥ १४७ ॥
शिवे रुष्टे गुरुस्त्राता गुरौ रुष्टे न कश्चन ॥
इति सिद्धांतवचनं शास्त्रेणोदीर्यते गुरो ॥ १४८ ॥

---

१४३ सर्वज्ञ, सर्वसाक्षी, सर्वव्यापी असा शंकरसुद्धां भक्तांची प्रार्थना नसल्यास भक्तांचें हित करण्याची इच्छा करीत नाहीं.

१४४ रोगाच्या अतिरेकामुळें अतिशय दुःख उत्पन्न होऊन जणों कंठांतून प्राण बाहेर जातात कीं काय ? असें जेव्हां झालें तेव्हां मी.

१४५ हे दीनबंधू, हे दयासिंधू, हे सद्गुरो, हे माझ्या गुरो, हे मुनि, अनन्यशरण व दीन झालेल्या अशा माझें-कृपाळू पणानें- रक्षण कर रक्षण कर!!

१४६ मी पापी आहें, पापकर्मी आहें पापात्मा आहें, पापापासून उत्पन्न झालों आहे. हे गुरो, माझें दुःख आपल्या कृपेनें दूर करून मला पवित्र असा कर.

१४७ अग्नी सोन्याला दोषमुक्त [शुद्ध] करतो, गढूळ पाण्याला धूळ शुद्ध करते, गुरू शिष्यांचें पाप [दोष] नाहींसें करतो, हें सर्व नैसर्गिक आहे.

१४८ शंकराचा कोप झाला असतांही गुरु शिष्याचें रक्षण करतो, गुरु रागावला असतां मात्र, शिष्याचें रक्षण कोणी करूं शकत नाहीं; असें हे गुरो, सिद्धांत वचन शास्त्र सांगतें.

पाहि पाहि मुने दुःखनरकान्मामुपाश्रितम् ॥
इत्याक्रोशवशात्प्राप्तग्लानिसम्मुग्धचेतसम् ॥ १४९ ॥
साक्षादाचार्य आगत्य मा बिभेहीति मां वदन् ॥
अमृताप्लुतहस्तेन सर्वांगं मे समस्पृशत् ॥ १५० ॥
तदा पुलकितः स्वेदैः क्लिनो जागृत्य विस्मयात् ॥
यदा पश्याम्यहं प्रीत्या नासीदत्र गुरूत्तमः ॥ १५१ ॥
शरीरवेदना सर्वाप्यहो कुत्र पलायिता ॥
अंधकारस्थितिस्तावद्यावन्नोदेति भानुमान् ॥
सर्वांगं नीरुजं दीप्यत्सुषमासंपदाश्रितम् ॥ १५२ ॥
तदेतत्सर्वमालोक्य भ्रांत्याऽहं समचिंतयम् ॥
अहो भ्रमो नु किं स्वप्नश्चैंद्रजालिकमेव वा ॥ १५३ ॥

---

१४९ हे मुनि, दुःखरूपी नरकापासून--तुझ्या आश्रयास आलेल्या--माझें रक्षण कर! असा मोठ्यानें आक्रोश केल्यामुळें ग्लानि येऊन मूर्च्छा आली.

१५० त्यावेळीं गुरुवर्यानें प्रत्यक्ष येऊन 'भिऊं नकोस' असें मला सांगून अमृतानें भिजलेला हात माझ्या सर्वांगावर फिरविला

१५१ तेव्हां रोमांचित होऊन घामानें भिजल्यामुळें जागा होऊन आश्चर्यानें व प्रेमानें जेव्हां मीं पाहिलें तेव्हां एथें गुरुश्रेष्ठ नव्हते.

१५२ अहो! सर्व शरिराचीं दुःखें कोठें गेलीं; त्याचा पत्ताच नाहीं. जोंपर्यंत सूर्योदय झाला नाहीं तोंपर्यंत अंधकार स्थिति असते! सर्वांग रोगरहित व तेजस्वी झालें.

१५३ हें सर्व पाहून भ्रांतीनें मी मनांत असा विचार केला कीं अहो! हा भ्रम असेल? कां स्वप्न असेल? कां इंद्रजाल असेल?

अथवा स्यादिदं सत्यमाचार्यानुग्रहादिति ॥
ततः संदेहसंदोहसंधुक्षितहृदंतरः ॥ १५४ ॥
आसन्नबांधवान् सर्वानिदं सर्वं न्यवेदयम् ॥
ते चापि मां तथाभूतमालोक्याद्भुतहर्षयोः ॥ १५५ ॥
संभेदभिन्नहृदयास्तस्थुश्चित्रगता इव ॥
ततः गुरुवरेण्यस्य प्रभावोऽयं न चान्यथा ॥ १५६ ॥
असौ श्रीचन्नबसवेशः सामान्यपुरुषो नहि ॥
ब्रह्मांडभवनाधारस्तंभः शंभुः स्वलीलया ॥ १५७ ॥
मानवावलिमुद्धर्तुं गुरुर्भूत्वाऽवनिं गतः ॥
अधः करोत्यर्कभासं महो महिमशालिनः ॥ १५८ ॥
इत्यादिवाक्यसंदोहैर्वंद्यपादस्य योगिनः ॥
महत्वमधुरां वार्तां मानसोल्लासकारिणीम् ॥ १५९ ॥

---

१५४ अथवा हें आचार्यांच्या अनुग्रहामुळें खरेंच ( रोगमुक्त ) झालें आहे कीं काय! अशा प्रकारें अनेक प्रकारच्या संशयांनीं पीडित अशा मनाचा होऊन,

१५५-१५६ जवळ असलेल्या सर्व आप्तेष्टांना ही सर्व हकिकत सांगितली. तेसुद्धां त्याप्रकारच्या [रोग रहित] अशा मला पाहून आश्चर्य व आनंद यांनीं युक्त अशा मनाचे होऊन, चित्राप्रमाणें स्तब्ध राहिले. नंतर हा गुरुवर्यांचा प्रभाव! दुसरें कांहीं नाहीं.

१५७ हे श्री चन्नबसव स्वामी सामान्य पुरुष नव्हेत, ब्रह्मांड रूपी घराला आधारभूत असा शिव, आपल्या लीलेनें

१५८ मानवांचा उद्धार करण्याकरितां गुरु होऊन पृथ्वीतलावर अवतरला आहे. या महिमाशालींचें तेज सूर्य तेजाचासुद्धां तिरस्कार करते."

१५९ इत्यादि वाक्यांनीं पूज्यपाद अशा शिवयोग्याचे महत्त्वानें सुंदर व मनाला उल्लसित करणारी अशी हकिकत

अमीभिर्बंधुभिस्साकं यावदासं वदन्नहम् ॥
तावदेवागतान्युष्मानवालोकयमंजसा ॥ १६० ॥
इत्याचक्षाणमेनं तं रुद्रं भद्राकृतिं तदा ॥
स्तावं स्तावं युवानस्ते होट्टिगिं प्रत्ययुर्मुदा ॥ १६१ ॥
ईदृशी मुनिवार्तेयं मानवानां मनोऽतिगा ॥
हृदानंदजलौघस्य प्रावृडासीत्पुरौकसाम् ॥ १६२ ॥
कीर्तिः कार्तिकशीतांशुकांतिकांता तपस्विनः ॥
दिगंगनांगराराजत्पटीरसतामगात् ॥ १६३ ॥
गौरी गिरिवरोद्भूता गिरिशांगार्धवासिनी ॥
आर्तार्तिहारिणी देवी हरताद्दुरितं मम ॥ १६४ ॥

—❀ इति सप्तमोऽध्यायः ❀—

---

१६० मी आप्तेष्टांसह बोलत होतों. त्यावेळीं तुम्ही आलेले मीं पाहिलें.

१६१ अशा प्रकारें सांगत असलेल्या मंगलदेही रुद्रप्पाची प्रशंसा करून हर्षपूर्ण होऊन ते होटगीहून आलेले तरुण होटगीला परत निघून गेले.

१६२ अशा प्रकारची मुनिवर्य चन्नबसव स्वामींची मनोतीत वार्ता होटगी गांवांतील लोकांच्या मनांतील आनंदरूपी जल प्रवाहाला पावसाळाच झाली.

१६३ तपस्वी शिवाचार्यांच्या कार्तिक महिन्यांतील. चंद्राच्या तेजा प्रमाणें मनोहर अशा कीर्तीला दिशारूपी स्त्रियांच्या शरिरांत शोभणाऱ्या चंदनाच्या गंधाची स्थिति प्राप्त झाली.

१६४ हिमालयाची मुलगी, शंकराच्या अर्ध्यांगांत वास केलेली, दुःखितांचें दुःख नाहीसें करणारी अशी गौरीदेवी माझ्या पापाचा नाश करो.

—• अध्याय सातवा समाप्त. •—

॥ श्रीरस्तु ॥

ॐनमः पंचजगद्गुरुभ्यः

## श्री. ष. ब्र. चन्नबसव विजय पुराणम्ः



## श्रीरस्तु अथ अष्टमोऽध्यायः शिवमस्तु

दुग्धाब्धिकन्याप्रियवल्लभाय स्निग्धेंद्रनीलद्युतिकंधराय ॥
दग्धासुराधीशपुराय शंभो मुग्धेंदुचूडामणये नमस्ते ॥ १ ॥
उपागतोऽभवद्ग्रीष्मकालः कामुकमुद्वहः ॥
सिरीषपांसवो यत्र भवन्त्यर्कहयत्विषः ॥ २ ॥
तोयार्द्रसैरिभस्तोमश्याममंबुदमंबरे ॥
दृष्ट्वा नाभ्यसरत्कांता का कांतं कामतंत्रगा ॥ ३ ॥

---

१ लक्ष्मीपति विष्णू यांस प्रिय, इंद्रनील मण्याप्रमाणें निळा कंठ असलेला, त्रिपुरांचा संहार कर्ता, बाल चंद्रधारि, अशा हे शंभो तुला नमस्कार असो.

२ ज्या ऋतूंत शिरीष फुलांचे पराग सूर्याच्या घोड्याच्या रंगाचे [हिरवे] असतात, व कामिक जनांना आनंदित करणारा, असा ग्रीष्मऋतु आला.

३ आकाशांत– पाण्यांत बुडालेल्या रेड्याप्रमाणें– काळ्या रंगाचे ढग पाहून कामविकार झालेली कोणती स्त्री आपल्या प्रियतमाला अनुसरली नाहीं. ( सर्व स्त्रिया अनुसरल्या होत्या. )

ग्रीष्मे सायंतनस्नानपाथःकणगणांचितम् ॥
वक्षोजद्वयमेणाक्ष्या नालिंलिंग स को युवा ॥ ४ ॥

द्रुतवायुचलैर्मेघैः क्षणं दृष्टतिरोहिता ॥
क्षणत्विड्विटपे रेजे मंजरीव नभस्तरोः ॥ ५ ॥

अंबुदावलिरुन्मत्तान्कलालापान् कलापिनः ॥
जितमर्दलरावेण स्वरावेण व्यनर्तयत् ॥ ६ ॥

मेघालिनालिकास्त्रेण काहलेन कलापिना ॥
जिगीषयेव वर्षर्तुं सन्ननाह तपर्तुराट् ॥ ७ ॥

मेघाश्चालघुधाराभिः करकाभिश्च भूतलम् ॥
चक्रुर्जलमयं वज्रनिर्घोषैरतिभीकराः ॥ ८ ॥

---

४ ग्रीष्म कालांत सायंकाळचे स्नानाच्या पाण्याच्या थेंबांच्या पंक्तींनींयुक्त अशा हरिणाक्षी स्त्रीचे कुचद्वय ( दोनी स्तन ) कोणत्या तरुणानें आलिंगिले नाहींत. ( सर्वांनीं आलिंगिले )

५ सोसाट्याच्या वाऱ्यामुळें इतस्ततः फिरणाऱ्या मेघांत थोडावेळ दिसून अदृश्य झालेली वीज आकाशरूपी वृक्षाच्या—वाऱ्यानें हालणाऱ्या—डहाळ्यांनीं थोडा वेळ दिसून अदृश्य झालेल्या पुष्पगुच्छाप्रमाणें शोभत होती.

६ मेघ पंक्तींनीं मृदंगाप्रमाणें असणाऱ्या आपल्या आवाजानें-तारुण्यानें उन्मत्त झालेले, व मनोहर कंठाचे अशा—मोरांना नाचविलें.

७ ग्रीष्म ऋतुरूपी राजा मेघपंक्तिरूपी बंदूक व मोरांचा आवाजरूपी शिंग [ तुतारी ] यांनीं युक्त होऊन पुढें येणाऱ्या वर्षर्तुरूपी शत्रूला जणों जिंकण्या करितांच कीं काय ? तयार झाला.

८ मेघानें विजेच्या भयंकर कडकडाटांमुळें मोठ्या जलधारांनीं व गारांनीं पृथ्वीचा सर्व पृष्ठ भाग जलमय करून सोडला.

बाला बालिशभावेन वर्षोपलजिघृक्षया ॥
उन्नामितमुखे तैस्संताडिताश्रुक्रुशुर्भृशम् ॥ ९ ॥
शाखाचरा द्रुशाखासु जलधाराहतिव्यथाः ॥
वातार्दिता बहिर्दंतान् कृत्वा तेनुश्च चीत्कृतिम् ॥ १० ॥
क्षेत्रे कर्माणि कुर्वाणा वायुवृष्टिप्रपीडिताः ॥
स्त्रीभावं बह्वमन्यंत यस्मात्तासां गृहे स्थितिः ॥ ११ ॥
धान्यावापादिसामग्रीसंपादनसमाकुलाः ॥
उप्यमानानि शाल्यादिबीजान्याप्तुं कृतोद्यमाः ॥ १२ ॥
केदारावृतिहेत्वर्थं ये च्छिन्नाः कंटकिद्रुमाः ॥
तदादानक्रियाव्यग्रचित्ता आसन् कृषीवलाः ॥ १३ ॥

---

९. मुलें पोरकटपणानें-आकाशांतून पडणाऱ्यां गारांना एकदम तोंडांत धरण्याकरितां– वर केलेल्या तोंडांना गारांचामारा झाल्यामुळें मोठ्यानें ओरडत होतीं.

१० माकडें, झाडांच्या फांदीवर बसून जलधारांच्या मारानें दुःखित होऊन व थंड वाऱ्यानें त्रासून दात बाहेर काढून चिर्र् चिर्र् असें ओरडत होतीं

११ शेतकरी लोक शेतांत शेतकाम करीत असतां वाऱ्यानेंयुक्त अशा पावसानें त्रासून, 'स्त्रीत्वच फार चांगलें' असें म्हणत होते. कारणः–स्त्रियांना घरांतच राहावें लागतें.

१२ कांहीं शेतकरी, पेरणीचीं साधनें तयार करण्यांत गुंग झाले होते, कांहीं लोक पेरण्याकरितां बीं वगैरे जमवण्याच्या तयारींत होतें.

१३ कांहीं शेतकरी लोक, पूर्वी तोडून टाकलेल्या व आतां कुंपणास लागणाऱ्या काटेरी झाडांच्या फांद्या आणण्यामध्यें गढून गेले होते.

पल्वलाद्यास्तदाऽभूवन् पाथःपूर्णा जलाशयाः ॥
पंकिलत्वात्प्रदेशानां पंथानो वक्रतामयुः ॥ १४ ॥
पर्वताद्युन्नतस्थानजातमच्छिन्नवर्षणम् ॥
वदंत्य इव वाहिन्यो वहंति स्म तटातिगाः ॥ १५ ॥
गंतव्यसरणिः सर्वा पंकेनापि च पाथसा ॥
अज्ञातागाधगाधत्वादगम्या गच्छतां बभौ ॥ १६ ॥
मेघैराच्छन्नबिंबस्य काश्यपेः किरणावलेः ॥
भूमावपतनाच्छैत्यं ववृधे शीकराश्रितम् ॥ १७ ॥
नाविकानामयं कालो धनागमनसाधनम् ॥
अनेनैव धनेनात्मकुटुंबं पोषयंत्यलम् ॥ १८ ॥

. १४ तळीं, तलाव, सरोवरें वगैरे जलाशयें त्यावेळी पाण्यानें तुडुंब भरलीं होतीं. चोहोंकडे चिखल झाल्यामुळें जाण्यायेण्याच्या वाटा वेड्या वाकड्या झाल्या होत्या.

१५ जणों डोंगर, पर्वत वगैरे उंच ठिकाणीं अतिशय पाऊस पडला आहे असें सांगतच कीं काय, त्या नद्या दुतर्फा भरून मोठा आवाज करीत वहात होत्या.

१६ जाण्या येण्याचे सर्व रस्ते चिखल व पाणी यांनीं पूर्ण डबडबल्यामुळें त्याचा अंत न लागून वाटेनें जाणारे येणारे लोकांना थोडावेळ अगम्य झालें होते.

१७ मेघांनीं आच्छादित अशा सूर्याचे किरण, पृथ्वीतलावर न पड-ल्यामुळें, तुषारयुक्त शीतता [ थंडी ] अधिक झाली होती.

१८ नावाड्यांना, हा ग्रीष्म काल द्रव्य प्राप्तीचें एक उत्तम साधन आहे. यावेळीं मिळविलेल्या द्रव्यानेंच ते लोक आपल्या कुटुंबाचें पोषण चांगल्या प्रकारें करूं शकतात.

सज्ज्यकुर्वंस्तदा कर्णधाराश्चातिपरिश्रमात् ॥
प्लवोऽडुपादि सुदृढं पाथस्तरणसाधनम् ॥ १९ ॥

तापसश्चन्ननंदीशः प्रातःकृतशिवार्चनः ॥
तिर्यक्त्रिपुंड्रसंमिश्रललाटललितद्युतिः ॥ २० ॥

भद्ररुद्राक्षमालाभिर्भासितोरस्तटः पटुः ॥
कमंडलुकरांभोजो धृतकाषायकंबलः ॥ २१ ॥

पादानादृतपाटीरपादुकः पावनाशयः ॥
यदा ग्रामांतरं गंतुं निरगात्स्वबृहन्मठात् ॥ २२ ॥

मुसलाकारधाराभिः पूर्वरात्रौ घना घनाः ॥
कृत्वातिविपुलां वृष्टिमभवन् कणपातुकाः ॥ २३ ॥

अत्यंतविरलत्वेन पतद्भिर्मेघमंडलात् ॥
पाथःकणाणुभिः किंचित् सिच्यमानो महामुनिः ॥ २४ ॥

---

१९ त्यावेळीं नावाडी लोक सांगडी, टोकऱ्या, नावा इत्यादि नदी ओलांडण्याची सुदृढ साधनें मोठ्या प्रयत्नानें तयार करीत होते.

२० तपस्वी असा चन्नबसवस्वामी प्रातःकालची शिवपूजा उरकून, कपाळावर जलमिश्र भस्माचें त्रिपुंड्र धारण करून,

२१ छातीवर रुद्राक्षांच्या माळा घालून, हातांत कमंडलु धरून, भगवी घोंगडी आंगावर घेऊन,

२२ पायांत खडावा न घालतां, दुसरें गांवास जाण्याकरितां पवित्र विचारांनीं आपल्या बृहन्मठांतून निघाला.

२३ पूर्व रात्रीं, पुष्कळ मेघ मुसळ धारेची अतिशय वृष्टी करून आतां बारीक थेंबांचा वर्षाव करीत होते.

२४ मुनि, मेघ मंडलांतून अतिशय विरळपणानें पडणाऱ्या पावसाच्या बारीक थेंबांनीं, किंचित् भिजले होते.

अनुकूलतया स्वीये सत्यश्वादिकसाधने ॥
तत्सर्वं च विसृज्यात्मलीलालालितमानसः ॥ २५ ॥
गुल्फप्रमाणपंकावच्छन्नाध्वनि शनैः शनैः ॥
पादस्पर्शेन भूदेवीं पावयन् व्यचरन्मुनिः ॥ २६ ॥
सर्वतः प्रस्फुटां रम्यां प्रावृषेण्यां भुवः श्रियम् ॥
दृष्ट्वा नैसर्गिकीं दृग्भ्यां मोदमानश्चिरं चरन् ॥ २७ ॥
पारेजलं तरंगिण्या वनराजिं व्यलोकयत् ॥
उत्कूलितामिवोर्मीभिः सुनीलां शैवलावलिम् ॥ २८ ॥
विक्रीयानेकदेशीयवस्तून्यात्तधनागमैः ॥
सार्थवाहैस्तितीर्षद्भिर्व्याकुलोडुपसंहतिम् ॥ २९ ॥
क्षिपद्वीचिभुजामुच्चै रसंतीं श्लिष्टभूतलाम् ॥
फेनायमानवक्त्रां तामपस्मारवतीमिव ॥ ३० ॥

---

२५ मठांत घोडा वगैरे प्रवासाचीं साधनें अनुकूल असतांही तीं सर्व सोडून आत्मलीलेनें,

२६ घोट्यापर्यंत चिखल असलेल्या वाटेनें हळू हळू आपल्या पदस्पर्शानें भूमीला पावन करीत तो मुनि चालला होता.

२७ चोंहोंकडे व्यापलेली, मनोहर, व पावसाळ्यांतील भूमीची नैसर्गिक शोभा पाहून तो मुनि मोठ्याआनंदित मनानें बराच वेळ चालत होता.

२८ नंतर भीमानदीच्या पलीकडील तीरावर जणों पाण्याच्या लाटांच्या मारानें कडेला गेलेल्या व काळें झालेल्या शेवाळाची रांगच कीं काय अशी वनपंक्ति पाहाता झाला.

२९ निरनिराळ्या देशांत व्यापार करून, मिळालेलें द्रव्य घेऊन, नदी ओलांडू इच्छित असलेल्या व्यापाऱ्यांनीं गच्च भरलेल्या टोकऱ्यांनीं युक्त,

३० आपटणाऱ्या लाटारूपी हाताची, जोरानें ओरडणारी, भुमीला आलिंगन दिलेली, फेस युक्त मुखाची व यामुळें जणों फेपरे आल्याप्रमाणें दिसत असणारी,

समायांतं स्वमालोक्य प्रत्युद्यातुमिवातुराम् ॥
पुरःप्रसारितायामवीचिहस्तां पयस्विनीम् ॥ ३१ ॥
तटातिगामितोयौघैः कल्लोलैः पर्वतोपमैः ॥
फेनायमानपाथोभिर्घोरारावैश्च भीकराम् ॥ ३२ ॥
गर्भीकृतां महामत्स्यनक्राद्यैर्यादसां गणैः ॥
नामतो रूपतो भीमां भीमां नाम तरंगिणीम् ॥ ३३ ॥
आगतानां तितीर्षूणां मानवानां सहस्रकैः ॥
संजुष्टसैकताभोगां तां जगाम यमीश्वरः ॥ ३४ ॥
दूराध्वानमतिक्रम्य समायातस्य योगिनः ॥
सुधाबिंदूनिव स्वेदलवान् वक्त्रेंदुसंभवान् ॥ ३५ ॥

---

३१–३२ येत असलेल्या आपल्याला पाहून जणों सामोरी येत असलेली, पुढें पसरलेल्या हाताप्रमाणें मोठ्या लाटांनीं युक्त, पुष्कळ पाणी असलेली, कांठाचे उल्लंघन केलेले प्रवाह, पर्वत प्राय लाटा, फेसयुक्त पाणी, इत्यादिकांनीं भयंकर,

३३ मासे, मगरी सुसरी इत्यादि मोठमोठे जलचर प्राणी आंत असलेली, नांव व आकार यांनीं भीम ( भयंकर ) अशी भीमा नांवाची नदी पाहिली.

३४ नंतर तो तपस्वी चन्नबसवस्वामी, येणाजाणाऱ्या व नदी ओलांडणाऱ्या हजारों माणसांनीं गच्च भरलेल्या व वाळूचा विशाल प्रदेश असलेल्या त्या नदीजवळ आला.

३५ बराचदूरचा रस्ता चालून आल्या मुळें तपस्वी अशा चन्नबसव स्वामीच्या चंद्राप्रमाणें असणाऱ्या मुखावर आलेले अमृत बिंदूच कीं काय असे दिसणारे घामाचे थेंब,

कल्लोलकणिकावाही कंजमंजुलसौरभः ॥
वेलावनलतालास्यदेशिको मारुतः पपौ ॥ ३६ ॥
इतः केचित्कर्णधारा जनान्नीत्वा परं तटम् ॥
प्रत्याययुः परे तद्वन्नयंति स्म निरालसाः ॥ ३७ ॥
इतरे नाविका नृणां तरपण्यग्रहातुराः ॥
अभवन्नपरैः साकं वृथावक्तुमनीश्वराः ॥ ३८ ॥
तितीर्षूणां सहस्राणां सम्मर्दमधिकं तथा ॥
आतराऽऽदानसंव्यग्रान्नाविकान्वीक्ष्य संयमी ॥ ३९ ॥
बतेदानीमिमेऽस्माकं स्थलं यच्छंति वा नवा ॥
मुहूर्तमित्थं संदिह्य शनैरुत्थाय सस्पृहम् ॥ ४० ॥
समागम्य समीपं तानिदं वचनमब्रवीत् ॥
भो भो नाविकधौरेया वीरमाहेश्वरोऽस्म्यहम् ॥ ४१ ॥

---

३६ लाटावरून वहात आलेला, कमलांच्या गंधानें परिपूर्ण व कांठच्या वनांतून वहात आलेल्या वाऱ्यानें नाहींसे केले.

३७ इकडे कांहीं नावाडी, निरालसपणें लोकांना पैलतीरावर पोहोंचवून परत येत होते व कांहीं पैलतीराकडे नेत होते.

३८ कांहीं नावाडी, लोकांकडून पैसे [ भाड्याचें ] घेण्यांत गुंतले होते त्यामुळें इतरांशीं गोष्टी बोलण्यास त्यांना सवड नव्हती.

३९ यतींश्रेष्ठ आचार्यांनीं, नदी ओलांडणाऱ्या हजारों लोकांची अतिशय गर्दी पाहून व भाडें वसूल करण्यांत गढून गेलेल्या नावाड्यांना पाहून,

४० 'हे नावाडी, आतां या वेळेला आम्हांला नावेंन जागा देणार कीं नाहीं,' असें थोडावेळ शंकित होऊन नंतर हळूच उठून,

४१ पलीकडे जाण्याचे इच्छेनें नावाड्यांच्या जवळ जाऊन त्यांना म्हणाला; हे नावाड्यांनो, मी वीरमाहेश्वर ( जंगम ) आहे.

ब्रह्मचारी सदाचारी निर्धनोऽनवलंबनः ॥
परतीरप्राप्तिकामो ह्यतस्तारयताऽऽपगाम् ॥ ४२ ॥
मादृशानां तारणेन श्रेयोऽक्षय्यं भविष्यति ॥
यन्मय्यस्त्याणकं द्रव्यं तत्तु दास्यामि वोऽनघाः ॥ ४३ ॥
जटाधारिन्नटव्यां ते वचनं रोदनं किल ॥
यदि दास्यसि तन्मूल्यं नदी तार्या भविष्यति ॥ ४४ ॥
त्वादृशानां भिक्षुकाणामल्पं चापि च जल्पनम् ॥
नेहामहे वयं श्रोतुं कार्यतत्परमानसाः ॥ ४५ ॥
इत्थं तैरुच्यमानोऽयं तापसः पुनरूचिवान् ॥
ग्रामांतरे महत् कार्यं कर्तव्यं श्वो मयैव च ॥ ४६ ॥

---

४२ मी ब्रह्मचारी, सदाचारी, निर्धन, निराधार असून मला पैल तीरावर जाण्याची इच्छा आहे. ह्मणून मला नदीच्या पलीकडे पोहोंचवा.

४३ माझ्यासारख्या लोकांना पैल तीरावर पोहोंचविण्यानें तुह्मांला नाशरहित [ कायम ] सुखप्राप्त होईल. मजजवळ असलेला एक आणा मी तुह्मांला देतों.

४४ यावर नावाडी ह्मणतात-हे जटाधारी, तुझें हें ह्मणणें ' अरण्य रोदना ' प्रमाणें आहे. ( निष्फल आहे ) पूर्ण भाडें दिल्यास नदीच्या पैल तीरावर पोहोंचवूं.

४५ आम्हांला अतिशय कामें असल्यामुळें तुझ्या सारख्या भिक्षुकांची बडबड थोडी सुद्धां आम्ही ऐकूं शकत नाहीं.

४६ अशा प्रकारें ते नावाडी उत्तर देत असतांही, पुन्हा तो तपस्वी म्हणाला ' उद्यां पुढच्या दुसऱ्या गांवांत मी मोठें कार्य करणार आहें,

कथं स्यादद्य मद्यानं नदीतरणमंतरा ॥
अनपेक्ष्य धनं क्षय्यमक्षय्यधनलिप्सवः ॥ ४७ ॥
साधून् समुपकुर्वंति तदिष्टार्थोपपादनात् ॥
तथैव यूयमस्माकं कृतोपकृतिजं सुखम् ॥ ४८ ॥
सरित्संतारणद्वारा संपादयत सादरम् ॥
एवं विनयसंपत्तिसंपृक्तां शांतिसंतताम् ॥ ४९ ॥
संगिरंतं गिरं तं ते नाविका नीचमानसाः ॥
त्वं चापीतरवत्पूर्णमातरं यदि दास्यसि ॥ ५० ॥
सरितं तर भो नोचेदिहैव पत तापस ॥
इत्युक्त्वा कर्कशां वाचं जनानामुडुपादिना ॥ ५१ ॥
परतीरप्रापणादावभवन्नतिमोहिताः ॥
आतरेण विना साधूनागतान्नाविका मुदा ॥ ५२ ॥

---

४७ करितां आतां जर मी ही नदी ओलांडली नाहीं तर माझें तेथें जाणें कसें होईल?' नाशरहित धनाची अपेक्षा करणारे लोक नश्वर [ नाश-पावणाऱ्या ] धनाची अपेक्षा न करतां

४८ सज्जनांवर-त्यांची इच्छा पूर्ण करून उपकार करतात. त्याप्रमाणें तुम्ही सुद्धां आम्हांवर उपकार करून अक्षय्य [ नाश पावणारें ] सुख

४९. नदी ओलांडविण्याचें मिषानें संपादन करा. याप्रमाणें मोठ्या विनयानें व शांतपणानें

५० गोष्टी सांगणाऱ्या मुनीश्वराला हलक्या मनाचे ते नावाडी, 'तूं इतर लोकांप्रमाणें पूर्ण भाडें देशील

५१ तर नदी ओलांड, तसें न झाल्यास हे तपस्व्या, एथेंच पडून रहा.' याप्रमाणें कठोर भाषण करून लोकांना टोकऱ्या वगैरे साधनांनीं,

५२ ते मूर्ख नावाडी, पैल तीरावर नेण्यांत गढून गेले. भाडें न घेतां येणाजाणाऱ्या साधू लोकांना जे नावाडी संतोषानें व

ये तारयंति सद्भक्त्या ते तरंत्यापदापगाम् ॥
यं महौजसमुद्वीक्ष्य स्वांतानि प्राणिनां सदा ॥ ५३ ॥
संयांति शांतिमत्यंतं तस्मै द्रुह्यंति पापिनः ॥
नाविकापसदाश्चेति निनिंदुर्नाविकान् परे ॥ ५४ ॥
क्रियते येन यत्कर्म भुज्यते तेन तत्फलम् ॥
किमस्माभिर्निंदनीयं कृतं वक्ता हरेदिति ॥ ५५ ॥
न्यायान्मौनं वरं चेति केचित्ताटस्थ्यमापिरे ॥
तापसा इति मंत्रज्ञा इति वेदांतिनो वयम् ॥ ५६ ॥
इत्येव धूर्तदुर्जाता वंचयंति जनान् बहून् ॥
वरं शासनमेतेषामेतादृग्वेषधारिणाम् ॥ ५७ ॥
इति नीचतमाः केचिदभ्यनंदन्नु नाविकान् ॥
मध्यान्हात्पूर्वमागत्य चापराण्हमधिष्ठितम् ॥ ५८ ॥

---

५३ सद्भक्तीनें पैल तीरावर पोहोंचवितात, ते नावाडी दुःखरूपी नदीही ओलांडतात. महा तेजस्वी अशा ज्या साधूला पाहून, लोकांचीं मनें नेहमीं,

५४ अत्यंत शांति पावतात, अशा योगीश्वराविषयीं पापी व नीच असे नावाडी द्रोह करतात. असें म्हणून तेथें जमलेल्या लोकांपैकीं कांहीं लोकांनीं नावाड्याची निंदा केली.

५५ जो जें कर्म करतो तो त्या कर्माचें फल भोगतो. त्यामुळें आपण कशाला निंदा करावी. 'पाप करणाराचें पाप बोलून दाखविणारांस लागतें.

५६-५७ या न्यायानें उगीच राहणें बरें! असें म्हणून कांहीं लोक तटस्थ राहिले. आम्ही तपस्वी, आम्ही मांत्रिक, आम्ही वेदांती असें म्हणून धूर्त ( कपटी ) दुर्जन पुष्कळ लोकांना फसवितात, तेव्हां अशा कपट वेश धाऱ्यांना शासन होणें हेंच योग्य आहे.

५८ असें म्हणून कांहीं नीच लोक नावाड्याची स्तुति करीत होते. दोन प्रहरच्याही अगोदर येऊन तिसऱ्या प्रहरापर्यंत

शिवाचार्यशिखारत्नं न कोऽप्यैक्षिष्ट नाविकः ॥
तस्मिन् तरंगिणीतीरे सातपे तापसोत्तमम् ॥ ५९ ॥

तितीर्षयोपविष्टं तमनादृत्याधमाधमाः ॥
चालयामासुरुडुपं कुत्सितानां कुतो दया ॥ ६० ॥

अथ श्रीचन्ननंदीशः शिवाचार्यः शिवात्मकः ॥
उपायाभावतः स्वांते चिंतामेवं ततान सः ॥ ६१ ॥

कर्णधारास्त्विमे याचमानं मामवहेलया ॥
अतारयंतः संतस्ते निरगुर्निहताशयाः ॥ ६२ ॥

चरमाद्रितटं गंतुमीहमानोऽस्ति भानुमान् ॥
किं करोमीति योगीशो विचिंत्य क्षणमात्मनि ॥ ६३ ॥

---

५९ उन्हानेंयुक्त अशा त्या नदीच्या कांठीं बसलेल्या शिवाचार्य, शिखारत्न व तापसी अशा त्या चन्नबसव स्वामीकडे एकही नावाड्यानें लक्ष पुरविलें नाहीं.

६० पैलतीरावर जाण्याच्या इच्छेनें बसलेल्या गुरूत्तमाला सोडून ते नीच नावाडी आपापली टोकरी चालवूं लागले. बरोबर आहे. कारणः—'नीच लोकांचेठिकाणीं दया कोठून असणार!'

६१ नंतर शिवस्वरूपी अशा चन्नबसव स्वामींनीं निरुपाय होऊन आपल्या मनांत पुढीलप्रमाणें विचार केलाः—

६२ हे नीच नावाडी याचना करीत असलेल्या मला तिरस्कार बुद्धीनें न ओलांडवितां तसेच निघून गेले,

६३ सूर्य पश्चिमेकडील पर्वतावर जाण्याची इच्छा करीत आहे [सायंकाळ होत आली] आतां मी काय करूं. असा मनांत थोडावेळ विचार करून,

जगत्तारकमीशानं हित्वैषां नरजन्मिनाम् ॥
पश्चाद्धावनमस्माकमज्ञत्वं सूचयत्यहो ॥ ६४ ॥
शिवो मे कर्णधारोऽस्ति तत्कृपा क्षेपिणी तथा ॥
कंबलश्चोडुपश्चैतत्साधनेन समन्वितः ॥ ६५ ॥
कूलंकषजलामेनामापगामपसाध्वसः ॥
संतरामीति निश्चित्य निश्चंचलमना मुनिः ॥ ६६ ॥
महदाकारकल्लोलमालाजालरवान्विते ॥
स्रोतस्विनीजले स्वीयं कंबलं चतुरस्रकम् ॥ ६७ ॥
निधाय विधुचूडं तं विधाय हृदयांबुजे ॥
यदा पद्मासनासीनस्तत्रासीद्गुरुपुंगवः ॥ ६८ ॥
तदा तत्कंबलो नद्यां प्लववत्प्रययावहो ॥
स्वायत्तभूतशक्तीनां किंन्वसाध्यं महात्मनाम् ॥ ६९ ॥

---

६४ जगाला तारणाऱ्या ईश्वराला सोडून देऊन या माणसांच्या पाठीमागें धाव घेणें, अहो, हें आमचें अज्ञान व्यक्त करीत आहे.

६५ शिव माझा नावाडी आहे, शिवाची कृपा ही मला चाटू आहे, तसेंच घोंगडी ही टोकरी आहे. या साधनांनीं युक्त असा मी,

६६ दुतर्फा गच्च भरून वाहणारी नदी भयरहित होऊन ओलांडतों, असें म्हणून निश्चंचल मनानें मुनीश्वर निश्चय करून,

६७ मोठमोठ्या अनेक लाटांच्या आवाजांनीं युक्त व वेगवान् अशा त्या नदीच्या पाण्यावर चौकोनी घडी करून ती घोंगडी

६८ टाकून, अंतःकरणांत चंद्रशेखर अशा शिवाचें चिंतन करून, गुरूत्तम चन्नबसव स्वामी त्या घोंगडीवर पद्मासन घालून बसला,

६९ तेव्हां अहो! ती घोंगडी नदींतून सांगडीप्रमाणें जाऊं लागली. बरोबर आहे. कारणः–सर्व भूतांची शक्ति स्वाधीन करून घेतलेल्या महात्म्यांना असाध्य असें काय आहे. (कांहीं नाहीं.)

तीरस्थितास्तथा नावमधिरूढा जनाश्च ते ॥
कर्णधाराश्च दृष्ट्वा तां मानवासुलभां कृतिम् ॥ ७० ॥
उन्मत्तोऽयं जटाधारी भूताविष्टोऽथ वा यतः ॥
कंबलेन महापूरां तरितुं त्वरते नदीं ॥ ७१ ॥
इत्युच्चैर्जहसुर्ये ये क्षणात्तेषां हृदि स्थितम् ॥
सुदूरीकृत्य तं हासं तिष्ठति स्माद्भुतो रसः ॥ ७२ ॥
आसन्नीभूतमार्यस्य कंबलं सलिलोपरि ॥
प्लववत्सत्वरं यांतं वीक्ष्य नौकास्थिता जनाः ॥ ७३ ॥
आश्चर्यार्णवसम्मग्नास्सर्वे स्वामिनमादरात् ॥
अहो महामहात्माऽसौ तापसो वसुधाशिवः ॥ ७४ ॥

---

७० नदीच्या कांठांवर असलेले व नावेंत बसलेले लोक व नावाडी यांनीं तें अमानुष कृत्य पाहून,

७१ ज्याअर्थी असल्या भयंकर महापुरांतून घोंगडीच्या सहाय्यानें पलीकडे सुरक्षित जाण्याची हा अपेक्षा करतो त्याअर्थी, हा वेडा तरी असावा एक, नाहीं तर पिशाचग्रस्त तरी असावा.

७२ अशा रीतीनें ज्या ज्या लोकांनीं गुरुवर्यांचा उपहास केला, त्यांच्या त्यांच्या हृदयांतील हास्यरस एका क्षणात नाहींसा होऊन तेथें आश्चर्य रसानें प्रवेश केला.

७३ फक्त जमिनीवर आंथरून बसण्याची ती स्वामींची घोंगडी सांगडीप्रमाणें त्या महापुरांतून अतिशीघ्र वेगानें चाललेली पाहून त्या नावेंतील लोक

७४ आश्चर्यसमुद्रांत बुडून जाऊन, ते आपापसांत स्वामींविषयीं बोलूं लागले कीं:—‘अहो, हा तपस्वी गुरुवर्य हा मोठा महात्मा व पृथ्वी तलावरील शिवच आहे!

सामान्यमनुजो नैवेत्युच्चरंतः पुनः पुनः ॥
पश्यंतो निर्निमेषाक्षाश्चित्रस्था इव रेजिरे ॥ ७५ ॥
पश्यत्सु सत्सु सर्वेषु पश्चात्कृत्य तरिं क्षणात् ॥
पुरः सुदूरमगमद्गजाजानिपूजकः ॥ ७६ ॥
नाविकाश्चाथ सामर्थ्यसर्वस्वस्य व्ययादपि ॥
पश्चात्कर्तुं महात्मानं मनागपि च नेशिरे ॥ ७७ ॥
मध्येसरित्समायाता सा नौस्तावन्महोर्मिभिः ॥
व्याहता चातिचलिता सहाऽऽरूढजनात्मभिः ॥ ७८ ॥
आत्मशक्तिमतिक्रम्य कृतयत्ना अपि क्षमाः ॥
पृथक्कर्तुं महोर्मिभ्यो नावं नासंश्च नाविकाः ॥ ७९ ॥

---

७५ सामान्य मनुष्य नव्हे! असें म्हणून त्या स्वामीकडे पापण्या न हालवितां एकसारखें पाहणारे ते नावेंतील लोक चित्रांतील बाहुल्याप्रमाणें दिसत होते.

७६ शिवपूजेंत समर्थ असा तो स्वामी, सर्व लोक पाहात असतां त्या टोकराला मागें टाकून त्या महापुरांत बराच लांबपर्यंत गेला.

७७ हें पाहून नावाड्यांनीं स्वामीस मागें टाकण्याकरितां आपलें सर्व सामर्थ्य खर्चून प्रयत्न केला; परंतु ते त्या बाबतींत असमर्थ झाले. [ मागें टाकूं शकले नाहींत ]

७८ मात्र अशा प्रकारें नदीच्या मध्यभागीं आलला टोकरा नदातील मोठमोठ्या लाटांच्या माऱ्यानें त्यांतील बसलेल्या लोकांच्या मनासह चंचल झाली [ डगमगूं लागली ]

७९ नावड्यांना त्या मोठमोठ्या लाटा चुकविण्याचा अटोकाट प्रयत्न केला परंतु ते असमर्थ झालें. [ टोकरी लाटांच्या माऱ्यांतून बाजूस करतां आली नाहीं. ]

सवातोर्मिचयाऽऽहत्या क्षणान्मंक्ष्यति नौर्जले ॥
इति मत्वा जनाः सर्वे नाविकैः सह चुक्रुशुः ॥ ८० ॥

महदाक्रोशनं श्रुत्वा महात्माग्रेसरो गुरुः ॥
दयारसार्द्रहृत्पद्मो भूत्वा तानिदमब्रवीत् ॥ ८१ ॥

भो पाथःपथिका मर्त्या मा बिभीत मनागपि ॥
सर्वत्राणपरः श्रेयान् युष्मांस्त्रायेत शंकरः ॥ ८२ ॥

इति श्रीचन्नबसवेशशिवाचार्यशिखामणेः ॥
वक्त्राब्जाद्वाक्सुधासिंधोर्लहरीव बहिर्ययौ ॥ ८३ ॥

तदानीमेव तीरस्थैः कैश्चिन्मर्त्यगणैर्भृशम् ॥
रज्वाऽऽकृष्टेव संवेगात्तरिस्तीरं समाययौ ॥ ८४ ॥

---

८० लाटा व वारा यांच्या जोरानें 'आतां आपली ही टोकरी एका क्षणांत पाण्यांत बुडणार' असें जाणून नावेंतील लोक व नावाडी या सर्वांनीं मिळून मोठ्यानें हाहाकार केला.

८१ हा मोठ्यानें होणारा हाहाकार ऐकून महात्म्यश्रेष्ठ असा गुरूत्तम दयाळू अंतःकरणानें त्यांना म्हणाला

८२ अहो, जलमार्गानें जाणाऱ्या मनुष्यांनो, तुम्ही मुळींच भिऊं नका, कां म्हणाल तर सर्व प्राणीमात्रांचें रक्षण करणारा परमेश्वर तुमचेसुद्धां एका क्षणांत रक्षण करील.

८३ अशा प्रकारें शिवयोगीश्रेष्ठ अशा चन्नबसवस्वामींच्या तोंडून क्षीर-समुद्रांतील प्रवाहाप्रमाणें हें भाषण निघालें.

८४ तोंच कांठावरील लोकांनीं दोर टाकून त्याच्या सहाय्यानें ओढ-ल्याप्रमाणें ती टोकरी जोरानें कडेला येऊन लागली.

सुखसंप्राप्तकूलास्ते मुक्ता मृत्युमुखादिव ॥
अवतीर्योडुपात्सर्वे समुत्तीर्णमहापदः ॥ ८५ ॥
संप्राप्य महिमागारं जितमारं स्वतारकं ॥
दयासिंधुं विपद्बंधुं प्रणिपत्य गुरूत्तमम् ॥ ८६ ॥
स्तुवंतो भक्तिसद्भावैर्निंदन्तस्तांश्च नाविकान् ॥
हर्षप्रफुल्लचित्ताः संव्यक्तसात्विकभावुकाः ॥ ८७ ॥
प्रणामपण्यसंक्रीतागण्यपुण्यहिरण्यकाः ॥
गुरोः कीर्तिं पुरस्कृत्य स्वस्वदेशानगुर्जनाः ॥ ८८ ॥
अभिमानं त्रपां हित्वा नाविका जडदेहिनः ॥
श्रीगुरोः पादपाथोजपीठभूधूलिधूसरान् ॥ ८९ ॥
मूर्ध्नो विधाय वै भक्त्या कृतांजलिपुटाः पुरः ॥
अस्तुवन्नपराधस्य परिमार्जनवांछया ॥ ९० ॥

---

८५ मृत्यूच्या मुखांतून सुटून आल्याप्रमाणें त्या महा संकटांतून मुक्त झालेले ते सर्व लोक सुखरूपपणें कांठाला येऊन, टोकरींतून उतरून,

८६ मोठेपणाचें स्थान, मन्मथाला जिंकलेल्या, आपणाला संकटांतून मुक्त केलेल्या, दयासागर, संकटकालीं बंधू झालेल्या अशा गुरुश्रेष्ठाजवळ येऊन नमस्कार करून,

८७ सद्भक्तिभावानें स्तुति करणारे व नाविकांना दोष देणारे आनंदानें प्रफुल्लित मनाचे, सात्विक भाव उघड झालेले,

८८ नमस्कार रूपी किंमत देऊन पुण्यरूपी सोनें खरेदी करणारे होऊन, गुरुमहाराजांची कीर्ति पुढें करून ते सर्व लोक आपापल्या देशाला निघून गेले.

८९-९० नंतर त्या मूर्ख नावाडी लोकांनीं अभिमान व लाज सोडून देऊन, आपलीं मस्तकें गुरूंच्या पदकमलांच्या तळच्या धुळीनें मलिन झालेलीं अशीं करून भक्तीनें समोर हात जोडून, आपण केलेल्या अपराधाच्या क्षमेकारितां स्वामींचीं प्रार्थना केली.

अमानुषप्रभावस्य ते ब्रह्मन्नज्ञया धिया ॥
अपराद्धं यदस्माभिः क्षंतव्यं तद्दयानिधे ॥ ९१ ॥

जघन्यमिव भो योगिन् भवंतं भवतारकम् ॥
तुदतां दुर्वचोभिस्तैरपराधं क्षमस्व नः ॥ ९२ ॥

धराशंभो त्वदीयं यत्तार्तीयीकं विलोचनम् ॥
प्रच्छन्नं तत्कथं ज्ञेयमस्माभिर्जडमानसैः ॥ ९३ ॥

साधावसाधु तत्कर्म कृतमस्माभिरल्पकैः ॥
धनलुब्धैर्बुद्धिहीनैरासुरं कर्म यद् भुवि ॥ ९४ ॥

पुत्रेण कृतमप्यागो वागतीतं पिता यथा ॥
तथाऽस्माभिः कृतं सर्वं क्षमस्वेति पुनः पुनः ॥ ९५ ॥

---

९१ हे गुरूत्तम, ब्रह्मन्, तुझ्या ठिकाणीं असलेलें अमानुष सामर्थ्य आह्मांला न कळून त्यामुळें मूर्ख अशा आमचेकडून आपल्याविषयीं जो अपराध घडला, हे दयानिधे, तो सहन करावा.

९२ हे योगीश्रेष्ठ, भवतारक अशा तुला नीच माणसाप्रमाणें वाईट भाषणांनीं त्रास दिलेल्या अशा आमचे अपराधांची क्षमा करावी.

९३ हे पृथ्वीतलावरील परमेश्वरा, तुझा तृतियनेत्र झांकलेला आहे. अर्थात् असा तुझा डोळा जडबुद्धि अशा आह्मांला कसा समजूं शकेल ?

९४ जगांत ज राक्षसीकृत्य आहे तें तुज सारख्या सज्जनांचे ठिकाणीं धनलोभी, मूर्ख व नीच अशा आह्मांकडून घडलें.

९५ मुलानें केलेला अपराध कितीही भयंकर असला तरी तो जसा बापाकडून क्षमिला जातो. त्याप्रमाणें आमच्याकडून झालेले सर्व अपराध तूं क्षमा करावेत म्हणजे पुन्ह पुन्हा.

यामो वयं शरण्यं त्वां शरणं करुणार्णव ॥
इत्यत्यंतदयार्हायां दीनतायां स्थितानिमान् ॥ ९६ ॥

सानुकंपं समालोक्य जगद्वंद्यो जगाद तान् ॥
स्वापराधं समुद्वीक्ष्य पश्चात्तापेन प्लुष्यतः ॥ ९७ ॥

देहिनः क्षमते मंतु सर्वसाक्षी जगत्प्रभुः ॥
इतः प्रभृति मा गात प्रमादं यूयमर्भकाः ॥ ९८ ॥

हालाहलविषाच्चापि मोहकत्वं धने बहु ॥
स्पर्शमात्रेण मूर्च्छंतं कुरुते मानवं धनम् ॥ ९९ ॥

अग्नेः कण इवात्यंतमल्पोऽप्यैश्वर्यजो मदः ॥
भस्मसात्कुरुते सर्वं वंशारण्यं क्रमोर्जितः ॥ १०० ॥

---

९६ हे दयासागरा, शरण येण्यास योग्य अशा तुला आह्मी शरण आलों आहोंत. असें ह्मणून प्रार्थना करणारे, अत्यंत केविलवाण्या अशा दीनस्थितींत असणारे,

९७ आपला अपराध जाणून पश्चात्तापानें पीडिलेले ते नावाडी पाहून, जगद्वंद्य असे चन्नबसव स्वामी ह्मणाले,

९८ ' हे बाळांनो, जगत्प्रभू व सर्व साक्षी असा सांब प्राण्यांच्या अपराधाची क्षमा करतो, यापुढें तुह्मी अपराध करूं नका,

९९ पैशाचे ठिकाणीं हलाहल विषापेक्षांही ज्यास्त मोहकपणा आहे. कारण-पैसा हा नुसत्या स्पर्श करण्यानें देखील मनुष्याला मुर्च्छित करूं शकतो ( विष प्याल्यानें मुर्च्छित होतो. )

१०० ऐश्वर्यानें उत्पन्न झालेल्या गर्व, प्रथम अग्नीच्या ठिणगीप्रमाणें अत्यंत अल्प असला तरी तो दिवसेंदिवस वाढत जाऊन, वंशरूपी सर्व अरण्याचा नाश करतो.

ऐश्वर्यस्य मदेनेंद्रो वीरमाहेश्वराय च ॥
कृत्वा दुर्वाससे द्रोहमनैश्वर्योऽभवत्पुरा ॥ १०१ ॥
जघन्यप्रकृतौ पुंसि मदादैश्वर्यजात्कपौ ॥
मद्यादिवोपजायंते विकारा बहवो भुवि ॥ १०२ ॥
प्रायशो धनबाहुल्यं गंभीरप्रकृतिं नरम् ॥
विकारयति नैवांबुबाहुल्यमिव सागरम् ॥ १०३ ॥
दया भूतेषु कर्तव्या चादया न कदाचन ॥
प्रसीदति दयावत्सु भूतेशो भगवान् शिवः ॥ १०४ ॥
शिवानुग्रहसंप्राप्ते चाधिकारे वसन्नरः ॥
यः सर्वहितमीहेत सर्वमान्यो भविष्यति ॥ १०५ ॥

१०१ पूर्वी इंद्र, ऐश्वर्य मदानें वीर माहेश्वर ( वीरशैव ) अशा दुर्वास ऋषीचा द्रोह केल्यामुळें कांहीं दिवस दरिद्री होऊन राहिला.

१०२ जगांत माकडानें मद्यपान केलें असतां जशा अनेक चेष्टा सुरू असतात, त्याप्रमाणें हलक्या मनाच्या मनुष्याचेठिकाणीं संपत्तीमुळें उत्पन्न झालेल्या गर्वापासून अनेक विकार उत्पन्न होतात.

१०३ तलाव इत्यादिकांत थोडेसें पाणी जास्त झालें कीं त्यांच्या स्थितींत बदल होतो, परंतु समुद्रांत वाटेल तेवढें पाणी आलें तरी त्याचे स्थितींत बदल होत नाहीं त्याप्रमाणें सात्विक व गंभीर अशा स्वभावाच्या माणसाचे ठिकाणीं केवढ्याही संपत्तीनें मुळींच विकार होत नाहींत.

१०४ हे नावड्यांनो, प्राणीमात्रावर नेहमीं दया करावी. निर्दयता ( अवकृपा ) केंव्हाही दाखवूं नये. कां ह्मणाल, तर-भूतेश असा भगवान् शंकर दयाळू लोकांचेविषयीं प्रसन्न असतो.

१०५ शिवानुग्रहानें प्राप्त झालेल्या आधिकार पदावर असणारा मनुष्य नेहमीं सर्वांचें कल्याण इच्छितो त्यामुळें तो सर्वमान्य होतो.

दरिद्रानदरिद्रान् वा जनान् सर्वान् तितीर्षया ॥
समायातानेकवृत्त्या समालोकयताऽऽदरात् ॥ १०६ ॥
वर्णाश्रमोचितं कर्म साध्वसाध्वपि मानवः ॥
यथा धर्मं प्रकुर्वाणो नाधः पतितुमर्हति ॥ १०७ ॥
धनिकान् धनमादाय चानादायाप्यकिंचनान् ॥
तापसान्वीरमाहेशानंगहीनान् जनानपि ॥ १०८ ॥
समौचित्येन संतार्य यूयं स्त सुखिसत्तमाः ॥
इत्थमाश्वास्य तान्योगी गंतव्यपदमन्वगात् ॥ १०९ ॥
पुराऽऽसीचन्नमल्लाख्यो वीरशैवो विदां वरः ॥
यो हव्बुवंशसन्मुक्तामणिर्गुणिगणाग्रणीः ॥ ११० ॥

---

१०६ हे नावाड्यांनो, नदी ओलांडण्याच इच्छेनें आलेले लोक ते पैसेवान् असोत व दरिद्री असोत, कसले ही असोत त्या सर्व लोकांना प्रेमानें समदृष्टीनें पहावें.

१०७ मनुष्यानें वर्ण व आश्रम यांना उचित अशीं कृत्यें— मग तीं बरीं असोत वा वाईट असोत आपल्या धर्माप्रमाणें केल्यास तो पापी होऊं शकत नाहीं,

१०८ या करितां हे नावाड्यानो, धनवान् लोकांकडून पैसे घेऊन. गरिबांकडून कांहीं न घेतां, तसेंच तपस्वी वीरमाहेश्वर व आंधळे पांगळे वगैरे अशा लोकांना,

१०९ फुकट नेऊन सोडून तुह्मी सुखी होऊन रहा.” योगीश्रेष्ठ याप्रमाणें मोठ्या शांतपणानें त्या नावाड्याला उपदेश करून आपल्या इच्छित गांवीं गेला.

११० पूर्वीं हव्बूवंशरूपी वंशाला (वेळूला) मोतीं रूपानें असलेला व गुणी लोकांत श्रेष्ठ, व बुद्धिमान् असा चन्नमल्लप्पा नांवाचा एक वीरशैव होता.

अनूचानागतः श्रीमत्सिद्धरामस्य योगिनः ॥
पादपूजाधिकारोऽसौ यस्य वंशे विराजते ॥ १११ ॥
आजानुबाहुरायामवक्षःस्थलविराजितः ॥
वृषस्कंधो दयासिंधुर्बंधुर्दीनजनस्य च ॥ ११२ ॥
गुरूपदिष्टसन्मार्गमनुसृत्याटनक्षमः ॥
दुर्वृत्तिं दूरतो हित्वा सद्वृत्तेरनुपालकः ॥ ११३ ॥
अष्टावरणसंपत्तिसंपृक्तहृदयांबुजः ॥
पंचाचारपरः श्रद्धाभक्तिभाजनतां गतः ॥ ११४ ॥
भस्मनिष्ठागरिष्ठाशो भस्मोध्दूलितविग्रहः ॥
भस्मत्रिपुंड्रसंराजत्फालपट्टो महायशाः ॥ ११५ ॥
रुद्राक्षकंठमालः श्रीरुद्रपूजापरायणः ॥
रुद्रैकादशिनीमंत्रजापको पापदूरगः ॥ ११६ ॥

---

१११ श्री सिद्धराम शिवयोगीच्या पूजेचा अधिकार ज्याच्या वंशांत अनूचना ( चिरकाल ) चालत आलेला आहे.

११२ आजानुबाहू, विशालवक्षस्थल, बैलांच्या ओसणाप्रमाणें मान असलेला, कृपासिंधु, दीनजनबंधु.

११३ गुरूंच्या उपदेशाप्रमाणें वागणारा, दुर्वृत्ति सोडून चांगली वृत्ति असणारा,

११४ अष्टावरण संपत्ति युक्त हृदय कमलाचा, पंचाचार परायण, श्रद्धा भक्ति युक्त,

११५ भस्माचे ठिकाणीं पूर्ण विश्वास असलेला, शरीरावर भस्मोध्दूलन केलेला, कपाळावर भस्मत्रिपुंड्र लावलेला, मोठी कीर्ति मिळविलेला,

११६ गळ्यांत रुद्राक्षांच्या माळा धारण केलेला शिवपूजेंत तत्पर, श्रीरुद्र मंत्राचा जप करणारा पाप रहित,

गृहागतातिथीष्टार्थपरिपूरणमानसः ॥
ससाक्षिभोजनो जात्वप्यासीन्नासाक्षिभोजनः ॥ ११७ ॥
गुरुः पिता गुरुर्माता गुरुर्बंधुर्गुरुः शिवः ॥
गुरुः सर्वस्वमस्माकमिति ज्ञानवतां वरः ॥ ११८ ॥
परस्त्रीदर्शने काणः कुणिरन्यार्थसंहृतौ ॥
श्रोण उन्मार्गयाने यः पूर्णोऽपूर्वगुणोत्करैः ॥ ११९ ॥
मंदादरोऽन्यनिंदायाममंदाशः परस्तुतौ ॥
सदा सत्संगमोत्कंठः सुकंठः श्रितरक्षकः ॥ १२० ॥
शिवस्य शिवभक्तस्य न निंदां क्षमते मनाक् ॥
आत्मस्तुतिमिवाग्रेऽन्यैः कृतां कृतिमदुत्तमः ॥ १२१ ॥
गुरुजंगमलिंगानां नित्यनैमित्तिकादिकम् ॥
समर्चनं चरन् सम्यग्वित्तशाठ्यविवर्जितः ॥ १२२ ॥

---

११७ घरीं आलेल्या अतिथींची इच्छा पूर्ण करणारा, नेहमीं अतिथी-ला पंक्तीला घेऊन जेवणारा, आतिथीवाचून केव्हांही जेवण न करणारा.

११८ आपणांला गुरूच बाप, गुरूच आई, गुरूच आप्तेष्ट, गुरूच परमेश्वर, गुरूच सर्व कांहीं असें म्हणजणाऱ्या ज्ञानी लोकांत श्रेष्ठ.

११९ असा चन्नमल्लप्पा पर स्त्री पाहण्याविषयीं आंधळा पर द्रव्यापहारांत थोटा, वाईट मार्गानें चालण्यांत लंगडा, व उत्तम गुणांनीं परिपूर्ण.

१२० दुसऱ्याची निंदा करण्याविषयीं आवड नसलेला, दुसऱ्याची स्तुति करण्याविषयीं अतिशय आनंदी, नेहमीं सज्जनाच्या संगतीची अपेक्षा करणारा, आश्रितांचें रक्षण करणारा व उत्तम आवाजाचा,

१२१ आत्मस्तुतीप्रमाणेंच आपल्यासमोर शिव व शिवभक्त यांची दुसऱ्यांनीं केलेली निंदाही तो सहन करीत नसे व कार्यकुशल लोकांत उत्तम.

१२२ गुरु, लिंग, जंगम यांची नित्य नैमित्तिक अशा पूजेचें आचरण करणारा, द्रव्याचा गर्व नसलेला असा होता.

तस्य भार्या शिवा नाम सतीजनशिरोमणिः ॥
रूपसौंदर्यसौभाग्यजन्मभूमिरिवाबभौ ॥ १२३ ॥
वपुषा मनसा वाचा शिवांबा वरवर्णिनी ॥
देहं छायेव भर्तारमन्ववर्तत संततम् ॥ १२४ ॥
तयोर्दांपत्यसंपत्ती रोहिणीचंद्रयोरिव ॥
सर्वानंदकरी जाता रतिमन्मथयोरिव ॥ १२५ ॥
नवयौवनसल्लक्ष्मीसंशोभितकलेवरौ ॥
लावण्यलहरीखेलद्बालराजमरालकौ ॥ १२६ ॥
परस्परानुरागद्रुफलायितपरस्परौ ॥
देहभेदाद्विभिन्नौ तावेकप्राणाविव स्थितौ ॥ १२७ ॥
अनुरागे चक्रवाकौ सौंदर्ये रतिमन्मथौ ॥
तारुण्यागण्यसौख्येन निन्यतुर्दिवसान् बहून् ॥ १२८ ॥

---

१२३ त्याची बायको पतिव्रता बायांमध्यें मुख्य असलेली रस, सौंदर्य, सौभाग्य यांचे उत्पत्तिस्थानच कीं काय अशी शिवा नांवाची स्त्री होती.

१२४ देहाला अनुसरणाऱ्या सावली प्रमाणें ती तरुण स्त्री शिवांबा, शरीर, मन, बोलणें यांबाबतींत पतीला अनुसरून वागत असे.

१२५ रोहिणीचंद्राप्रमाणें व रतिमन्मथाप्रमाणें या उभयतां ( शिवांबा व चनमल्प्पा ) चें दांपत्य सर्वांना आनंदित करणारें असें होतें.

१२६ नूतन अशा तारुण्य संपत्तीनें प्रकाशमान् अशा शरीराचे हे दोघे लावण्यरूपी जलप्रवाहांत राजहंस पक्षाच्या जोडप्याप्रमाणें शोभत होते.

१२७ पतीच्या प्रेमरूपी झाडाला पत्नी हेंच फळ व पत्नीच्या प्रेमरूपी झाडाला पती हेंच फळ असे होतें. व ते उभयतां देहानें मात्र वेगळे असून प्राणानें ( मनानें ) एकच होते.

१२८ प्रेमाविषयीं चक्रवाक् पक्षी व सौंदर्याविषयीं रतिमन्मथ असलेले हे उभयतां तारुण्य सुखांत पुष्कळ दिवस घालविते झाले.

एकदैकांतदेशे सा संतानाभावतो भृशम् ॥
चिंतादंतुरचेतस्का पतिं वचनमब्रवीत् ॥ १२९ ॥

दंपत्योरपृथग्भावजलार्द्रा रागवल्लरी ॥
या चापत्यफलाद्धीना तया किं प्रियदर्शन ॥ १३० ॥

आत्मानं दूरतो दृष्ट्वा जानुचंक्रमणांचितम् ॥
हसंतं पुत्रमुत्थाप्य मूर्ध्नि जिघ्रति पुण्यभाक् । १३१ ॥

शिरश्चालनलोलाग्रैः कुंतलैरंचिताननम् ॥
पुत्रं पण्यवती हस्ततालेनानर्तयत्यलम् ॥ १३२ ॥

अंगणक्रीडया धूलिधूसरांगश्च बालकः ॥
यन्मातुरंकं मलिनं न करोति न सा प्रसूः ॥ १३३ ॥

---

१२९ एके दिवशीं शिवांबिका संतति नसल्यामुळें अतिशय चिंताग्रस्त होऊन एकांतांत नवऱ्याला म्हणाली.

१३० प्रेमरूपी वेल, दांपत्याच्या अपृथक् भावनारूपी पाणी शिंपीत असतांही तिला अपत्यरूप फळ आलें नाहीं.

१३१ लांबून आपणांला पाहून हासत व रांगत रांगत आलेल्या मुलाला उचलून घेऊन, पुण्यवान् मनुष्यच त्याचें चुंबन घेऊं शकतो.

१३२ डोक्याच्या हालचालीनें चलन पावलेले डोक्यावरील पुढील भागाचे केसांनीं किंचित् झांकलेल्या तोंडाचे मुलाला पुण्यवान् स्त्रीच हाताचे तालावर नाचवूं शकते.

१३३ आंगणांत खेळण्यानें तेथील धुळीच्यायोगानें मळिन झालेल्या शरीराचें मूल मांडीवर खेळण्यानें ज्या स्त्रीची मांडी मळिन होत नाहीं ती आईच नव्हे.

पुण्यवत्याः करांगुल्याश्चाग्रं धृत्वाऽर्भकः स्वयम् ॥
तद्वाचया वदन्नेको द्वौ त्रयश्चेति गच्छति ॥ १३४ ॥
पुन्नामनरकाद्यस्मात्त्रायते पितरावतः ॥
पुत्र इत्युच्यते सद्भिः शब्दशास्त्रविशारदैः ॥ १३५ ॥
किमैश्वर्येण भोग्येन तारुण्यकथया च किम् ॥
जातिप्रतिष्ठया किंवा यदि नास्त्यात्मसंभवः ॥ १३६ ॥
आवयोर्भागधेयं यदंतरायेण केन चित् ॥
सन्निरुद्धं भवेत्तचु पृच्छावो गणकांतिके ॥ १३७ ॥
इत्युक्त्वा गणकश्रेष्ठान् पप्रच्छ च पुनः पुनः ॥
शकुनज्ञवचांस्येवं भक्त्या शुश्राव सादरम् ॥ १३८ ॥
रव्यादिवासरेषूक्तग्रहाणां पूजनं पृथक् ॥
जपहोमादिकं कर्म कारयामास वैदिकैः ॥ १३९ ॥

१३४ पुण्यवान् स्त्रीच्या हाताच्या करंगळीचें टोंक धरून जाणारें मूल आईच्या सांगण्याप्रमाणें एक, दोन, तीन असें मोजीत जातें.

१३५ मुलगा पुन्नाम नरकापासून आई बापांचें रक्षण करतो अशी शब्द शास्त्रकार ( व्याकरण शास्त्रज्ञ ) पुत्र शब्दाची व्युत्पत्ति सांगतात.

१३६ मुलगा नसल्यास उपभोगण्यास योग्य अशा ऐश्वर्याचा काय उपयोग? तारुण्याचा काय उपयोग? व उच्च जातीच्या मोठेपणाचा तरी काय उपयोग ?

१३७ आपणा दोघांचे पुत्रविषयक दैव कोणत्या तरी एकाद्या विघ्नानें अडविलें गेलें असल्यास तें ज्योतिषांना विचारूं या.

१३८ असें म्हणून उत्तम ज्योतिषाला बोलावून वरचेवर विचारीत होती व शिवभक्त अशी शिवांबा शकून जाणणाऱ्या लोकांचे सांगणें मोठ्या प्रेमानें ऐकत होती.

१३९ रवि सोम इत्यादि दिवशीं उक्त ग्रहांची पूजा, निरनिराळे जप, होम वगैरे कृत्यें वैदिक लोकांकडून करवीत होती.

शुश्रावोपशृतीः क्षिप्त्वा चाक्षतादिकमन्वहम् ॥
सामुद्रिकाणां हस्तेषु हस्तं दत्वा नितंबिनी ॥ १४० ॥
पुत्राप्तिहेतुभूता या सा रेखा वर्तते न वा ॥
ब्रूतेति भक्तिभावेन पप्रच्छ च पुनः पुनः ॥ १४१ ॥
स्थित्वा विप्रश्निकायाश्च पुरतः श्रद्धया सह ॥
दत्वाऽक्षतादिकं शूर्पे गृहीत्वा दंडमंजसा ॥ १४२ ॥
दैवज्ञां तां च पप्रच्छ शुभं फलमथाशुभम् ॥
पुरोहितगणोक्तानि चचारासौ व्रतानि सा ॥ १४३ ॥
यद्यत्पुत्राप्तिहेत्वर्थं व्रतादिकमुदीर्यते ॥
तत्तत्कर्म करोति स्म धनव्ययमवीक्ष्य सा ॥ १४४ ॥
एवमेव व्रतादीनि तत्तदुक्तपथा पृथक् ॥
प्रकुर्वंत्याः शिवांबाया नासीत्पुत्राप्तिलक्षणम् ॥ १४५ ॥

---

१४० नहमीं अक्षतादि पदार्थ पुढें ठेवून उपश्रुति [ शकून ] वगैरे विचारीत असे. सामुद्रिकांच्या हातांत आपला हात देऊन ती स्त्री [ शिवांबा ]

१४१ पुत्रप्राप्ति ज्या रेषेनें दाखविली जाते अशी रेषा माझे हातावर आहे किंवा नाहीं तें सांगा असें ती वारंवार विचारीत होती.

१४२–१४३ विप्रश्निकेपुढें (                ) श्रद्धेनें उभी राहून तांदुळ वगैरे देऊन सुपांत एक काठी उभी केलेली ती धरून त्याला हें शुभ आहे कीं अशुभ आहे असा प्रश्न ती शिवांबिका विचारीत होती, आणि पुरोहितांकडून सांगण्यांत आलेली अनेक व्रतेंही ती करीत असे.

१४४ त्या चनमल्लपाची पत्नी ज्या ज्या लोकांकडून पुत्रप्राप्ती-कारितां जीं जीं व्रतें सांगण्यांत येत, तीं तीं सर्व खर्चाचे दृष्टीनें द्रव्याची पर्वा न करितां करीत होती.

१४५ ती शिवांबिका याप्रमाणें पुत्र प्राप्तिकारितां सांगण्यांत आलेलीं निरनिराळीं अनेक व्रतें सांगण्याबरहुकूम करीत असतांही पुत्रप्राप्तीचें चिन्ह-मात्र मुळींच दिसून येईना.

चन्नमल्लः स्वभार्याया मनोरथशतानि च ॥
धनव्ययबहुत्वेऽपि फलवंतीक्षते स्म न ॥ १४६ ॥
स्वर्लोको पुत्रहीनस्य नास्ति संसारिणो यदि ॥
असारभूते संसारे पुमर्थस्तस्य को भवेत् ॥ १४७ ॥
हित्वा निस्सारसंसारं कलत्रादिकदर्थितम् ॥
यात्रया क्षेत्रतीर्थानां जन्मसाफल्यमाप्नुयाम् ॥ १४८ ॥
इति मत्वा हृदंभोजे चन्नमल्लो महाशयः ॥
भार्यामनवबोध्यैव निशीथे निरगाद्गृहात् ॥ १४९ ॥
निर्गत्य तत्र तत्रासौ क्षेत्रे तीर्थे च पावने ॥
देवतावंदनैस्तीर्थस्नानैः साधुनिषेवणैः ॥ १५० ॥
पापप्रणाशपूर्वं तत्पुण्योपचयमादरात् ॥
कुर्वन् कुर्वन् महातेजा विचचाराखिलावनिम् ॥ १५१ ॥

---

१४६ त्या चनमलप्पानेंसुद्धां आपल्या बायकोचे शेंकडों संकल्प पुष्काळ द्रव्य खर्चून पूर्ण केले, तरी त्याचें फळ त्यानें पाहिलें नाहीं.

१४७ जर 'पुत्रहीन संसारी मनुष्याला स्वर्गप्राप्ति नाहीं,' असें असेल तर त्या पुरुषाचा या असार संसारामध्यें काय पुरुषार्थ आहे. [ कांहीं नाहीं ]

१४८ बायकामुळें इत्यादिकांनीं तुच्छ ठरलेल्या निःसार संसाराचा त्याग करून, क्षेत्रें तीर्थादिकांच्या यात्रा करून जन्माचें सार्थक करीन,

१४९ पूर्ण निराश झालेला ता चनमलप्पा याप्रमाणें मनांत निश्चय करून बायकोला न समजतां मध्य रात्रीं घरांतून बाहेर पडला.

१५० घरांतून बाहेर पडल्यानंतर या चनमलप्पानें पवित्र अशा त्या त्या क्षेत्रांत व तीर्थांत देवतांच्या दर्शनवंदनानें, तीर्थाच्या स्नान पानानें, आणि साधु लोकांच्या सेवेनें.

१५१ पापांचा नाश व पुण्याचा संचय करीत करीत महा तेजस्वी अशा चनमल्लप्पानें हिंदुस्थानभर संचार केला.

इत्येकादश वर्षाणि नीत्वा गोकर्णनामकम् ॥
पावनं क्षेत्रराजं तं समायात्पुरुषर्षभः ॥ १५२ ॥
अघमर्षणमंत्रैस्तैः स्नात्वा तस्मिन्सरित्पतौ ॥
महाबलेश्वरं सांबमिष्ट्वा भक्त्या ननाम च ॥ १५३ ॥
तस्मिन् शिवालये कंचिद्वसंतं मुनिपुंगवम् ॥
वीरमाहेश्वरं वीक्ष्य प्रणिपत्य च दंडवत् ॥ १५४ ॥
नीत्वैकादशवर्षाणि तीर्थक्षेत्राटने मया ॥
प्राप्तं द्वादशकं चापि पुरुषार्थो न साधितः ॥ १५५ ॥
तत्साधने महाभाग कोऽप्युपायोऽस्ति चेद्वद ॥
इति वादिनमेनं तं चन्नमल्लमुवाच सः ॥ १५६ ॥
अमृतांभोनिधिं हित्वा कूपांभोऽन्वेषणं कुतः ॥
धराशिवस्तवाचार्यो भुक्तिमुक्तिप्रदायकः ॥ १५७ ॥

---

१५२ अशाप्रकारें ११ वर्षें घालवून गोकर्ण नांवाच्या पवित्र व प्रसिद्ध क्षेत्रांत तो चनमल्लप्पा आला.

१५३ तेथें समुद्रांत अघमर्षण ( पाप नाशक ) मंत्रानें स्नान करून, महाबळेश्वर नांवाचे शिवलिंगाची भक्तिपूर्वक पूजा करून, त्याला नमस्कार केला.

१५४ त्याच शिवालयांत राहणारा मुनिश्रेष्ठ अशा एका वीर माहेश्वराला [ जंगमाला ] पाहून, साष्टांग नमस्कार करून,

१५५ हे स्वामी, आकरा वर्षें तीर्थक्षेत्रांत व यात्रेंत घालवून बारावें वर्ष लागलें असतांही मजकडून कोणताही पुरुषार्थ साधला गेला नाहीं.

१५६ हे तपस्वी श्रेष्ठा, महाभाग, त्या पुरुषार्थ साधण्यासंबंधी कांहीं उपाय असल्यास तो सांग असें विचारणाऱ्या त्या चनमलप्पाला तो तपस्वी सांगतां झाला.

१५७ ‘ हे पुण्यवान् पुरुषा, क्षीर समुद्र सोडून देऊन आडाचें पाण्याचा तपास कां करावा ? कारण तुझा गुरु साक्षात् भूशिव असून भोग व मोक्ष देणारा आहे.

तस्यैव संनिधिं गच्छ त्वदिष्टार्थः फलिष्यति ॥
नो चेन्नैवेति वक्तारमभिवंद्य महामतिः ॥ १५८ ॥
शिवक्षेत्रं समुत्सृज्य गुरुक्षेत्रमुपागमत् ॥
प्रणम्य शिरसा भक्त्या गुरुदेवं व्यजिज्ञपत् ॥ १५९ ॥
मद्गुरो मर्त्यताच्छन्नमृडभाव महागुरो ॥
तुर्याश्रमग्रहेच्छाऽस्ति यतो तेनामृतोऽस्म्यहम् ॥ १६० ॥
सन्यासाश्रमदानार्थमनेके शैवसत्तमाः ॥
अभ्यर्थिता अपि प्रोचुस्त्वामेव करुणानिधे ॥ १६१ ॥
श्रोत्रियं श्रीगुरुं गच्छेत्समित्पाणिरिति श्रुतिः ॥
तस्माद्गुरुवरं हित्वा मुक्तिदाने न कोऽप्यलम् ॥ १६२ ॥

१५८ त्याकरितां त्याच्याकडे जा, तुझा इष्ट हेतु साध्य होणार नाहीं. [अ]शा प्रकारें सांगणाऱ्या त्या शिवयोग्याला बुद्धिमान् अशा चनमल्लप्पानें [नम]स्कार करून.

१५९ शिवक्षेत्र असें गोकर्ण सोडून गुरु क्षेत्राला [ होटगीला ] तो [च]नमलप्पा आला. गुरूंना भक्तिपूर्वक नमस्कार करून त्यांना असें मागणें [सां]गितलें कीं,

१६० मनुष्यच्या शरीरानें झांकलेल्या शिवभावयुक्त अशा हे महा[गु]रो, हे माझ्या गुरो, संन्याशाश्रम स्वीकारण्याची माझी इच्छा आहे. कारण [त्या] आश्रमापासून मला मुक्ति प्राप्त होईल.

१६१ संन्याशाश्रम देण्याकरितां तपोनिधि अशा अनेक वीरशैवोत्तमांची [मीं] प्रार्थना केली असतांही हे दयानिधे, त्या सर्वांनीं तुझ्याकडे बोट दाखविलें [( तु]जकडे जाण्यास सांगितलें )

१६२ संन्याशाश्रम स्वीकारण्याची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें, हातांत [समि]धा घेऊन ब्राह्मण अशा श्रीगुरूकडे जावें, असें श्रुति सांगते. त्याकरितां [हे] तपोनिधे गुरुश्रेष्ठ अशा तुझ्यावांचून मुक्ति देण्यामध्यें दुसरा कोणीही [समर्थ] नाहीं.

तमेवानुग्रहं देहि नास्ति येन पुनर्भवः ॥
इत्थमत्यंतदैन्येन प्रार्थयंतं पुनः पुनः ॥ १६३ ॥

स्वांतेवासिनमालोक्य मर्त्यलोकमहेश्वरः ॥
प्रणिधानं क्षणं प्राप्य प्राह मंदस्मितं वचः ॥ १६४ ॥

भोगस्तवावशिष्टोऽस्ति स भोक्तव्योऽत्र जन्मनि ॥
नाभुक्तः क्षीयते भोगस्तुर्याश्रमकथा च का ॥ १६५ ॥

शिवायां तनयस्त्वत्तो भवितव्यः शिवाज्ञया ॥
शिवाज्ञामतिवर्तेत सुरासुरनरेषु कः ॥ १६६ ॥

तस्मादस्मद्वचः शृत्वा कालं तं परिपालयन् ॥
सेवां कुरु यथाकामं शिवस्य शिवयोगिनाम् ॥ १६७ ॥

---

१६३ ज्या उपदेशानें पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं, त्याचाच अनुग्रह कर असें अति दीनपणानें वारंवार प्रार्थना करणाऱ्या;

१६४ आपल्या शिष्याला पाहून, मृत्युलोकचा महादेवच असा तो गुरु, थोडा वेळ एकाग्र होऊन मंदस्मित मुखानें म्हणालाः—

१६५ हे शिष्या, तुझे भोग अद्याप राहिले आहेत ते याच जन्मांत भोगणें जरूर आहे, ते भोग भोगल्यावांचून नाश पावत नाहींत, म्हणून संन्याशिाश्रमाची गोष्ट कशाला !

१६६ परमेश्वराच्या आज्ञेनें तुझी बायको शिवांबिका इचे पोटीं तुझ्याकडून मुलगा उत्पन्न होणार आहे. देव, राक्षस आणि मनुष्य यांमध्यें परमेश्वराची आज्ञा मोडून कोण वागतो आहे. [ कोणी नाहीं ]

१६७ त्याकरितां माझें बोलणें ऐकून त्या [ पत्नीच्या समागमाचे ] वेळची वाट पहात शिव व शिवयोगी यांची यथेच्छ सेवा कर.

इत्याचार्योक्तवाक्येऽस्मिन् मत्वा प्रामाण्यमग्रधीः ॥
आसीच्छ्रीचन्नंदीशगुरुसेवापरायणः ॥ १६८ ॥

गुरोराज्ञां विना स्वर्णवल्लीं गंतुमशक्नुवन् ॥
नित्यं संदर्शनार्थं श्रीसिद्धरामाभिधानकम् ॥ १६९ ॥

शिवलिंगं यथाशास्त्रं प्रतिष्ठाप्य बृहन्मठे ॥
दर्शनादर्चनात्तस्य मोदमानमना बभौ ॥ १७० ॥

इतः पत्युरविज्ञातप्रवासा शोकपीडिता ॥
शिवांबा प्राहिणोच्छीघ्रं तमन्वेष्टुं चरान् बहून् ॥ १७१ ॥

दिगंतराण्यनेकानि चिरमन्विष्य सेवकाः ॥
प्रत्याययुः प्रणष्टाशाः शुष्कवक्त्रा गृहं प्रति ॥ १७२ ॥

---

१६८ याप्रमाणें गुरूंकडून सांगण्यांत आलेली गोष्ट प्रमाण भूत मानून सूक्ष्म बुद्धीचा चनमलप्पा श्री चन्नबसवस्वामींच्या सेवेंत अत्यासक्त होऊन राहिला.

१६९ गुरूंच्या आज्ञेशिवाय सोलापूरला जाण्यास असमर्थ होऊन, सिद्धरामेश्वराच्या नित्य दर्शनाकरितां श्रीसिद्धराम नामक,

१७० शिवलिंगाची बृहन्मठांत यथाशास्त्र स्थापना करून, त्या सिद्ध-राम नामक शिवलिंगाचें दर्शन, स्पर्शन, पूजा इत्यादिकांनीं अति संतुष्टपणें रहात असे.

१७१ इकडे पतीच्या प्रवासाची वार्ता न कळल्यामुळें दुःखित झालेली शिवांबा पतीच्या शोधार्थ अनेक दूतांना ताबडतोब पाठविती झाली.

१७२ अनेक दिशांना बरेच दिवस चाकर, यजमानाचा शोध करीत असतां तपास न लागल्यामुळें निराश व म्लान मुखाचे होऊन घरीं परत आले.

ये चानयंति भर्तारं तेभ्यो दास्यामि निश्चितम् ॥
सहस्रं रूप्यकाणामित्याख्यातं घोषणामुखात् ॥ १७३ ॥
भर्तुरन्वेषणे ये ये संत्युपाया मनस्विनी ॥
तान् सर्वान् कारयामास तथापि न तदागमः ॥ १७४ ॥
अत्र चास्तीति तद्वार्ताप्यसौ नासीद्विधेरहो ॥
दुर्विलासो दुरंतश्चेत्युक्तिः साधीयसी कवेः ॥ १७५ ॥
दुःखाग्न्यत्यन्तसंतप्तस्वांता सा गृहकर्मणि ॥
स्नानशौचार्चनादौ च मनो नादान्मनागपि ॥ १७६ ॥
सखीजनबलात्काराद्रूक्षं मितिसमान्वितम् ॥
अन्ह्येकदा कदन्नं सा भुंजाना भर्तृमानसा ॥ १७७ ॥

---

१७३ 'माझ्या पतीचा शोध करून त्यांना मजकडे आणून पोहोंचते करणाराला एक हजार रुपये बक्षीस देईन.' अशा प्रकारें गांवांत डांगोरा पिटविला.

१७४ नवऱ्याचा तपास करण्याकरितां असलेले सर्व उपाय त्या प्रशस्त मनाच्या शिवांबिकेनें करविले, परंतु नवऱ्याचें आगमन झालें नाहीं.

१७५ किंवा पती अमक्या ठिकाणीं आहे, अशी अहो, वार्तासुद्धां लागली नाहीं. 'दैवाचा खेळ समजणें अशक्य आहे' ही कवीची उक्ति खरी आहे.

१७६ दुःखाग्नीनें अतिशय सतप्त झालेल्या मनाची ती शिवांबा, गृहकर्मांत, स्नान शौचादि कामांत, थोडेंसुद्धां लक्ष पुरवीत नसे.

१७७ नवऱ्याकडे मन वेधलेली ती शिवांबा, सख्यांच्या बळजबरीनें रुक्ष व मोजकें कदान्न दिवसांतून एकदांच सेवन करीत होती.

दूरीकृतांगरागादिः केशसंस्कारवर्जिता ॥
मृदितं मलिनं वस्त्रं दधती सुदती तथा ॥ १७८ ॥

बहुमूल्यं मनोहारि मंचादिशयनं शिवा ॥
हित्वाऽसंस्कृतभूशय्या नयंती साऽनिशं निशं ॥ १७९ ॥

अहो दैवी गतिश्चित्रेत्युच्यते यद्बुधोत्तमैः ॥
सा चोक्तिर्न मृषाऽल्पाऽपि यस्माच्चेयं शिवांबिका ॥१८०॥

पत्युरागमनार्थं च परान् पृष्ट्वाऽफलाऽभवत् ॥
गुरुमंतिकपल्लीस्थं पृष्ट्वा न सफलाऽभवत् ॥ १८१ ॥

क्रमेणानेन सा साध्वी नीत्वैकादशवत्सरान् ॥
यदा द्वादशकं वर्षमगमत्तनुमध्यमा ॥ १८२ ॥

---

१७८ पतिवियोगानें दुःखी असल्यामुळें अंगाला लावण्याचीं उटणें वगैरे सोडून दिलीं होती, केंस विंचरणें वगैरेही सोडलें होतें, चुरगळलेलें व मलिन असें वस्त्र नेसत होती,

१७९ ती शिवांबा अति मोल्यवान् मनोहर पलंग वगैरे झोंपण्याची साधनें सोडून केरकचरा असलेल्या जमिनीवर निजून रात्र घालवीत होती.

१८० अहो, 'दैवगती विचित्र आहे' असें ज पंडित सांगत असतात तें म्हणणें थोडेंसुद्धां खोटें नाहीं. कारण—ही शिवांबा,

१८१ नवऱ्याच्या आगमनाविषयीं इतरांना विचारून निराश झाली, पण जवळच असलेल्या खेड्यांत ( होटगींत ) गुरुस्वामींना विचारून सफल झाली नाहीं.

१८२ सूक्ष्म कटिबंधाची ती पतिव्रता याप्रमाणें आकरा वर्षे घालवून जेव्हां १२ वें वर्ष लागलें,

तदा हृद्दर्पणे तस्याः प्रतिच्छाया गुरोर्बभौ ॥
अनुकूले विधौ सर्वं समायात्यनुकूलताम् ॥ १८३ ॥
शिवांबा श्रीगुरोः पादपद्मालोकनहेतुना ॥
जगाम होट्गिग्रामं मितपार्श्वचरा सती ॥ १८४ ॥
गत्वा बृहन्मठं तत्र वसंतं गुरुसत्तमम् ॥
राजहंसमित्रांभोजे दृष्ट्वा हृष्ट्वा ननाम सा ॥ १८५ ॥
उत्तिष्ठोत्तिष्ठ वत्से त्वं शिवे पुत्रवती भव ॥
इत्याशिषं गुरोः श्रुत्वा विस्मिता वनिताऽवदत् ॥ १८६ ॥
स्वामिन् मम प्रियतमो विषयांतराणि गत्वा
गताः किल समा बहवो विरागात् ॥
अन्वेषणे बहुविधेऽपि कृते स भर्ता नासादितः परिजनेन
गुरो मदीयः ॥ १८७ ॥

---

१८३ तेव्हां तिच्या हृदयरूपी आरशांत गुरुस्वामींचे प्रतिबिंब तिला दिसलें. कारण—'दैव अनुकूल असेल तर सर्व कांहीं अनुकूल असतें.'

१८४ ती शिवांबा गुरूंच्या पदकमळांच्या दर्शनाकरितां ठराविक सेवकांसह होटगी गांवाला गेली.

१८५ तेथें बृहन्मठाला जाऊन कमळाचेठायीं राहणाऱ्या राजहंस पक्षाप्रमाणें त्या मठांत असणाऱ्या स्वामींना पाहून संतुष्ट होऊन तिनें नमस्कार केला.

१८६ 'हे मुली शिवांबा, ऊठ, ऊठ. तूं पुत्रवती हो.' अशा प्रकारचें गुरूंचें आशीर्वादाचें भाषण ऐकून, आश्चर्य चकित झालेली ती शिवांबा म्हणाली,

१८७ 'हे स्वामी, माझा पती वैराग्यामुळें देशांतरास जाऊन ११ वर्षें संपून १२ वें वर्ष चालू आहे. सेवकांकडून अनेक प्रकारांनीं तपास केला तरी हे स्वामी, नवऱ्याचा तपास लागला नाहीं.

पंचाशदब्दवयसा परिपूरिताऽहं पंचेंद्रियाणि मनसा
न तथा पटूनि ॥
पूर्वं यथा किल तथा न रजोविकारः पुत्रोदयो मयि
कथं भविता तपस्विन् ॥ १८८ ॥
वत्सेऽन्यथा मम वचो भवतीति मा त्वं संभावयात्मनि
मनागपि मानिनीशे ॥
प्रेयान् पतिस्त्विह मठे परिवर्ततेऽद्य संदर्शयामि
सुभगे जहि संशयं त्वम् । १८९ ॥
इत्थं निवेद्य वनितामणये मठांतःसंवर्तमानमनघं
व्हयति स शिष्यम् ॥
सोऽप्यंजसा विनयनम्रशिराः समेत्य पादाब्जयोर्गुरुवरस्य
पपात भक्त्या ॥ १९० ॥

---

१८८ हे तपस्वी श्रेष्ठा, माझे वयाला पन्नास वर्षे झालीं आहेत, चक्षुरादि इंद्रियें व मन हीं आपापल्या विषयग्रहणाविषयीं समर्थ नाहींत रजस्वलेचा विकार ही पूर्वीप्रमाणें नाहीं ( पुष्कळ कमी झालेला आहे. ) तेव्हां हे गुरूत्तमा, तपस्वी, माझेकडून पुत्रोत्पत्ति कशी संभवेल.'

१८९ गुरुवर्य सांगतात:–' हे स्त्री श्रेष्ठ शिवांबा, वत्से, माझें वचन असत्य होईल असें तूं मनांत किंचित्सुद्धां आणूं नकोस. तुला प्रिय असलेला तुझा नवरा याच मठांत राहतो. हे सुभगा, तो आज तुज दाखवितों. तूं शंका सोडून दे.'

१९० अशाप्रकारें वनिताश्रेष्ठ शिवांबाला सांगून मठांत असणाऱ्या दोषरहित अशा त्या शिष्याला ( चनमल्ल्याला ) बोलाविलें. गुरूंनीं बोलावतांच तो शिष्यसुद्धां तावडतोब येऊन विनयानें नम्र होऊन गुरूंच्या पायांवर मस्तक ठेवून मोठ्या भक्तीनें नमस्कार करितां झाला.

विचारशीलः स गुरोर्गिरा तया शरीरसंस्थेन च लक्षणेन तां॥
स्वकीयभार्येति विबुध्य लज्जया ननाम मूर्धानमहो
गुरोः पुरः ॥ १९१ ॥
जाते प्रियोऽसौ परिपूर्णकामो भवेद्भवत्यां वरपुत्रलाभात् ॥
अशेषतीर्थौघनिषेवणात्त्वं वृथा कथं स्यात्सुकृतं
सुकेशि ॥ १९२ ॥
इत्यादिवाग्भिः सुदृशीं शिवांबामाश्वास्य पत्या
सहितां मठेऽसौ ॥
दिनानि चत्वारि च वासयित्वा संप्रेषयामास
पुरं तदीयम् ॥ १९३ ॥
तौ दंपती स्वीयमुपेत्य गेहं गेहीयकृत्यादिषु दत्तचित्तौ ॥
चित्तोद्भवारातिपदानुरक्तौ सुखेन कालं नयतः स्म
नित्यम् ॥ १९४ ॥

---

१९१ नंतर-विचारशील असा चनमल्लप्पा ही गुरूच्या त्या भाषणानें व शरीरावर असेलल्या त्या त्या चिन्हांनीं तिला ( शिवांबेला ) आपली पत्नी असें समजून गुरुवर्य चन्नबसव स्वामींच्या पुढें अहो, लज्जेनें मस्तक वाकविलें.

१९२ तेव्हां गुरु म्हणतो-'हे वत्से, शिवांबे, हा प्रियतम ( चनमल्लप्पा ) तुझ्या ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या मुलाचे योगानें मनोरथ पूर्ण झालेला असा होईल. कारण-हे सुकेशी सर्व तीर्थांच्या सेवनापासून प्राप्त झालेलें त्याचें पुण्य व्यर्थ कसें होईल? [ होणार नाहीं. ]

१९३ गुरूत्तमानें अशा प्रकारच्या भाषणानें त्या शिवांबेचें समाधान करून, तिला पति चनमल्लप्पा सह मठांत चार दिवस ठेवून घेऊन, नंतर त्यांच्या गांवाला त्यांना ( चनमल्लप्पा व शिवांबा यांना ) पाठवून दिलें.

१९४ याप्रमाणें गुरूचा निरोप घेऊन तें जोडपें आपल्या घरीं येऊन आपल्या गृहकार्यांत निमग्न होऊन, नेहमीं मन्मथाचा शत्रु अशा परमात्म्याच्या पदकमलांचें ध्यान करीत सुखानें कालक्रमण करीत होतें.

शिवांबा गर्भमाधत्त मुहूर्ते शुभलक्षणे ॥
हव्वन्वयविभूत्यर्थमत्यर्थं कृपया गुरोः ॥ १९५ ॥

अथ प्राप्तोदयं भर्तुरीप्सितं गर्भलक्षणम् ॥
बांधवांबकनीलाब्जज्योत्स्नामुखमधादियम् ॥ १९६ ॥

तनुतानवसंत्यक्तभूषायास्तन्मृगीदृशः ॥
क्रमेण ववृधे गर्भः प्रतिपच्छीतभानुवत् ॥ १९७ ॥

शुभंयुगुणसंकीर्णे मुहूर्ते सा शिवांबिका ॥
जनयामास वै पुत्रं चंद्रमैंद्रीदिशा यथा ॥ १९८ ॥

सुतोत्पत्तिसमुद्भूतहर्षातिशयतः पिता ॥
भूरिदानं समायातयाचकेभ्यो ददौ सुधीः ॥ १९९ ॥

---

१९५ एके दिवशीं ती शिवांबिका. हव्वू वंशाच्या वाढीकरितां चन्नवसव गुरूंच्या कृपेनें. उत्तम मुहुर्तावर गरोदर झाली.

१९६ नवऱ्याला इष्ट, आप्त लोकांच्या नेत्ररूपी रात्रींच्या कमलांना चांदणेंच असें उत्पन्न झालेलें तें गर्भ चिन्ह शिवांबिकेनें धारण केलें.

१९७ शरीर कृष ( रोड ) झाल्यामुळें अलंकाराचा त्याग केलेल्या, हारिणीच्या नेत्रांप्रमाणें नेत्र असलेल्या त्या शिवांबेचा गर्भ प्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें दिवसेंदिवस वाढूं लागला.

१९८ शुभकारक गुणांनींयुक्त अशा उत्तम मुहुर्तावर ती शिवांबिका- पूर्वदिशा चंद्राला प्रसवते त्याप्रमाणें- मुलाला प्रसवली.

१९९ पिता असलेला व बुद्धिमान् चनमलप्पा पुत्रोत्पत्तीच्या योगानें उत्पन्न झालेल्या अत्यानंदामुळें-आलेल्या याचक लोकांना पुष्कळसा दान धर्म करतां झाला.

मल्लिकार्जुनसिद्धेश्वरेवणासिद्धदेवताः ॥
लिंगमूर्तीरुपास्ते स सोऽभिषेकादिभिर्नवैः ॥ २०० ॥

आत्मजस्याभिधानं श्रीसिद्धराम इति श्रुतम् ॥
जनकश्चन्नमल्लाख्यो विदधे वैदिकैः सह ॥ २०१ ॥

श्रीमतश्चन्नमल्लस्य प्रयत्नादुत्तमादयम् ॥
ववृधे बालकोऽगैः स्वैरर्कभानोर्विधुर्यथा ॥ २०२ ॥

विधातुं कर्म चौलाख्यं सुतमादाय दंपती ॥
बांधवैः सहितावात्मगुरोर्मठमुपागतौ ॥ २०३ ॥

आचार्यपादौ शिरसा निपीड्य हस्तांजलिं मस्तकमाप्रपद्य ॥
अनन्यभक्त्या किल चन्नमल्लः प्रोवाच वाचं गुरु
सार्वभौमम् ॥ २०४ ॥

---

२०० अतिशय आस्तिक भावनेच्या त्या चनमलप्पानें मल्लिकार्जुन, सिद्धरामेश्वर, रेवणसिद्ध नामक शिवलिंग मूर्तींची नूतन अशा अभिषेकादि उपचारानें पूजा केली.

२०१ चनमलप्पानें वैदिक लोकांसह ' सिद्धराम ' असें त्या मुलाचें नांव ठेविलें.

२०२ श्रीमान् अशा त्या चनमलप्पांच्या उत्तम प्रयत्नांनीं हा मुलगा [ सिद्धराम , सूर्यकिरणांनीं चंद्रबिंबाचे वाढीप्रमाणें वाढूं लागला.

२०३ ते नवरा बायको ( चनमलप्पा व शिवांबा ) मुलाचें चौलकर्म [ जावळ काढणें , करण्याचे उद्देशानें आपले आप्तेष्टांसह गुरूच्या मठाला आले.

२०४ नंतर चनमलप्पानें गुरु सार्वभौम अशा चन्नबसव शिवाचार्यांच्या पायांवर मस्तक ठेवून नमस्कार करून, हात जोडून अनन्य भक्तीनें सांगितलें, कीं: —

अलोकसामान्यमहोमहीयसां भवादृशानां वचनं तपोनिधे॥
सदाऽर्थसिद्धिर्ह्यनुवर्तते पुनर्न तादृशानां
विपरीतमीर्यते ॥ २०५ ॥

आपन्नवृद्धभावाऽपि यत्प्रासूत सुतं सती ॥
गुरो तव प्रभावोऽयमत्यद्भुतकरः किल ॥ २०६ ॥
कृत्वाऽस्य तनुजातस्य चौलकर्म यथाविधि ॥
अस्मानस्मत्कुलं चापि समुद्धर दयानिधे ॥ २०७ ॥
इति प्रार्थयतः शिष्यस्याऽऽत्मजातस्य तापसः ॥
सुमुहूर्ते चौलकर्म विधाय विधिपूर्वकम् ॥ २०८ ॥
पूर्णकामान् गंतुकामान् शिष्यान् शिष्येष्टबांधवान् ॥
संभाव्य चाशिषा सर्वान् वचसा मधुरेण च ॥ २०९ ॥
संप्रेष्य हेमवल्ल्याख्यं पुरं सुरपुरीसमम् ॥
स्वीये बृहन्मठे ब्रह्मपारायणपरैर्वृते ॥ २१० ॥

---

२०५ हे तपोनिधे असाधारण अशा ब्रह्मतेजानें श्रेष्ठ असलेल्या आपणासारख्यांचे वचनाप्रमाणें, केव्हांही कार्यसिद्धि होणारच. इतरांचीं वचनें कार्यसिद्धीला अनुसरतात. ( कार्य सिद्धीचीं लक्षणें पाहून त्याप्रमाणें सांगतात.)

२०६ ही माझी पत्नी म्हातारी झाली असतांही मुलाला प्रसवली तिचें तें प्रसवणें म्हणजे हा आपला अतिशय आश्चर्यकारक असा प्रभावच होय.

२०७ हे दयानिधे गुरूत्तमा, या मुलाचें चौलकर्म यथाशास्त्र करून आमचा व आमच्या कुलाचा उद्धार करावा

२०८ अशाप्रकारें प्रार्थना करणाऱ्या शिष्य अशा चनमलप्पाच्या मुलांचें चौलकर्म तपस्वी अशा चन्नबसव सुमुहुर्तावर विधीपूर्वक करितां झाला.

२०९-२१० नंतर सर्व मनोरथ पूर्ण झालेले व आपल्या गांवास जाऊं इच्छिणाऱ्या सर्व शिष्यांना व त्यांचा आप्तेष्टांना आशीर्वादानें व मधुर भाषणानें आदरसत्कार करून, इंद्र भुवन तुल्य अशा सोलापुरास पाठवून लोकांनींयुक्त अशा वेद पारायणांत आसक्त झालेल्या आपल्या बृहन्मठांत.

वंदारुवृंदमंदारचंद्रचूडार्चनारतः ॥
सुखेनासीच्चन्ननंदी शिवाचार्यस्तपोनिधिः ॥ २११ ॥

सुरासुरशिरःखेलदादेशं मदनं दृशा ॥
शंभोर्दग्धवतोऽर्धांगं याऽहरत्तां नुमः शिवाम् ॥ २१२ ॥

—◉ इत्यष्टमोऽध्यायः ◉—

---

२११ नमस्कार करणाऱ्या लोकांना कल्पवृक्ष होऊन राहिलेला, ईश्वराचे पूजतें आसक्त झालेला तपोनिधि असा चन्नबसवस्वामी सुखानें रहात होता.

२१२ देव राक्षसांच्या मस्तकांवर खेळणाऱ्या आज्ञा युक्त मन्मथाला भालनेत्रानें जाळलेल्या व ईश्वराचे अर्धे शरीर अपहार केलेल्या, अशा पार्वतीला नमस्कार करतों.

—•: अध्याय ८ वा समाप्त :•—



॥ श्रीरस्तु ॥

ॐनमः पंचजगद्गुरुभ्यः

## श्री. ष. ब्र. चन्नबसव विजय पुराणम्ः



# श्रीरस्तु अथ नवमोऽध्यायः शिवमस्तु

अपूर्वब्रह्मचर्यश्रीरर्धनारीकलेवरे ॥
यस्मिंश्चकास्त्यसंबाधं नमस्तस्मै शिवाय मे ॥ १ ॥

ईश्वरेण क्रुधा दग्धो मदनः कृपया यया ॥
संजीवितः कृपावत्यै पार्वत्यै स्तान्नमो मम ॥ २ ॥

दिगंतव्याप्तसत्कीर्तिर्दिननाथमहन्महाः ॥
दीनालीदैन्यदावाग्निर्दानशौंडो दयानिधिः ॥ ३ ॥

---

१ ज्या अर्धनारीच्या शरिराचेठायीं नवीन ब्रह्मचर्याची शोभा थोडीही कमी न होतां ( पूर्णपणें ) प्रकाशमान होते अशा शिवाला माझा नमस्कार असो.

२ ईश्वराकडून रागानें जाळ लागलेल्या मन्मथाला कृपेनें ज्या पार्वतीनें जिवंत केलें. अशा त्या पार्वतीला माझा नमस्कार असो.

३ दाही दिशांना कीर्ति गाजून राहिलेला, सूर्याप्रमाणें तेजस्वी, गरि- बांच्या दारिद्र्यरूपीं अरण्याला दावाग्नी होऊन राहिलेला दानशील दयानिधी

पायिताधेयसद्बोधपीयूषोऽतेनिवासिनाम् ॥
दर्शिताशेषसन्मार्गरहस्यः श्रेयसः सुधीः ॥ ४ ॥
यथाशास्त्रं कृताभ्यासो नित्यमीशार्चनाविधौ ॥
यथारुचि मिताहारो मितसंभाषणोऽनघः ॥ ५ ॥
त्याजयित्वा ह्यपंथानं ग्राहयित्वा च सत्पथम् ॥
सहस्रशो जनान् सम्यगुद्धरन् सिद्धिमत्तरः ॥ ६ ॥
गंगादितीर्थेषु च सागरेषु स्नात्वाऽघमर्षैः किल वेदमंत्रैः ॥
श्रीशैलमुख्येषु च पुण्यदेषु क्षेत्रेषु दृष्ट्वा
शिवलिंगमूर्तीः ॥ ७ ॥
यथेष्टकालं किल तत्र तत्र धृतव्रतो दूरकृताघपूगः ॥
तप्त्वा तपः शंभुसमर्चनाख्यं समुद्दिदीपेऽर्क
इवात्मदीप्त्या ॥ ८ ॥

---

४ शिष्यांना सद्बोधामृताचें पान करविलेला, हिताच्या मार्गाचें रहस्य दाखविणारा, बुद्धिमान्,

५ शिवार्चन कर्म नेहमीं शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें करणारा, आवडीचा पण मित आहार घेणारा मितभाषणी, पापरहित

६ वाईट मार्ग सोडवून चांगल्या मार्गाचें अवलंबन करवून हजारों लोकांचा उद्धार करणारा सिद्धि प्राप्त करून घेणाऱ्यांत श्रेष्ठ,

७ असा चन्नबसवस्वामी गंगादि तीर्थांत, समुद्रांत अघमर्षण नांवाच्या वेदमंत्रांनीं स्नान करून पुण्यप्राप्तीच्या श्रीशैल वगैरे क्षेत्रांतील शिवलिंग मूर्ति पाहून,

८ त्या त्या ठिकाणीं व्रतधारी होऊन, शिवपूजारूपी तपश्चर्या मनसोक्त कालपर्यंत करून, पापरहित होऊन, आत्म तेजानें चांगल्याप्रकारें शोभत होता.

संचारपूतान् विषयाननेकान् भक्ताननेकानुपदेशपूतान् ॥
विधाय विद्वान्विचचार नित्यं परोपकाराय सतां
विभूतिः ॥ ९ ॥

एवं क्रमेणार्यमनास्तपस्वी शिष्योद्धृतौ बद्धकटिः पटीयान् ॥
वर्षाण्यशीतिं ससुखं विनीय चैकोत्तराशीतितमां
समागैत् ॥ १० ॥

अथैकदेशानिदेशतोऽस्य श्रीचन्नबंदीशगुरूत्तमस्य ॥
स्वप्ने तटित्कांतजटाभिरामो रुद्राक्षमालाभरणः
शरण्यः ॥ ११ ॥

सतोयभस्मादृतफालपुंड्रः काषायवासःकमनीयवेषः ॥
कश्चिद्विपश्चित्प्रमथः समेत्य समब्रवीत्तं नु
समंदहासम् ॥ १२ ॥

---

९ देशांना पर्यटनानें पवित्र करून, भक्तांना उपदेशानें पवित्र करून, विद्वान् असा चन्नबसव शिवाचार्य संचार करीत होता. कारण—'जगाच्या कल्याणा संताच्या विभूति' या म्हणीप्रमाणें या महात्म्याचा अवतार हा सर्वस्वी जगाच्या कल्याणाकरतांच होता.

१० थोर मनाचा तपस्वी, शिष्यांच्या उद्धाराविषयीं आदर असलेला, कार्यदक्ष, अशा चन्नबसव शिवाचार्याला अशा प्रकारें ८० वर्षें सुखानें जाऊन ८१ वें वर्ष लागलें.

११–१२ नंतर एकेदिवशीं ईश्वराच्या आज्ञेनें या गुरूत्तम अशा चन्नबसवस्वामींच्या स्वप्नांत, विजेप्रमाणें असणाऱ्या अशा जटाधारण करणारा, रुद्राक्ष माळा घातलेला, रक्षण करण्यामध्यें दक्ष, कपाळावर जलमिश्रित त्रिपुंड्र लावलेला, भगव्यावस्त्रानें शोभणारा, असा बुद्धिमान् एक प्रमथ, प्रकट होऊन मंद हास्य करून त्या चन्नबसवाला सांगतां झाला.

स्वामिन् समाप्ता भवतो भवस्य यात्राऽत
एवाऽऽव्हयितुं भवन्तं ॥
मां प्राहिणोत्पर्वतराजपुत्रीप्राणप्रियः शंभुरमंदसत्वः ॥१३॥
विनश्वरं विश्वविमोहमूलं कलेवरं कल्पितजीवगेहम् ॥
विमुच्य मुक्तिश्रियमाप्तुमैशं पदं समायाहि
समीक्ष्यकारिन् ॥ १४ ॥
इत्युक्तवंतं विनयं किरंतं विश्वातिशायीश्वरभक्तिमंतम् ॥
समीक्ष्य सांबानुचरं महर्षिरुवाच वाचं मधुरां
सुधावत् ॥ १५ ॥
श्रुत्वा पारिषदाधीश वचनं ते शिवस्य च ॥
दृष्ट्वा कृपारसानल्पलहरीं पतितां मयि ॥ १६ ॥

---

१३ 'हे स्वामी' आपली संसारयात्रा संपली म्हणून अधिक सामर्थ्यवान् पार्वतीचा पति अशा शंकरानें तुला बोलावून आणण्यास मला पाठविलें आहे.

१४ हे बुद्धिमान् चन्नबसवस्वामी, नाशवंत, प्रपंचाच्या मोहाला कारणीभूत, जीवाला कल्पित घर असलेलें असें शरीर सोडून मोक्षलक्ष्मी प्राप्त करून घेण्यास शिवसंबंध असलेल्या अशा शिवस्थानास–हे विचारवान् चन्नबसवा—या '

१५ याप्रमाणें सांगणारा, विनय व्यक्त करणारा, श्रेष्ठ शिवभक्तियुक्त अशा, शिवाचा सेवक असलेल्या प्रमथाला पाहून, अमृताप्रमाणें गोड असें भाषण चन्नबसव स्वामी करूं लागला.

१६ हे प्रमथ श्रेष्ठा, तुझें भाषण ऐकून माझ्यावर श्रेष्ठ अशा शिवाच्या कृपा रसाचा प्रवाह पडलेला पाहून

धन्योऽस्मि जन्मिनां मध्ये मान्यश्चास्म्यहमेव वै ॥
दीयमानां सुधां हित्वा कः पिबेदाम्लपानकम् ॥ १७ ॥

भगवन्नपराण्हेऽहं श्वोऽवश्यं शिवसन्निधिम् ॥
आयास्यामीति निश्शंकं यदोवाच महामुनिः ॥ १८ ॥

तदानीं प्रमथस्तूर्णमंतर्धानं समाययौ ॥
प्रबुध्य पश्यति स्वामी न प्रमथो न कश्चन ॥ १९ ॥

पुरस्कृत्यारुणं भानुरुदेत्युत्तिष्ठत प्रजाः ॥
इतीव ध्वनतस्ताम्रचूडस्यारवमशृणोत् ॥ २० ॥

उत्थाय शयनात्प्रातः स्नात्वा सम्यक् शिवार्चनम् ॥
यथाविधि विधायार्यः पौरानाहूय चाब्रवीत् । २१ ॥

---

१७ प्राणिमात्रांत मीच धन्य आहे, मीच मान्य आहे, दिलें जाणारें अमृत सोडून आंबट पन्ह्याचें कोण प्राशन करील? [कोणी करणार नाहीं]

१८ हे भगवान्, मी उद्यां सायंकाळीं शिवाच्या जवळ जरूर येईन असें महर्षि अशा श्री चन्नबसव शिवाचार्यांनीं निःशंक होऊन जेव्हां सांगितलें,

१९ तेव्हां लगेच तो प्रमथ तेथेंच अंतर्धान पावला. नंतर चन्नबसव स्वामी जागा होऊन पाहतो तों प्रमथही नाहीं, आणि कोणीही नाहीं

२० सूर्य अरुणाला पुढें करून उदयाला येत आहे. हे लोक हो, उठा असें सांगत आहे कीं काय? अशा ओरडणाऱ्या कोंबड्याचा आवाज गुरुवर्यांनीं ऐकिला,

२१ नंतर श्रेष्ठ असे चन्नबसव स्वामी प्रातःकाळीं अंथरुणांतून उठून, स्नान करून, विधिप्रकारें शिवपूजा करून, गांवांतील प्रमुख लोकांना बोलावून त्यांना सांगत झाले;

भो पौराग्रसरा यूयं शृणुतास्मद्वचोऽतिमम् ॥
जाताऽस्माकं शिवाज्ञाऽद्य गमिष्यामस्तदंतिकम् ॥ २२ ॥
अस्मत्पश्चाद्वटोश्चन्नवीरस्यास्य शुभेऽहनि ॥
यथाविधि विदध्याच्छ्रीगुरुपट्टाभिषेचनम् ॥ २३ ॥
अयमेव गुरुर्भूत्वा श्रेयो दास्यति धीमताम् ॥
भवतां भक्तियुक्तानां गुरौ सांबे तथा चरे ॥ २४ ॥
यथाऽस्मत्सन्निधौ यूयमेतावत्कालमादरात् ॥
कार्यजातं मठस्यास्य कृत्वा कीर्तिमवाप्नुत ॥ २५ ॥
तथैवाग्रेऽस्य सान्निध्ये स्वामिनो यूयमर्भकाः ।
कृत्वा कार्यमितोऽप्युच्चैर्यशः संचिनुतोत्तमम् ॥ २६ ॥
सार्धद्विघटिकाशेषे दिवसेऽस्मिन्पुरौकसः ॥
विसृज्य पार्थिवं देहं शिवसायुज्यमाप्नुयाम् ॥ २७ ॥

---

२२ ' हे गांवातील प्रमुख लोक हो, तुम्ही माझें शेवटचें भाषण ऐका, आज आम्हांला परमेश्वराची आज्ञा झाली आहे, करितां आम्ही आज त्या परमेश्वराकडे जाऊं.

२३ आमच्या पश्चात् ब्रह्मचारी अशा या चन्नवीराला चांगल्या दिवशीं शास्त्रास अनुसरून श्रीगुरु पट्टाभिषेक करावा,

२४ बुद्धिमान्, गुरु, लिंग, जंगम यांचेवर पूर्ण निष्ठा असणाऱ्या अशा तुम्हांस हा चन्नवीरच गुरु होऊन तुमचें कल्याण करील.

२५ माझे हयातींत आमचे जवळ तुम्ही आजपर्यंत प्रेमानें या मठाचीं सर्व कार्यें करून जसें कीर्तिमान् झालात.

२६ तसेंच पुढेंही हे मुलांनों, तुम्ही या चन्नवीरस्वामीजवळ मठाचीं सर्व कार्यें करून याहीपेक्षां उत्तम कीर्ति संपादन करा.

२७ हे रहिवाशांनो, आज सायंकाळीं ५ वाजतां जड असें पार्थिव शरीर सोडून शिवाशीं एक रूप होईन. ( शिवैक्य होईन. )

ततो मत्पूज्यपादानां चन्नवीरतपस्विनाम् ॥
समाधेः सान्निधावेव मत्समाधिर्विधीयताम् ॥ २८ ॥

इत्युक्तवतः पूज्यपादपद्मस्य योगिनः ॥
गुरोर्वाचं समाकर्ण्य पुनरूचुः पुरौकसः ॥ २९ ॥

भगवन् भो भवानस्मान् हित्वा सांबस्य सन्निधिम् ॥
यदि यास्यति लोकेऽस्मिन् जीवामो वै वयं कथम् ॥ ३० ॥

स्तनंधयाः पयस्विन्याः सवित्र्या इव ते गुरो ॥
आत्यंतिकवियोगं नु कथं सोढुं क्षमामहे ॥ ३१ ॥

इत्यादिदुःखभूयिष्ठं व्याहरंतं जनं प्रति ॥
उवाच वाग्मिनामीशो वचनं मधुरं मृदु ॥ ३२ ॥

---

२८ नंतर माझे पूज्यपाद अशा चन्नवीर स्वामींच्या समाधीजवळ माझी समाधी करा.

२९ अशा प्रकारें सांगत असलेल्या पूज्य पद कमलांच्या, शिवयोगी असलेल्या गुरु चन्नबसव स्वामींचें भाषण ऐकून, त्यावर ते पुढारी लोक म्हणाले,

३० हे भगवान्, आपण आम्हांला सोडून सांब शिवाच्याजवळ गेलात तर या लोकांत आम्ही कसे जगणार ?

३१ हे गुरूत्तमा, स्तनपान करणारा मुलें भरपूर दूध मिळणाऱ्या आईचा वियोग (मरण) जसा सहन करूं शकत नाहींत तसें आम्हांलासुद्धां आपला अंत्य वियोग (मरण) कसा सहन होईल ?

३२ इत्यादि दुःखानें ओतप्रोत असें भाषण करणाऱ्या त्या लोकांना वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असे ते महर्षि मृदु व मधुर असें भाषण करते झाले.

उत्पन्नस्य धृवं मृत्युर्मृतस्य जननं धृवम् ॥
वासनाक्षयपर्यंतं नरो भ्रमति चक्रवत् ॥ ३३ ॥
दृष्टांतेनानुभावेन चानयोः परिवर्तनम् ॥
जानंतोऽपि विमुह्यंति मोहयंतीतरान् जनाः ॥ ३४ ॥
यावद्दार्ढ्यं शरीरेऽस्ति तावत्प्रीतिः शरीरिणः ॥
अतिजर्झरिते देहे का प्रीतिः कंचुके यथा ॥ ३५ ॥
देहेन सह संयोगो जीवस्यायुःक्षयावधिः ॥
क्षीणे चायुषि तद्योगं कर्तुं ब्रह्मापि न क्षमः ॥ ३६ ॥

३३ 'हे भक्तोत्तमांनो, जन्मलेल्या प्रत्येक प्राण्याला मरण हें निश्चित आहे. तसें मेलेल्या प्राण्याला जन्म, हेंही निश्चित आहे. मनुष्य संसाराची वासना नष्ट होईपर्यंत चक्राप्रमाणें जन्म मरणाच्या फेऱ्यांत भ्रमण करीत असतो.

३४ या जनन मरणांचे रहाटगाड्यांचें रहस्य दृष्टांतानें, अनुभवानें जाणणारे लोक आपण स्वतां त्यांत फसतात व दुसऱ्यांनाही फसवितात.

३५ जसें धडधाकट वस्त्राचे ठिकाणीं मनुष्याचें प्रेम असतें. तसें शरिराचे ठिकाणीं बळकटी असें पर्यंत शरिराविषयींचें प्राण्याचें प्रेम अधिक असतें. वस्त्र जीर्ण [ जुनें फाटकें ] झाल्यानंतर त्याच्या ठिकाणीं प्रेम नसल्याप्रमाणें या जर्जर झालेल्या शरिराविषयीं तरी प्रेम कोठून असणार? [ असणार नाहीं. ]

३६ आयुष्य नष्ट होईपर्यंत शरिरांत जीवाचा संबंध असतो, आयुष्य नष्ट झाल्यानंतर शरिराशीं जीवाचा संबंध टिकण्यास प्रत्यक्ष ब्रह्मदेवसुद्धां समर्थ होत नाहीं.

चतुर्युगसहस्राणि ब्रम्हणश्चेति चागमे ॥
विधेरायुःप्रमाणं चेत्के नरा यमकिंकराः ॥ ३७ ॥
शरीरधारिणो ये ये वर्तंते जगतीतले ॥
जहत्यायुःक्षयाच्चे ते देहं भौतिकमर्भकाः ॥ ३८ ॥
धृतिस्त्यागः शरीरस्य जीवतंत्रो न विद्यते ॥
विद्यते कर्मणस्तंत्रो ह्यतः शोच्यं न केनचित् ॥ ३९ ॥
कर्तृताऽकर्तृताशक्तिर्यद्यप्यस्त्यात्मनः पुनः ॥
कृतं कर्मान्यथा कर्तुं न शक्तिर्विद्यते क्वचित् ॥ ४० ॥
करोति यादृशं कर्म तादृशं फलमश्नुते ॥
सत्कर्मणा सुखप्राप्तिर्दुःखप्राप्तिरकर्मणा ॥ ४१ ॥

---

३७ कारण—शास्त्रांत [ चतुर्युग सहस्राणि ब्रह्मणो दिनमुच्यते ] अशी ब्रह्मदेवाला सुद्धां आयुष्याची मर्यादा असतांना, केवळ यमाची आज्ञापालन करणाऱ्या मनुष्याची काय किंमत ?

३८ हे मुलांनो या जगामध्यें शरीर धारण करणारे सर्व प्राणी, आयुष्य संपल्यानंतर पंचभूतात्मक शरिराचा अवश्य त्याग करतात.

३९ शरिराचा त्याग व धारणा या गोष्टी जीवाच्या स्वाधीन नाहींत. मात्र त्या कर्माच्या आधीन असतात. म्हणून कोणीही शरिराविषयीं व्यसन (दुःख) करूं नये.

४० जरी कोणतेंही कर्म करावयाचें किंवा न करावयाचें या विषयींचें सामर्थ्य जीवात्म्याला आहे, तरी केलेल्या कर्मांत बदल करण्यास तो जीव मुळींच समर्थ होऊं शकत नाहीं.

४१ प्राणी ज्या प्रकारचें काम करतों त्याप्रकारचें फळ तो उपभोगित असतो चांगलें कर्म केल्यास चांगले फळ व वाईट कर्म केल्यास वाईट फळ प्राप्त होतें.

पारत्रिकमथात्रत्यं सुखं प्राप्तुं शरीरिणः ॥
कुर्युः कर्माणि पुण्यानि नापुण्यानि कदाचन ॥ ४२ ॥
पुरौकःप्रमुखानेवं समाश्वास्य स संयमी ॥
माध्यान्हिकीं समाधाय सपर्यां सोमधारिणः ॥ ४३ ॥
पूजागारे शयानः सन्नच्छकाषायकंबले ॥
ज्वराविर्भावमंगे स्वे विदित्वा वेदिनां वरः ॥ ४४ ॥
चन्नवीरवटुं स्वीयं समाहूयात्मसन्निधौ ॥
उपवेश्यानुकंपासंपृक्तदृष्ट्याऽवलोक्य च ॥ ४५ ॥
गृहीत्वा चुबुकं किंचिदुन्नमय्य मुखांबुजम् ॥
जगाद जन्मिनां वंद्यः स्यंदन्मधुमयं वचः ॥ ४६ ॥
तात मद्देहसंपातं वीक्ष्य मा कुरु वै शुचम् ॥
देहभाजामंतिमेयं दशा नैसर्गिकी क्षितौ ॥ ४७ ॥

---

४२ पर लोकच्या सुखप्राप्तीकरितां किंवा इह लोकच्या सुखाकरितां मनुष्यानें चांगलीं [ पुण्य प्राप्तीचीं ] कामें करावींत. वाईट कामें मुळींच करूं नयेत,

४३ अशा प्रकारच्या उपदेशानें जितेंद्रिय श्रेष्ठ अशा चन्नबसव शिवाचार्यांनीं त्या पुढारी लोकांचें समाधान करून दोनप्रहरची शिवपूजा करून,

४४ शिवपूजेच्या गृहांत ( गुरुमठांत , भगव्या घोंगडीवर निजून शरीर थोडेसें तापानें गरम झालेलें समजून ज्ञानी, श्रेष्ठ असे चन्नबसव स्वामी

४५ ब्रह्मचारी अशा आपल्या चन्नवीर वटूला जवळ बोलावून बसवून त्याचेकडे कृपादृष्टीनें पाहून.

४६ जगद्वंद्य अशा त्या चन्नबसव स्वामीनीं त्या चन्नवीर वटूचीं हनुवटी धरून ती किंचित् वर उचलून अमृतमय वचन सांगितलें.

४७ अरे बाळा, माझा देह संपात [त्याग] पाहून दुःख करूं नकोस कारण-पृथ्वीतलावर प्राण्यांना ही अखेरची स्थिति [मरण] निसर्ग (ठराविक) आहे.

इत ऊर्ध्वं मठस्यास्य समुपेत्याधिकारिताम् ॥
पालय ब्रह्मचर्यादिगुरुधर्माननुत्तमान् ॥ ४८ ॥

गुरुर्भूत्वोक्तधर्मांस्तान्मनसा यो न पालयन् ॥
वर्तते वंध्यजन्माऽसौ द्विपादपशुरुच्यते ॥ ४९ ॥

सोऽज्ञोंऽतेवासिभिस्साकं सान्वयं चापदां घनम् ॥
राशिमासाद्य भूयांसं क्लिश्नात्यासंसृतिक्षयम् ॥ ५० ॥

सद्गुरुः सोऽयमेव स्यात् स्वाश्रितान्मानवान् भृशम् ॥
बंधनान्मोचयित्वाथ नित्यानंदपदं नयेत् ॥ ५१ ॥

संचार्याचंचलस्वांतश्चांतेवासिचयं वटो ॥
शिक्षयन्नक्षयामेयसुखसिध्यै सुखीभव ॥ ५२ ॥

---

४८ यापुढें या मठाचा अधिकारी होऊन अत्युक्त अशा ब्रह्मचर्यादि श्रेष्ठ धर्मांचें पालन कर.

४९ जो माहेश्वर (जंगम) आपण स्वतः गुरु होऊन गुरूंची सांगितलेलीं कर्तव्यें मनःपूर्वक करीत नाहीं त्याचें जिणें व्यर्थ आहे. तो द्विपाद पशूच म्हणविला जातो.

५० अशा प्रकारें [ आपलीं कर्तव्यें न करणारा ] वागणारा मूर्ख गुरु आपल्या शिष्यांसह व वंशासह अनेक महा संकटें प्राप्त करून घेऊन जगाच्या अंतापर्यंत दुःखें भोगीत असतो.

५१ आपणांवर अवलंबून असणाऱ्या आपल्या शिष्यांचीं संसार बंधनें तोडून कायमच्या सुखाचें स्थान त्यांना प्राप्त करून देतो, तोच सद्गुरु होय.

५२ हे चन्नवीर वटो, स्थिर मनाचा होऊन, संचार करून, शिष्य समुदायांना नाशरहित अशा मोक्ष प्राप्तीकरितां उपदेश करीत सुखानें रहा.

धर्मार्थकाममोक्षेषु शिष्याग्रेसर चांतिमम् ॥
लक्ष्यीकृत्यांतरार्चायां यतेथाः पालयन् बहिः ॥ ५३ ॥

गंगामिवामलां राकाकौमुदीमिव मोददाम् ॥
कीर्तिं संपाद्य लोकेऽस्मिन् संजीव शरदां शतम् ॥ ५४ ॥

इत्युक्त्वा चन्नवीरस्य वटोर्मूर्धनि मंजुलम् ॥
हस्तांबुजमवामं स्वं विन्यस्याशिषमातनोत् ॥ ५५ ॥

ततः क्षणाच्छिवाचार्यवर्यस्यात्मा शिवात्मनि ॥
विलीयांतर्दधे तेजस्तेजसीव जले जलम् ॥ ५६ ॥

ऋतौ वसंते वैशाखे मासे पक्षे सितीतरे ॥
पंचम्यां च तिथौ चन्ननंदीशो विजहौ तनुम् ॥ ५७ ॥

---

५३ हे शिष्य श्रेष्ठा, धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चार पुरुषार्थांपैकीं शेवटचा जो मोक्ष त्यावर पूर्ण लक्ष ठेवून बाहेरचे धर्म ( शिवपूजा वगैरे ) पाळून, मानसपूजेंत [ अंतर्लिंगानुसंधानांत ] यत्न कर.

५४ हे चन्नवीर वटो, इह लोकांत देवगंगेप्रमाणें निर्मळ, पौर्णिमेच्या चांदण्याप्रमाणें आनंद देणारी अशी किर्ति संपादन करून, १०० शंभर वर्षेपर्यंत जग.

५५ महर्षि अशा चन्नबसव स्वामींनीं अशाप्रकारें उपदेश करून चन्नवीर वटूच्या मस्तकावर मंजुल [मऊ] असा आपला हात ठेवून आशीर्वाद दिला.

५६ नंतर शिवाचार्य श्रेष्ठ अशा चन्नबसव स्वामींचा आत्मा क्षणांत तेजांत तेज मिळाल्याप्रमाणें अथवा पाण्याशीं पाणी मिळाल्याप्रमाणें शिवाच्या ठिकाणीं प्रवेश करून अंतर्धान पावला. ( शिवैक्य झाला. )

५७ वसंत ऋतूंतील वैशाख मासांत शु॥. ५ मी दिवशीं गुरूत्तम असे चन्नबसव स्वामी, यांनीं हा जड देह सोडला. ( ते शिवैक्य झाले. )

श्रीमद्रेणुकदारुकादिजगदाचार्यावतंसोत्तमा वीरेशप्रमुखाश्च
पंच महिताः सद्गोत्रसन्नायकाः ॥
पड्विड्यादिमसूत्रकृद्गुरुवरास्ते पंच सर्वोत्तराः संतु
श्रीगुरुचन्ननंदिचरितस्यात्यंत श्रेयस्कराः ॥ ५८ ॥

जीयाज्जित्वरनेतृचन्नबसवाचार्यस्य चार्याकृतेः
पादांभोजरजःकणालिविरजीजातावनीजावलेः ॥
भक्तिव्यक्तमनोजनश्रवणसत्पीयूषधाराधरं भूमावाविधु
तारकं चरितमाचित्राकरं श्रीकरम् ॥ ५९ ॥

श्रीशालिवाहनशके नयनर्तुनागचंद्रान्विते
नृपतिविक्रमहायनेऽस्मिन् ॥
वैशाखमासमहिते शुभशुक्लपक्षे ग्रंथः
समाप्तिमगमत्कृपया गुरूणाम् ॥ ६० ॥

---

५८ श्री रेणुक दारुकादि श्रेष्ठ जगद्गुरु पंचाचार्य, वीर भद्रादि पूज्य असें पंच गोत्र नायक, पडविडी इत्यादि पंच महासूत्रें करणारे पांच गुरुवर्य, हे श्रीगुरु चन्नबसव स्वामींच्या चारित्राला शुभ मंगल करणारे असोत.

५९ पदकमलांच्या रजःकणांनीं प्राण्यांना पाप रहित करणाऱ्या, पवित्र आकार असलेल्या, जयशील अशा चरित्र नायक चन्नबसव शिवाचार्यांचें, भक्तियुक्त जनांच्या कानांला उत्तम अशी अमृतधारा होऊन राहिलेलें, आश्चर्याचें स्थान, मंगलकारक असें चरित्र पृथ्वीतलावर चंद्रतारे असें पर्यंत सर्वोत्कर्षानें असो.

६० शालि वाहन शके १८६२ विक्रमनाम संवत्सरांतील वैशाख शुक्लपक्षांत गुरुकृपेनें या ग्रंथाची समाप्ति झाली.

मोदन्तां घनमोक्षदानि जगदाचार्योक्ततत्त्वानि
संवर्धन्तां वरवीरशैवसमया वेदागमाद्योदिताः ॥
वर्तन्तां गुरवो गुणाग्रिमजनोद्धाराय सत्कर्मिणो ध्यायन्तां
भुवि मानवा अपि गुरोः पादांबुजातद्वयम् ॥ ६१ ॥

वंदे श्रीगिरिमल्लिकार्जुनमहादेवं शिवाया धवम्
मृग्यं योगिमनोभिरंगजमहामत्तेभकंठीरवम् ॥
विद्युत्कांतजटाटवीपरिवहन्मंदाकिनीतीरसंरोह-
त्कैतकपुष्पपत्रशकलीसंदिग्धमुग्धेंदुकम् ॥ ६२ ॥

---

६१ पृथ्वीतलावावर श्रेष्ठ असें मोक्षपद देणारीं, रेणुकादि जगद्गुरूंकडून सांगण्यांत आलेलीं वीरशैव तत्त्वें नेहमीं उज्वळ होऊन राहोत, वेदागमादि शास्त्रांत सांगण्यांत आलेले श्रेष्ठ असे वीरशैवांचे आचार वाढोत, गुरु, गुणी जनांच्या उद्धाराकरितां सत्कर्में शिवलिंगपूजा, अनुष्टान वगैरे ] करणारे होऊन असोत व मनुष्येंसुद्धां गुरूंच्या पदकमळांचें स्मरण करीत राहोत.

६२ पार्वतीपती, योगी लोकांकडून शोधण्यास योग्य, मन्मथ नामक मदोन्मत्त हत्तीला सिंहरूप असलेला, ज्याच्या मस्तकावर असलेली चंद्ररेखा विजेप्रमाणें प्रकाशमान असणाऱ्या जटारूपी अरण्यामध्यें वाहणाऱ्या गंगेच्या कांठीं वाढलेल्या केवड्याच्या फुलाच्या पाकळ्याच्या तुकड्याचा संशय उत्पन्न करीत आहे, अशा श्रीशैल मल्लिकार्जुन नामक शिवाला माझा नमस्कार असो.

यस्याज्ञां ससुरासुरोरगजगद्धत्ते शिरस्यादराद्यद्भीत्या
गिरिकंदराणि मुनयश्चाश्रित्य जीवंत्यहो ।'
तं कामं नयनानलार्चिषि जुहावामर्षणाद्यः शिवस्तस्यार्धा-
गहरा गिरींद्रतनया मां पातु पादनतम् ॥ ६३ ॥

—❁ इति नवमोऽध्यायः ❁—

---

६३ ज्याची आज्ञा देव, राक्षस, सर्प हे मोठ्या प्रेमानें शिरसावंद्य मानतात, अहो, मुनिश्रेष्ठ ज्याला भिऊन पर्वताच्या गुहांचा आश्रय करून जगतात अशा मन्मथाला ज्या शिवानें रागानें नेत्राग्नीच्या ज्वालांनीं जाळून टाकलें, अशा शिवाचें अर्धें शरीर अपहार केलेली पार्वती, पायाचे ठिकाणीं नम्र झालेल्या अशा माझें रक्षण करो.

॥ शिवमस्तु ॥

—•: अध्याय ९ वा समाप्त. :•—

